# पुरस्कार

'विद्यानिधि' यांचा व्यक्तिगत स्नेह कदाचित् चाळीस वर्षांचा असावा. भा. इ. सं. मंडळ आणि माझे सहकारी श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्यामुळें चित्रावांचा संबंध निकट झाला. शिवाय आम्ही एका शाहाळींतले, तेव्हां तो थोडा दृढ व्हावा हें साहजिकच होय. यांच्या घराण्यांत 'तबीत्री'चे म्हणजे वैद्यकाच्या इनामाच्या कागदपत्रांत जिजाबाईमातोश्रींचें पत्र मिळालें. असें हें घराणें जुनें आहे. आणि आमचे सिद्धेश्वरशास्त्री यांनीं जुनी विद्या करून अभ्यासून 'विद्यानिधि' म्हणून पदवी आणि प्रसिद्धि मिळविली. ती पदवी त्यांनीं सार्थ करून दाखविली.

'वेदांचा हो अर्थ' त्यांनीं मराठींत ऋग्वेदाचें संपूर्ण भाषांतर सिद्धीस नेऊन प्राकृत जनांना सांगितला व सिद्धेश्वर नांवाचीहि सार्थकता केली. पुढें ज्ञानकोशकर्त्यांच्या सहवासांत नवीन दृष्टि आत्मसात् केली. पोटीं देशप्रेम असल्यामुळें एक नवीन निर्भयताहि त्यांना प्राप्त झाली.

चित्रावशास्त्री यांनीं आपला एक मार्ग आंखून घेतला आणि सचोटीनें, चिकाटीनें तदर्थ आपली काया झिजविली. या गुणांच्या बळावर त्यांनीं समाजाची इतकी मोठी सेवा करून दाखविली कीं, त्यांना श्रीमत्स्वामी केवलानंदसरस्वतींचेहि आशीर्वाद लाभावे. पंडित सातवळेकर यांनींहि महाराष्ट्रांत अशीच अपूर्व सेवा चालविली आहे. अशा विद्वान् समाजसेवकांच्या ऋणांतून अंशतः तरी उतराई होण्याचा एक अल्पसा मार्ग म्हटला म्हणजे ऋणाची कबुली देणें हा होय. चित्राव-सत्कारसमितीनें या मार्गाचा यथाशक्ति अवलंब करून प्रस्तुतचा छोटा ग्रंथ सिद्ध केला आहे, आणि तो म. म. अण्णासाहेब काणे यांच्यासारख्या ज्ञानतपोवृद्ध विद्वानांच्या हस्तें विद्यानिधींना समर्पण करण्याचें निश्चित केल्याप्रमाणें तें कार्य आज तडीस गेल्याचें पाहून सत्कारमंडळाला समाधान वाटत आहे. ग्रंथ लहानच आहे. त्यांत एका भागांत चित्रावांचा कार्यपरिचय आहे; दुसऱ्या भागांत कित्येक विद्वानांचे मननीय लेख आहेत. थोडे असले लहान असले तरी या लेखांनीं या ग्रंथाचें महत्त्व आणि शोभा वाढविली आहे

शास्त्रीबुवांनी प्राचीन परंपरेने संस्कृत शास्त्रांचे अध्ययन पूर्ण … निरनिराळ्या शास्त्रांत अध्यापनकार्य केले आहे. ऋग्वेदाचे संपूर्ण मराठी … करून प्रथमतः प्रकाशित करण्याचे श्रेय त्यांनी संपादन केले आहे. कै. डॉ. … व्यं. केतकर यांच्या मार्गदर्शनाने महाराष्ट्रीय ज्ञानकोश तयार करण्याच्या कार्यात ते सहभागी झाले आहेत. त्या कामी संपादन केलेला अनुभव … धरून स्वतंत्रपणे संशोधनकार्य त्यांनी सुरू केले, आणि भारतवर्षीय … मंडळ स्थापून प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे मराठी चरि… तीन खंड तयार करून प्रसिद्ध केले. शुद्धि-संघटन आणि परिवर्तनवाद … भूमिकेवरून हिन्दुधर्माची मोठी सेवा त्यांनी केली आहे. संस्कृत भाषा … शास्त्रे तसेच सर्वसाधारण शिक्षण या क्षेत्रांत काम करणाऱ्या विविध सं… मध्ये त्यांनी आपला जबाबदारीचा वाटा उचललेला आहे. दे. क. भा. … विविध कार्यांचे ते एक प्रमुख प्रवर्तक आहेत. सारांश, विद्येच्या आणि जीवनाच्या विविध क्षेत्रांत त्यांनी आजपर्यंत स्पृहणीय कार्य केले आहे.

अशा या विद्वानाचा सत्कार पुणे येथे लौकरच व्हावयाचा आ… त्यासाठी एक सत्कारसमितीही रीतसर स्थापन झाली आहे. या कामी आवश्य… तितका द्रव्यनिधि शक्य तो लौकर जमा करणे जरूर आहे. तरी आपण आपली देणगी खालील पत्त्यावर पाठवून सत्काराच्या कामी साहाय्य करावे अशी विनंती आहे.

कार्यवाह, विद्यानिधि चित्रावशास्त्री षष्ट्यब्दपूर्ति सत्कार समिति, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, ५२१ सदाशिव पेठ, पुणे २.

आपले

म.म. प्रा. द. वा. पोतदार (अध्यक्ष)
महापौर ग. म. नलावडे (उपाध्यक्ष)
केशवराव जेधे ,,
ज. स. करंदीकर ,,
सरदार आबासाहेब मुजुमदार ,,
विठ्ठलराव डावरे ,,
के. पां. जोशी (कोषाध्यक्ष)
गो. चिं. अनगळ
रा. ना. दांडेकर
.. गो. फडके

डॉ. रा. ग. हर्षे
पां. शा. कुलकर्णी
गं. शि. भडकर
का. म. महाजन
ल. ए. सफई
श्रौताचार्य धुं. ग. बापट दीक्षित
ना. श्री. सोनटक्के
श. रा. दाते
स. के. नेऊरगांवकर
वसंतराव देवकुळे

| | |
|---|---|
| ं. द. रबडे | चिं. ग. काशीकर ( कार्यवाह ) |
| वे. त्र्यं. शेटे | बा. बा. भागवत ,, |
| ा. न. श्रीगोंदेकर | वें. ल. जोशी ,, |

शास्त्रीबोवांना पौष व. ११ शके १८७५ या दिवशीं म्हणजे जानेवारी १९५४ च्या शेवटच्या आठवड्यांत ६१ वें वर्ष लागतें, हें लक्षांत घेऊन कार्यकारी मंडळानें असें ठरविलें कीं, सदर दिवशीं सत्कार-समितीच्या सभासदांनीं शास्त्रीबोवांच्या घरीं जाऊन त्यांचा लहानसा सत्कार व अभीष्टचिंतन करावें आणि सार्वजनिक सत्कार-समारंभ शके १८७६ च्या चैत्र महिन्यांत किंवा त्या सुमारास करावा. या प्रसंगीं शास्त्रीबोवांचा विविध कार्याबद्दल गौरव करणारा अभिनंदन-ग्रंथहि तयार करून प्रसिद्ध करावा. याप्रमाणें शास्त्रीबोवांच्या ६१ व्या वाढदिवशीं सकाळीं सत्कार-समितीचे सभासद त्यांच्या घरीं जमले व श्री. ग. म. नलावडे यांच्या हस्तें शास्त्रीबोवांना पुष्पहार, श्रीफल आणि अल्पशी दक्षिणा देण्यांत आली. या प्रसंगीं श्री. ग. म. नलावडे, श्री. केशवराव जेधे, सरदार आबासाहेब मुजुमदार, श्री. न. गो. अभ्यंकर इत्यादि वक्त्यांचीं समयोचित भाषणें झालीं. या सुमारास कांहीं वृत्तपत्रांतून आणि मासिकांतून शास्त्रीबोवांच्यासंबंधीं परिचयलेखहि प्रसिद्ध झाले.

ग्रंथप्रकाशन आणि सत्कार-समारंभ यांच्या खर्चासाठीं जरूर तेवढें द्रव्यसाहाय्य संपादन करणें जरूर होतें. सत्कार-समितीच्या सभासदांनीं आणि इतर सज्जनांनीं या कामीं परिश्रम घेऊन आवश्यक तेवढी रकम जमविली याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावयास पाहिजेत. विशेषतः सरदार आबासाहेब मुजुमदार व श्री. के. पां. जोशी यांनीं केलेल्या प्रयत्नांबद्दल त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. या कामीं ज्यांनीं विशेष साहाय्य केलें त्यांचा आम्ही कृतज्ञतापूर्वक नामनिर्देश करतों:—

| | |
|---|---|
| श्रीमंत राजे रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंतसचिव, सं. भोर | रु. १०० |
| केसरी-मराठा ट्रस्ट, पुणें | रु. २५ |
| वैदिक संशोधन मंडळ, पुणें | रु. १०१ |
| सौ. राणीसाहेब मुकुंदलाल पित्ती, पुणें | रु. ५१ |
| वें. श्रीधर वामन नाईक, हैद्राबाद ( द. ) | रु. ५१ |
| श्रीमंत सरदार माधवराव रास्ते, पुणें | रु. २५ |
| वेदशास्त्रोत्तेजक सभा, पुणें | रु. २५ |
| रा. ब. गो. म. वैद्य, पुणें | रु. २५ |
| डॉ. ना. भि. परुळेकर, पुणें | रु. २५ |

यांत शंका नाहीं. सत्कारसमितीच्या चिटणिसांच्या निवेदनांत सर्वांचे आभार मानले असले तरी ते येथें पुनः मानले तर उचितच होईल.

सत्कार-समारंभाच्या निमित्तानें सर्व विद्याभिलाषी जनांस एक नम्र विनंति करावीशी वाटते, हा आरंभच समजावा. चित्रावशास्त्री यांचें जें महत्त्वाचें लिखाण आज लिहून पडलें आहे तें तरी तेवढें प्रसिद्ध होईल अशी कांहीं योजना लवकर व्हावी. साठीचा हा समारंभ एवढी सद्बुद्धि वाचकांस देवो ही इच्छा आहे. चित्राव यांना आयुरारोग्य लाभावें आणि त्यांनीं आपणांसहि ज्ञानदान करावें ही इच्छा वावगी कोण म्हणेल ? पण सिद्ध आहे तोच माल उठला नाहीं तर नवीन निर्मितीला उत्साह कोठून यावा बरें ?

वैशाख शु. १४ }
शके १८७६ }

दत्तो वामन पोतदार,
अध्यक्ष, चित्राव सत्कार-समिति

---

# संपादकीय निवेदन

'विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव अभिनंदन-ग्रंथ' वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे. नोव्हेंबर १९५३ मधील गोष्ट. काहीं कामानिमित्त आम्ही चार मंडळी टिळक विद्यापीठांत एकत्र बोलत बसलों असतांना आम्हां सर्वांना आदरणीय वाटणारे व सर्वांच्या दृढ परिचयाचे विद्यानिधि चित्रावशास्त्री यांच्या वयाला लौकरच ६० वर्षे पूर्ण होत आहेत असें बोलणें निघालें व त्यांची वाङ्मयीन आणि सांस्कृतिक कामगिरी ध्यानांत घेतां षष्ठ्यब्दपूर्तिनिमित्त त्यांचा सार्वजनिक रीत्या गौरव होणें उचित आहे अशी कल्पना निघाली. तेथें जमलेल्या सर्वांना ती पसंत पडली. शास्त्रीबोवांचा परिचय असलेल्या मंडळींना ही कल्पना बोलून दाखविता त्यांनींहि तिला आपला मनःपूर्वक पाठिंबा दर्शविला व रीतसर सत्कार समिति स्थापून कामाला लागण्याची सूचना केली. त्याप्रमाणें टिळक विद्यापीठाच्या कचेरींत ता. २५-१२-१९५३ या दिवशीं विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव षष्ठ्यब्दपूर्ति सत्कार समितीची स्थापना करण्यात आली. समितीचे अध्यक्ष म्हणून म. म. श्री. द. वा. पोतदार यांची योजना करण्यात आली. उपाध्यक्ष म्हणून ( त्या वेळीं पुणें महानगरपालिकेचे महापौर असलेले ) श्री. ग. म. नलावडे, श्री. केशवराव जेधे, श्री. ज. स. करंदीकर, सरदार आबासाहेब मुजुमदार आणि श्री. विश्वासराव डावरे यांची योजना केली गेली. श्री. के. पा. ऊर्फ भाऊसाहेब जोशी हे कोषाध्यक्ष नेमले गेले. श्री. चिं. ग. काशीकर, श्री. बा. वा भागवत आणि श्री. मं. ल. जोशी यांची कार्यवाह म्हणून नियुक्ति करण्यात आली. याखेरीज समासद म्हणून काहीं सद्गृहस्थांना समाविष्ट करून घेण्यात आलें. वर नमूद केलेले पदाधिकारी व काहीं सभासद यांचें कार्यकारी मंडळ निवडण्यात आलें व सत्काराची योजना निश्चित करून कामाची आंखणी करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला देण्यात आला. कार्यकारी मंडळानें सत्काराबाबतचें पहिलें पत्रक ता. ३१ १२ १९५३ या दिवशीं प्रसिद्ध केलें. तें पुढीलप्रमाणें---

"विद्यानिधि प. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या वयाला पुढील महिन्यात साठ वर्षे पूर्ण होऊन एकसष्टावें वर्ष लागत आहे. शास्त्रीबुवांनीं गेलीं तीस वर्षे सामाजिक, सांस्कृतिक आणि संशोधन क्षेत्रांत केलेली कामगिरी लक्षांत घेता त्यांच्या एकसष्टाव्या वाढदिवसाच्या निमित्तानें त्यांचा गौरव आणि अभीष्टचिंतन करणें हें एक सामाजिक कर्तव्य आहे असें आम्हांस वाटतें.

शास्त्रीबुवांनीं प्राचीन परंपरेनें संस्कृत शास्त्रांचें अध्ययन पूर्ण केल्यानंतर निरनिराळ्या संस्थांत अध्यापनकार्य केलें आहे. ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषांतर करून प्रथमतः प्रकाशित करण्याचें श्रेय त्यांनीं संपादन केलें आहे. कै. डॉ. श्री. व्य. केतकर यांच्या मार्गदर्शनानें महाराष्ट्रीय ज्ञानकोश तयार करण्याच्या श्रेष्ठ कार्यांत ते सहभागी झाले आहेत. त्या कामीं संपादन केलेला अनुभव जमेस धरून स्वतंत्रपणें संशोधनकार्य त्यांनीं सुरू केलें, आणि भारतवर्षीय चरित्रकोश मंडळ स्थापून प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे मराठी चरित्रकोशाचे तीन खंड तयार करून प्रसिद्ध केले. शुद्धि संघटन आणि परिवर्तनवाद या भूमिकेवरून हिन्दुधर्माची मोठी सेवा त्यांनीं केली आहे संस्कृत भाषा आणि शास्त्रें तसेंच सर्वसाधारण शिक्षण या क्षेत्रांत काम करणाऱ्या विविध संस्थांमध्यें त्यांनीं आपला जबाबदारीचा वांटा उचललेला आहे. दे. ऋ. ब्रा. सभेच्या विविध कार्यांचे ते एक प्रमुख प्रवर्तक आहेत. सारांश, विद्येच्या आणि समाजजीवनाच्या विविध क्षेत्रांत त्यांनीं आजपर्यंत स्पृहणीय कार्य केलें आहे.

अशा या विद्वानाचा सत्कार पुणें येथें लौकरच व्हावयाचा असून त्यासाठीं एक सत्कारसमिति रीतसर स्थापन झाली आहे. या कामीं आवश्यक तितका द्रव्यनिधि शक्य तों लौकर जमा करणें जरूर आहे. तरी आपण आपली देणगी खालील पत्त्यावर पाठवून सत्काराच्या कामीं साहाय्य करावें अशी विनंती आहे.

कार्यवाह, विद्यानिधि चित्रावशास्त्री षष्ठ्यब्दपूर्ति सत्कार समिति, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, ५२१ सदाशिव पेठ, पुणें २.

आपले

| | |
|---|---|
| म.म. प्रा. द. वा. पोतदार (अध्यक्ष) | डॉ. रा. ग. हर्षे |
| महापौर ग. म. नलावडे (उपाध्यक्ष ) | पां. वा. कुलकर्णी |
| केशवराव जेधे ,, | ग. शि. अडकर |
| ज. स. करंदीकर ,, | का. म. महाजन |
| सरदार आबासाहेब मुजुमदार ,, | ल. ए. सफई |
| विश्वासराव डावरे ,, | श्रौताचार्य पु. ग. घाणट दीक्षित |
| के. पां. जोशी ( कोषाध्यक्ष ) | ना. श्री. सोनटक्के |
| गो. चिं. अनगळ | श. रा. दाते |
| रा. ना. दांडेकर | स. के. नेऊरगांवकर |
| [illegible] | [illegible]तराव देवकुळे |

| | |
|---|---|
| श्री. द. रवडे | चिं. ग. कार्शीकर ( कार्यवाह ) |
| वि. त्र्यं. शेटे | वा. वा. भागवत ,, |
| ग. न. श्रीगोंदेकर | वें. ल. जोशी ,, |

शास्त्रीबोवाना पौष व. ११ शके १८७५ या दिवशीं म्हणजे जानेवारी १९५४ च्या शेवटच्या आठवड्यांत ६१ वें वर्ष लागलें, हें लक्षांत घेऊन कार्यकारी मंडळानें असें ठरविलें कीं, सदर दिवशीं सत्कार-समितीच्या सभासदांनीं शास्त्रीबोवाच्या घरीं जाऊन त्यांचा लहानसा सत्कार व अभीष्टचिंतन करावें आणि सार्वजनिक सत्कार समारंभ शके १८७६ च्या चैत्र महिन्यांत किंवा त्या सुमारास करावा. या प्रसंगीं शास्त्रीबोवाचा विविध कार्याबद्दल गौरव करणारा अभिनंदन ग्रंथहि तयार करून प्रसिद्ध करावा. याप्रमाणें शास्त्रीबोवांच्या ६१ व्या वाढदिवशीं सकाळीं सत्कार-समितीचे सभासद त्यांच्या घरीं जमले व श्री. ग. म. नलावडे यांच्या हस्तें शास्त्रीबोवाना पुष्पहार, श्रीफळ आणि अल्पशी दक्षिणा देण्यात आली. या प्रसंगीं श्री. ग. म. नलावडे, श्री. केशवराव जेधे, सरदार आबासाहेब मुजुमदार, श्री. न. गो. अभ्यंकर इत्यादि वक्त्यांचीं समयोचित भाषणें झालीं. या सुमारास काहीं वृत्तपत्रातून आणि मासिकांतून शास्त्रीबोवांच्यासंबंधीं परिचयलेखहि प्रसिद्ध झाले.

ग्रंथप्रकाशन आणि सत्कार-समारंभ यांच्या खर्चासाठीं जरूर तेवढें द्रव्य-साहाय्य संपादन करणें जरूर होतें. सत्कार-समितीच्या सभासदांनीं आणि इतर सज्जनांनीं या कामीं परिश्रम घेऊन आवश्यक तेवढी रक्कम जमविली याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावयास पाहिजेत. विशेषतः सरदार आबासाहेब मुजुमदार व श्री. के. पा. जोशी यांनीं केलेल्या प्रयत्नांबद्दल त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. या कामीं ज्यांनीं विशेष साहाय्य केलें त्यांचा आम्ही कृतज्ञतापूर्वक नाम-निर्देश करतों:—

| | |
|---|---|
| श्रीमंत राजे रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंतसचिव, सं. भोर | रु. १०० |
| केसरी मराठा ट्रस्ट, पुणें | रु. २५ |
| वैदिक संशोधन मंडळ, पुणें | रु. १०१ |
| सौ. राणीसाहेब मुकुंदलाल पित्ती, पुणें | रु. ५१ |
| बॅ. श्रीधर वामन नाईक, हैद्राबाद ( द. ) | रु. ५१ |
| श्रीमंत सरदार माधवराव रास्ते, पुणें | रु. २५ |
| वेदशास्त्रोत्तेजक सभा, पुणें | रु. २५ |
| रा. ब. गो. म. वैद्य, पुणें | रु. २५ |
| डॉ. ना. भि. परुळेकर, पुणें | रु. २५ |

चित्रावशास्त्री यांनीं जें समाजोपयोगी कार्य केलें त्यांत साहित्यरूपानें केलेल्या आणि म्हणून दीर्घकाल टिकणाऱ्या कार्याला विशेष प्राधान्य द्यावयास पाहिजे. अशा कार्याबद्दल समाजानें त्यांचें उतराई व्हावयाचें तर साहित्यरूपानें होण्याचा प्रयत्न करणें उचित, असा विचार करून सत्कार-समितीनें अभिनंदन-ग्रंथाची योजना आखली.

अभिनंदन-ग्रंथासाठीं लेख पाठविण्याबद्दल अनेक विद्वान् आणि थोर गृहस्थांना विनंति करण्यांत आली. ती मान्य करून ज्यांनीं अतिशय थोड्या मुदतींत लेख पाठविले त्या सर्वांची सत्कार-समिति अतिशय आभारी आहे. त्यांच्या हार्दिक सहकार्यामुळेंच या ग्रंथाचें प्रकाशन सत्कार-समितीला करतां आलें. चित्रावशास्त्र्यांच्या सत्काराला हें वाङ्मयीन रूप देण्याचें सर्व श्रेय लेखकांकडे आहे; सत्कार-समिति केवळ निमित्तमात्र आहे. अंत करणांत तळमळ असेल तर एकटा मनुष्य विविध क्षेत्रांत केवढी कामगिरी करू शकतो हें चित्रावशास्त्र्यांच्या उदाहरणानें पुढील पिढ्यांना कळून येणार आहे. वेदविद्या व संस्कृत शास्त्रें यांचें सूक्ष्म अवलोकन करून आणि त्यांतील साररूप सिद्धान्तांच्या पायावर भारतीयांच्या भावी जीवनाची बैठक निश्चित करावयास पाहिजे, हें ध्यानांत घेऊन चित्रावशास्त्र्यांनीं या कामीं जे परिश्रम केले त्यांची ओळख या ग्रंथाच्या वाचनानें वाचकांना होईल. तळमळ, दीर्घोद्योग व चिकाटी हे गुण आणि प्राचीन भारतीय विचारांचें श्रद्धाबुद्धिपूर्वक अध्ययन या गोष्टी अंगांत. तरी आत्मसात् करण्याची प्रवृत्ति पुढील पिढ्यांत निर्माण झाली, तर चित्रावशास्त्र्यांचा हा वाङ्मयीन गौरव करण्यांतील सत्कारसमितीचे परिश्रम कारणीं लागल्याचें समाधान सत्कार समितीला लाभेल.

वैयक्तिक कर्तव्यें पार पाडून गेलीं तीस पस्तीस वर्षें विधानिधि चित्रावशास्त्री यांनीं वाङ्मयीन, सांस्कृतिक, सामाजिक इत्यादि विविध क्षेत्रांत जें समाजोपयोगी कार्य केलें, त्याबद्दल हा अभिनन्दन ग्रंथ महामहोपाध्याय डॉ. पा. वा. काणे यांच्या अध्यक्षतेखालीं आज रोजीं त्यांस समारंभपूर्वक समर्पण करण्यांत येत आहे. असें करण्यांत एक सामाजिक ऋण फेडल्याचें समाधान सत्कार समितीस वाटत आहे.

कृतज्ञता.—या अभिनंदन ग्रंथाच्या प्रकाशनप्रसंगीं आणि सत्कार-समारंभप्रसंगीं अध्यक्षस्थान स्वीकारल्याबद्दल सत्कार-समिति महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे यांची अतिशय आभारी आहे. अनेक महत्त्वाचीं कामें व प्रकृतीचें दौर्बल्य या अडचणी असूनहि त्यांनीं सत्कार-समितीची विनंति मान्य केली याबद्दल समितीला त्यांचेविषयीं अतिशय कृतज्ञता वाटते. सरकाराच्या

योजनेच्या कामीं ज्यांनीं आर्थिक साहाय्य केलें त्यांचे आभार मानणें समितीचें कर्तव्य आहे. 'अभिनंदन-ग्रंथासाठीं ज्यांनीं लेखनरूपानें साहाय्य केलें त्यांना समितीतर्फे आम्ही धन्यवाद देतों. ज्या थोर सज्जनांनीं चित्रावशास्त्री यांचे-साठीं आशीर्वादपर आणि अभीष्टचिंतनपर संदेश पाठविले त्यांचेविषयीं सत्कार-समितीला कृतज्ञता वाटते. ग्रंथाच्या छपाईचें काम वेळेवर आणि काळजीपूर्वक करून दिल्याबद्दल समर्थ भारत छापखान्याचे व्यवस्थापक श्री. स. रा. सरदेसाई यांचे आभार मानणें जरूर आहे. विद्यानिधि चित्रावशास्त्री यांच्या फोटोचे ब्लॉक वापरण्यास दिल्याबद्दल 'मनोहर' मासिकाचे संपादक श्री. शंकरराव किर्लोस्कर यांचे आम्ही आभारी आहोंत. टिळक महाराष्ट्र विद्यापीठानें आपल्या जागेचा सत्कार-समितीला उपयोग करूं दिल्याबद्दल त्या विद्यापीठाचे आभार मानणें युक्त आहे. सत्कार-समारंभासाठीं भारत इतिहास संशोधक मंडळाच्या चालकांनीं आपलें सभागृह वापरण्यास दिलें याबद्दल त्या मंडळाच्या चालकांचेहि आभार मानावयास पाहिजेत. अन्य प्रकारें ज्यांनीं सत्कार-समितीस साहाय्य केलें त्या सर्वांचे आभार मानून हें निवेदन पूर्ण करतों.

वैशाख शुद्ध १४ शके १८७६
पुणें, ता. १६ मे १९५४



कार्यवाह,
चित्रावशास्त्री सत्कार-समिति

———

# अनुक्रमणिका



## भाग २

### वाङ्मयोपहार

पाठ्यविषयक अन्य कार्य

सहसंपादक—आचार्य पाक्षिक ( १९१७-१८ )

सहसंपादक--शब्दकोश वैदिक विभाग--( १९२०-२३ )

संपादक--स्वधर्म साप्ताहिक ( १९२३-२४ )

संपादक---समर्थ मासिक ( १९४८ )

केसरी, ज्ञानप्रकाश, स्वधर्म या पत्रांतून भारतीय विद्याविषयक चर्चा. वेळोवेळीं भारतीय विद्येवर दिलेलीं व्याख्यानें.

शिक्षक व आजीव सेवक

संस्कृत पाठशाळा, गिरगांव, मुंबई ( १९२० )

टिळक महाविद्यालय, पुणें ( १९२०-२१ )

जैन विद्यालय

सरस्वती मंदिर संस्थेचें पूना नाइट हायस्कूल ( १९२२-२४ )

भारत हायस्कूल, पुणें ( १९२२-२७ )

सार्वजनिक कार्य

हिंदुमहासभा, हिंदुधर्म परिषद, पण्डितपरिषद, प्रसंगविशेषीं नेमलेलीं शिष्टमंडळें, जमा केलेले निधी यांचे वेळोवेळीं प्रतिनिधि व कार्यवाह. अध्यक्ष-पुणें हिन्दुसभा व महाराष्ट्र हिंदुसभा ( इ.स. १९२४-३६ ) स्वागताध्यक्ष-महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद, पुणें ( १९३२ ), अखिल भारतीय शुद्धिसभा, पुणें (१९३५), कार्यवाह, वेदशास्त्रोत्तेजक सभा, पुणें (१९४२-५०), विविध संस्थांचे कार्यकारी सभासद व विश्वस्त.

पदव्या

विद्यानिधि ( कामकोटिपीठाच्या शंकराचार्यांनीं १९२० सालीं दिली. )

महामहोपाध्याय ( पुरीच्या शंकराचार्यांनीं १९५२ सालीं दिली. )

---

# आशीर्वाद

" भूतलावर प्रतिदिनीं जन्मास येणाऱ्या व मृत्युमुखीं पडणाऱ्या माणसांची गणतीच नाहीं. मातेच्या उदरांतून बाहेर पडण्याला जन्म आणि प्राणास मुकण्याला मरण असें लोक समजतात. असे जन्ममृत्यु केवळ मनुष्यानाच नव्हे तर पशुपक्ष्याना देखील सहज घडतात. परंतु ज्याच्यामागें आज ना उद्या मरण आहे त्याला जन्म म्हणणें वस्तुतः शोभण्यासारखें नाहीं. जें जें दृश्य तें तें नश्वरच असणार हें जरी सत्य असलें तरी चिरंजीवित्व हा शब्द निरर्थक मात्र खास नाहीं. तें शरीरानें साध्य नसलें तरी कीर्तिरूपानें शक्य असल्याचें लोकव्यवहारांत दिसून येतें. कितीतरी माणसांची कीर्ति अद्यापि आहे तशीच चालली आहे. मरून कीर्तिरूपानें उरणें हाच खरा जन्म होय. असा जन्म इतर प्राण्यापेक्षां अधिक बुद्धिमान् अशा मनुष्यालाच साधता येतो.

सामान्य माणसापेक्षा कांहीं तरी अधिक गुण ईश्वराच्या कृपेनेंच प्राप्त होतो. त्या गुणाचा उपयोग " लोक-सेवा " या दृष्टीनें करण्यानेंच त्याचें प्रयोजन सिद्ध होतें. संपत्ति हें केवळ आनुषंगिक फळ होय. अशा कार्याच्या मागें कीर्ति सावलीसारखी आपोआप येत असते. अर्थात् या कार्याचें महत्त्व लोकांकडून होणाऱ्या सत्कारावर अवलंबून असतें असें नाहीं. तें जितका काळ टिकेल तितक्या प्रमाणावर त्याचें महत्त्व लोकांच्या निदर्शनास येतें.

या दृष्टीनें पाहता श्रीयुत सिद्धेश्वरशास्त्री चित्राव ' विद्यानिधि ' यांचा षष्ट्यब्दपूर्ति-समारंभ अभिनंदनीयच होय. या प्रसंगीं त्यांचें व त्यांनीं केलेल्या कार्याचें दीर्घायुश्चिंतन करण्यास संतोष वाटतो.

पंचवटी, नाशिक

श्रीमच्छंकराचार्य विद्याशंकर भारती
( डॉ. कुर्तकोटी )

---

# विद्यानिधि चित्रावशास्त्री यांचें विविध कार्य

## ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| (१) ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषांतर | (१०) संध्या | धर्मग्रंथमाला |
| (२) भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश | (११) ब्रह्मयज्ञ | ,, |
| (३) ,, मध्ययुगीन चरित्रकोश | (१२) वैश्वदेव | ,, |
| (४) ,, अर्वाचीन चरित्रकोश | (१३) पूजा | ,, |
| (५) महाभाष्य-शब्दकोश | (१४) श्राद्धप्रयोग | ,, |
| (६) पाणिन्यादि-शब्दकोश | (१५) गणेशाथर्वशीर्ष | ,, |
| (७) देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा इतिहास | (१६) हरिपाठ | ,, |
| (८) हिंदुधर्मतत्त्वसंग्रह | (१७) चौल | संस्कारग्रंथमाला |
| (९) धर्मशिक्षण | (१८) उपनयन | ,, |
| | (१९) यज्ञोपवीत | ,, |
| | (२०) समावर्तन | ,, |
| | (२१) विवाह | ,, |
| | (२२) शुद्धि | ,, |

## लेख

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मशास्त्रांतील प्रश्नांचीं उत्तरें | आचार्य पाक्षिक | ५ ऑक्टोबर १९१९ पासून पुढें |
| (२) संहिता स्वाहाकाराविषयीं जिज्ञासूंच्या शंकाचें निरसन | आचार्य पाक्षिक | १२ जून १९२० |
| (३) स्मृति म्हणजे काय ? | स्वधर्म साप्ताहिक | २६ जाने. १९२२ |
| (४) पंचजन कोण ? | स्वधर्म साप्ताहिक | २५ मे १९२२ |
| (५) ऋग्वेदांतील गोष्टी | ,, ,, | १० ऑगस्ट १९२२ पासून पुढें |
| (६) उपनिषदांतील गोष्टी | ,, ,, | १७ ऑगस्ट १९२२ पासून पुढें |

| | | |
|---|---|---|
| (७) वेदाचे उपग्रय व त्यांचें अध्ययन | { आचार्य पाक्षिक<br>{ पुरुषार्थ मासिक | १९२१<br>जाने. १९४१ |
| (८) वेदांतील परकीय शब्द | सह्याद्रि मासिक | ऑगस्ट १९३६ |
| (९) इलिंग | ,, ,, | १९३६ |
| (१०) महाराष्ट्रांतील कोशकार्य व त्याची भावी दिशा | सह्याद्रि मासिक | सप्टें. १९३८ |
| (११) ऋग्वेदकालीन समाजस्थिति | श्रीनिवासस्मारक लेखमाला व पुरुषार्थ | १९४४ |
| (१२) वेद व उपवेद परिचय | वेदशास्त्रदीपिका | १९४४ |
| (१३) ऋग्वेदांतील मयविक्रय व्यवहार व नाणीं | भारत इ. संशोधक मंडळ त्रैमासिक | वर्ष १५ (अंक १) (पृ. १-१५)१९३४ |
| (१४) पुराणांतील वंशावळी काल-निर्णयाला उपयोगी आहेत काय? | ,, | १९.२ (१९३८) |
| (१५) वेदांतील नष्ट झालेले कांहीं वर्णोच्चार | ,, | २३.१ (१९४३) |
| (१६) सिद्धेश्वर, अमृतेश्वर, ओंकारेश्वर मंदिरें कोणीं व केव्हां बांधलीं | ,, | १८.२ (१९३७) |
| (१७) वैदिक वाङ्मयांतील रंगादि-कांचें लेखन व उच्चारण | ,, | २१.३ (१९४०) |
| (१८) कोणत्याहि भाषेला स्वर असतात | ,, | २२.३-४ (१९४२) |
| (१९) मधुविद्या | समर्थ मासिक | |
| (२०) उच्चार, स्वर, हस्तस्वर आणि लेखन | ज्ञानेश्वर | वर्ष ५ अंक ४ (१९५३) |
| (२१) प्राच्यविद्या | केसरी-प्रबोध | १९३१ |
| (२२) लोकमान्यांच्या आठवणी | भाग १, २, ३ | |
| (२३) केळकरांच्या आठवणी | संस्कृत | |
| (२४) वैशाचारवारिंशशब्दौ | प्राच्यविद्यापरिषद अहमदाबाद | १९५३ |
| (२५) व्याकरणासगृहीतः प्लुतः | ,, | |

# धन्यवाद

ॐ

श्रीमान् सिद्धेश्वरशास्त्री चित्राव हे सुप्रसिद्ध कार्यकर्ते आहेत. त्यांचें कार्यक्षेत्र बहुविध आहे. व्याकरणमुनित्रयाख्या सर्व ग्रंथांची पदसूची, ऋग्वेद-संहितेचें संपूर्ण मराठी भाषांतर, प्राचीन, मध्य आणि अर्वाचीन चरित्रकोशाचे तीन खंड असें त्यांचें महत्त्वाचें लिखाण प्रसिद्ध झालें आहे. ऋक्प्रातिशाख्य इत्यादि कांहीं ग्रंथांचें भाषांतर अद्यापि लिखित स्थितींतच आहे. हे परिवर्तन-वादी पंडित असून त्यांनीं अनेकानेक शुद्धिकार्ये केलेलीं आहेत. अनेक संस्थां-मध्यें त्यांनीं कार्य केलें आहे आणि करीत आहेत. यापुढेंहि त्यांचे हातून अनेक कार्यें होणार आहेत. त्यांना आरोग्यसंपन्न दीर्घायुष्य प्राप्त होईल. त्यांना धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच होतील.

वाई केवलानन्दसरस्वती

---

## चित्रावशास्त्रिणां गुणगौरवम्

वेदानामुपबृंहणं समुचितं देशीगिरायां सुधीः
कृत्वा सायणपंडितस्य पदवीं यः प्राप विद्वद्गणे ।
सद्योमध्यपुराणकाल–चरितं कोशत्रये योऽवदत्
वन्दे व्यासविशालबुद्धिममलं सिद्धेश्वरं शास्त्रिणम् ॥

भणे इत्युपाह्वः श्रीहरिसूनुर्माधवः

# अभीष्ट-चिन्तन

पुणें येथील सुप्रसिद्ध पंडित विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा, आतापर्यंत त्यांनीं केलेल्या देश आणि वाङ्मयसेवेबद्दल सार्वजनिक रीत्या सत्कार होत आहे याबद्दल मला फार आनंद वाटतो.

चित्रावशास्त्री यांनीं प्राचीनपरंपरेप्रमाणें शास्त्राध्ययन केलें, पण लवकरच त्यांची दृष्टि अधिक व्यापक होऊन अर्वाचीन पाश्चात्य व पौर्वात्य पंडितांनीं संस्कृत ज्ञानमहोदधीचें "संशोधनाचा" मंथनदंड लावून जें मंथन चालविलें आहे तिकडे गेली. व तशी वृत्ति प्राचीन पंडितांनीं स्वीकारून संस्कृत विद्येच्या आत असलेल्या ज्ञानाचा प्रसार भारतवर्षांत व इतर सुधारलेल्या जगतांत केल्यास उत्तम होईल अशा विचाराचा त्यांच्या मनावर पगडा बसला. त्यांच्या विचारांत प्रागतिकत्व आहे व तें संस्कृत ग्रंथांचा सखोल अभ्यास व प्रस्तुत परिस्थितींचें सम्यक् परीक्षण करून कायम केलें आहे. ते प्रभावी वक्ते आहेत, पण अत्यंत निगर्वी व मनमिळाऊ असल्यामुळें ते मोठे पंडित आहेत ही कल्पना त्यांना प्रथम भेटणारांना येत नाहीं किंवा आपण ज्यांना भेटलों, सुप्रसिद्ध वेदभाषान्तरकर्ते, निकालखंड कोशनिर्माते विद्वद्वर्य सिद्धेश्वरशास्त्री चित्राव ते हेच हें त्याला सांगूनसुद्धां खरें वाटणार नाहीं. हें मी काल्पनिक वर्णन करीत नाहीं. दिल्लीला कै. तात्यासाहेब केळकरांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या हिंदुसभेच्या अधिवेशनास ते उपस्थित होते. मी पण होतों. त्यांना आर्यसमाजी पंडित येऊन भेटले, पण शास्त्रीबुवांनीं आपणहि एक शास्त्री आहोंत ही कल्पना आपल्या क्षेमकुशलपर प्रश्नोत्तरात येऊं दिली नाहीं. मी जेव्हां त्यांच्यापैकीं एकदोन माझ्या परिचयाच्या पंडितांस सांगितलें, "आप जिनसे वार्तालाप कर रहे थे वह हमारे महाराष्ट्रके धुरंधर पंडित हैं। महर्षि दयानंदजीके सदृश ऋग्वेदका महाराष्ट्र अनुवाद करनेवाले, बहोत उच्च श्रेणीके प्रवचनकार एवं प्रभावी वक्ता हैं। न्यायमीमांसा इत्यादि दर्शन ग्रंथोंसे वह परिचित हैं। महाराष्ट्रसे जो प्रतिनिधि आये हैं उनमें सबसे अधिक विद्वान् तथा अधिकारी हैं।" माझे तोंडून हीं वाक्यें ऐकल्यावर ते लगेच शास्त्रीबोवाबरोबर पुन्हा येऊन बसले व त्यांच्याशीं संभाषण विशेष आगत्य दाखवूं लागले. चित्रावशास्त्र्यांनीं डोक्यावर फेटा घालून पागोट्याचा त्याग केला व कोट घालून शालजोडीस रजा दिली. त्यामुळें पुष्कळांस त्यांच्या फेट्याच्या आत असलेल्या विद्याविभूषित बुद्धीचा सहसा पत्ता लागत नाहीं व मोकळ्या शालजोडीच्या ऐवजीं गुंड्यांबंद कोटाचें आच्छादन पोटावर असल्यामुळें त्या बृहदुदरांत किती कोश सांठवलेले आहेत याचाहि अंदाज सहसा होत नाहीं. म्हणूनच त्यांच्या साध्या राहणीनें त्यांची विद्वत्ता अधिक आकर्षक व प्रभावशाली झाली आहे.

पांडित्याच्या वृथाभिमानानें 'विद्या विवादाय' म्हणून यज्ञोपवीताग खड्ग बांधून, वादांत अपप्रयोग अथवा अपभ्रष्ट शब्द मुखांतून निघाल्यास या खड्गानें मी जिव्हाच्छेद करीन अशी गर्जना करीत देशभर संचार करण्याचा व दिग्विजय व अजिंक्यपत्रें मिळविण्याचा काळ आतां निघून गेला, हल्लीचा काळ पंडितांनी ओळखायला पाहिजे. यावज्जन्म विद्याभ्यास करून शास्त्रीय ज्ञानांत नवीन विचारांची भर घालणाऱ्या व दुर्लभ ज्ञान लोकांस सुलभ करणाऱ्या पंडितांची या काळांत जास्त जरूर आहे. चित्रावशास्त्र्यांनीं हा कालमहिमा ओळखला व त्या मार्गानें ते विशेष गवगवा न करतां एखाद्या श्रद्धावान यात्रेकरूप्रमाणें आपली वाट चोखाळींत आहेत; यांतच त्यांचा मोठे-पणा आहे; हेंच त्यांचे मार्गदर्शकत्व आहे.

चित्रावशास्त्री यांनीं विशेषतः वैदिक वाङ्मयाचा सखोल अभ्यास करून, त्याचा लोकांत प्रसार करण्याची फार मोठी कामगिरी केली आहे. महाराष्ट्रीय ज्ञानकोशांतील वैदिक विभागासंबंधींचें त्यांचें कार्य सर्वश्रुत आहेच. त्याच-प्रमाणें त्यांनीं प्रथमतः ऋग्वेदाचें संपूर्ण भाषांतर प्रसिद्ध करून, वैदिक संस्कृ-तीचा हा आद्य ग्रंथ महाराष्ट्रीयांस उपलब्ध करून दिलेला आहे.

प्राचीन, मध्ययुगीन आणि अर्वाचीन कोश प्रसिद्ध करून भारतवर्षा-तील प्रसिद्ध व्यक्ति, ऐतिहासिक स्थळें आणि पवित्र स्थानें यांचा वैदिक काला-पासून आजपर्यंतचा इतिहास त्यांनीं लोकांसमोर ठेवला आहे. त्यांचे हे ग्रंथ जर युरोपियन भाषांतून प्रसिद्ध झाले असते तर जगांतील पांचसात विश्वविद्यालयां-तून त्यांना डॉक्टरेटची पदवी समर्पण करण्यात आली असती. अजूनहि त्यांचा व्यासंग सुरू आहे. ऋग्वेदावरील विषयविवेचनात्मक ग्रंथ तयार करण्यांत ते अहोरात्र परिश्रम करीत असतात. अशा या थोर, वेदविद्यानिपुण, कर्तबगार पंडिताचा गौरव महाराष्ट्रीयांनीं यापूर्वीच करावयास पाहिजे होता. त्यांचा उचित गौरव म्हणजे त्यांच्या हातून अद्याप जी कामगिरी व्हावयाची आहे त्याकरितां त्यांना सर्व प्रकारें सहकार्य करण्याचें आश्वासन देऊन शक्य तितक्या लवकर त्यांच्याकडून तें करवून घेणें हें होय.

परमेश्वर त्यांच्या कार्याची प्रगति करो, त्यांना दीर्घायुरारोग्य देवो व निर्विघ्न व निश्चिंतपणें काम करण्याची आणि भारतीय संस्कृतीची याहिपेक्षा अधिक उज्ज्वल सेवा करण्याची संधी देवो अशी मी परमेश्वरचरणीं अनन्य-भावानें प्रार्थना करितों.

३४२ सदाशिव पेठ, पुणें २
डॉ. नूलकर यांचा वाडा



माधव श्रीहरि अणे

# गुणगौरव

विद्यानिधि श्री. चित्रावशास्त्री यांनी अनेक क्षेत्रात केलेल्या कामगिरीची मला माहिती आहे अशा विद्वान् व संशोधकवृत्तीच्या कार्यकर्त्याच्या गौरवात मी सहभागी आहे. महामहोपाध्याय काणे यांच्यासारखे विद्वानच विद्वानाचे परिश्रम जाणू शकतात.

मुंबई बा. गं. खेर

विद्यानिधि चित्रावशास्त्री हे एक अबोल पण अमोल विद्वद्रत्न आहे. त्यांनी केलेले कार्य पहाता त्याला मिळालेली प्रसिद्धी ही फार अल्प आहे. तथापि संशोधनक्षेत्रांत जे विशेष काम करणारे आहेत ते त्यांची योग्यता जाणतात. संस्कृत विद्या व संस्कृत भाषा या दोहोंची त्यांनी केलेली सेवा लक्षात भरण्यासारखी आहे अनेकांची चरित्रे लिहून त्यांनी त्यांना अमर केले आहे. निःस्पृह व निरपेक्ष विद्याव्यासंग ही जी महाराष्ट्रीय सुशिक्षितांची आणि साहित्यिकांची परंपरा ती त्यांनी उज्ज्वलपणे चालविली आहे. अनेक चळवळींत पडून एकाकीपणा त्यांनी टाळला, मतभेद स्पष्ट करून सौजन्याचे वातावरण कायम राखले, जुनी श्रद्धा कायम ठेवून नव्या विद्येला अवमानिले नाही.

आज त्यांचा होणारा गौरव माझ्यासारख्या त्यांच्या समकालीनांना आपला आहे असे वाटते, यातच त्यांच्या जीवनाचे सार आहे. ईश्वर त्यांच्या हातून अधिक श्रेष्ठ असे कार्य घडवून आणो ही इच्छा.

नवी दिल्ली न. वि. गाडगीळ

———

# शुभ-संदेश

विद्यानिधि श्री. चित्रावशास्त्री याच्या षष्ट्यब्दपूर्ति-समारंभाचे वेळीं त्यांच्यासंबंधीं आम्हाला वाटणारा आदर व्यक्त करणें हें आम्ही आपलें परम कर्तव्य समजतों. वे 'विद्यानिधि' या बहुमोल पदवीनें विभूषित असल्यानें त्यांच्या अगाध ज्ञानाची कल्पना कोणासही सहज येईल. श्री. चित्रावशास्त्री याचा वैदिक वाङ्मयाचा दीर्घ व खोल व्यासंग त्यांच्या ऋग्वेदाचें मराठी भाषांतर, प्राचीन चरित्रकोश इत्यादि अनेक मौलिक ग्रंथावरून सहज प्रत्ययास येतो. शास्त्रीबोवांच्या ओघवती, भरदार व तेजस्वी वाणीचा प्रत्यक्ष आस्वाद घेण्याची संधीहि आम्हास अनेकवार लाभलेली आहे. त्याची विषयमाडणी समतोल तशीच सुदृढ असल्यानें श्रोत्याच्या मनावर तात्काळ परिणाम होतो.

या शुभसमयीं शास्त्रीबोवाना दीर्घायुरारोग्य चिंतून त्याच्या हातून अशीच वैदिक-साहित्य सेवा घडो अशी इच्छा प्रदर्शित करतों.

लक्ष्मीविलास }
पुणें. }

राजा रघुनाथराव शकरराव पंडित
पंतसचिव, भोर

---

# अभिनन्दन

विद्यानिधि पडित सिद्धेश्वरशास्त्री चित्राव याचें मराठी भाषेला पुष्ट करण्याचें कार्य आज सतत दोन पिढ्या चालत आलेलें आहे. तें फार मोठें आहे. तें कार्य त्यानीं विद्वानाचें ध्येय आपल्यासमोर ठेवून गाजावाजा न करता केलेलें आहे. त्यानीं केलेलें ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषातर अत्यंत उपकारक झालेलें आहे. भारतवर्षीय चरित्रकोशमडळाद्वारें त्यांनीं प्रकाशित केलेले तीन खंड माहितीनें भरलेले आहेत. त्यांच्या हातून अशींच कार्मे पुढेंही होत राहून त्याना त्याकरितां दीर्घायुष्य लाभो अशी परमेश्वराची प्रार्थना कोणीही मराठी भाषेचा अभिमानी करील.

सरस्वती निकेतन }
इदूर }

मा. वि. किवे

---

# लेखक-परिचय

## भाग १

श्री. वेंकटेश लक्ष्मण जोशी, व्याकरण-काव्यतीर्थ, व्युत्पत्तिकोविद, साहित्यविशारद, जन्म-सन १९२२. संशोधक, धर्मकोश मंडळ, वाई ( १९-४५-४६ ) संस्कृत शिक्षक, हिंदु हायस्कूल, पाचगणी (१९४६-४८), रास्ता पेठ एज्यु. सोसा. हायस्कूल पुणें ( १९४८-५१ ), शास्त्री, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट पुणें ( १९५१ पासून ), मंत्री, राजनीतिकोश मंडळ, पुणें. लेखन—सिद्धान्तकौमुदींतील संशोधनार्ह स्थळें, संतवाङ्मयातील भावना; कालिदासाचा करुणरस, राजनीतिकोश कल्पना योजना दिशा.

श्री. केशवराव मारुतराव जेधे—जन्म सन १८९६. बहुजनसमाजातील तडफदार व तळमळीचे कार्यकर्ते, शिक्षण—इंटरपर्यंत. 'शिवस्मारक' (१९२३) 'मजूर' (१९२४) 'कैवारी' (१९२७) या साप्ताहिकांचे संस्थापक व संपादक. ब्राह्मणेतर चळवळीचे पुढारी. मध्यवर्ती कायदेमंडळांत प्रतिनिधि १९३५. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष; अनेक वेळा तुरुंगवास, स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर शेतकरी कामकरी पक्षाचे संस्थापक, नुकतेच त्या पक्षांतून राजीनामा देऊन निवृत्त.

श्री. गणपत महादेव नलावडे, जन्म ता. १०-२-१८९८. हिंदुसंघटनेचे प्रमुख कार्यकर्ते, संपादक 'संग्राम', पुणें म्युनिसिपालिटीचे अनेक वर्षे सभासद, अध्यक्ष ( १९४२ ), पुणें कॉर्पोरेशनचे सभासद, महापौर (१९५३). अध्यक्ष, महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभा ( १९५४ ).

श्री. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए. —जन्म ४ फेब्रुवारी १८९३. व्यवसाय-ज्ञानकोश कार्यालयांत सहसंपादक (१९१९-१९२८), शब्दकोशमंडळ ( १९२८-१९५१), नंतर स्वतंत्र लेखक. लेखन—(१) सहसंपादक—ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश, शास्त्रीय परिभाषाकोश, सुलभ विश्वकोश, महाराष्ट्र परिचय, डॉ. केतकरांचे सान्निध्य इ. (२) स्वतंत्रग्रंथ—मानवी संस्कृतीचा इतिहास, आनंदीबाई पेशवे, आर्य आणि पाश्चात्य नीतिध्येयें ( भाषांतर ), दुध व दुभती जनावरें (भाषांतर) इ. (३) अनेक नियतकालिकांतून लेख. कांहीं ग्रंथांचें संपादन. सार्वजनिक कामें—१९२० सालीं पुण्यास 'सरस्वती मंदिर' या

शिक्षण संस्थेची स्थापना. चिटणीस–महाराष्ट्र साहित्य परिषद, भा. इ. सं. मंडळ, १९४९ पासून पुणें विद्यापीठाच्या कोर्टाचे समासद.

श्री. शंकर रामचंद्र दाते, बी. ए. जन्म स. १८९८. महाराष्ट्र हिन्दुसभेचे एक प्रमुख कार्यकर्ते. दै. 'काळ'चे संपादक. इंग्लंडमध्यें जाऊन देवनागरीचें नवीन मोनोटाइप यंत्र तयार केलें.

श्री. दत्तात्रेय गोपाळ फडके, बी. ए., एल्एल्. बी. जन्म ता. ८-८-१८९३ १९१८-२१ नोकरी मिलिटरी फायनान्स, पुणें, १९२१-२३ कॉंग्रेस प्रचार, १९२३-३३ वकिली–पुणें, १९२३-५४ सरस्वती मंदिर संस्था समासद, हल्लीं कार्याध्यक्ष, १९२४-५४ पुणें सार्वजनिक सभा–समासद, सहा वर्षे कार्यवाह, हल्लीं कार्याध्यक्ष, १९३४-५४ वेदशास्त्रोत्तेजक सभा समासद, गेलीं तेरा वर्षे कार्यवाह, इतर अनेक संस्थांचे कार्यकारी समासद.

भाग २

श्री. क. वे. कृष्णमूर्ति शास्त्री, जन्म ता. २० ऑगस्ट १९००, व्याकरणविद्वान्, १९२३-१९४८ शास्त्री, भा. ओ. रि. इ. -महाभारत विभाग, १९४८ पासून–शास्त्री, डेकन कॉलेज डिक्शनरी डिपार्टमेंट, संस्कृत कवि.

पं. राजेश्वरशास्त्री लक्ष्मणशास्त्री द्रविड. बनारस, जन्मः–सन १९०० भारतीय कीर्तीचे प्राचीन शास्त्रांतील महापंडित. वर्णाश्रम स्वराज्य संघाचे एक आधारस्तंभ, काशींतील सांगवेदविद्यालयाचे संस्थापक व प्रमुख संचालक. अनेक विद्वत् परिषदांचे व पंडित परिषदांचे अध्यक्ष, नेते, प्रवर्तक; न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र या विषयांत गाढ पांडित्य; पट्टीचें वक्तृत्व व वादविवादकौशल्य.

डॉ. सुमित्र मंगेश कत्रे, एम्. ए. पीएच. डी., डायरेक्टर, डेकन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट् अॅण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणें ( १९४२ पासून ). जन्म ता. ११ एप्रिल १९०६. संस्कृत–प्राकृत भाषांचे प्रोफेसर (वाडिया कॉलेज १९३३-३४; स. प. कॉलेज १९३७-३९; डेकन कॉलेज १९३९-४२ ) संस्कृत बृहत्कोशाचे प्रधान संपादक, संपादक–न्यू इंडियन अॅंटिक्वेरी; ओरिएंटल लिटररी डायजेस्ट; विद्वानांचे अभिनंदन-ग्रंथ. प्राच्यविद्यापरिषदेंत भाषाशास्त्रविभागाचे अध्यक्ष. लेखनकार्य–फॉर्मेशन ऑफ कोंकणी; इन्ट्रोडक्शन् टु इण्डियन् टेक्स्चुअल् क्रिटिसिझम्; प्राकृत लॅंग्वेजेस् अॅण्ड देअर कॉंट्रिब्यूशन टु इण्डियन कल्चर.

श्री. नारायण गोविंद चापेकर, बी. ए., एल्एल्. बी., बदलापूर. रिटायर्ड फर्स्टक्लास सबजज्, समाजशास्त्रीय चिकित्सक. जन्म ५ ऑगस्ट १८६९ मुंबई. लेखनकार्य–वर्कचें चरित्र, पैसा, गच्चीवरील गप्पा, बदलापूर, चित्पावन,

तर्पण, साहित्यसमीक्षण, पेशवाईच्या सावलींत, हिमालयांत, काश्मीर इ. संपादन—साहित्यपत्रिका (१० वर्षे). सार्वजनिक कार्य—बडोदा सा. सं.चे अध्यक्ष, म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष (८ वर्षे); रत्नागिरी येथील चित्पावन ब्राह्मण सभेचे अध्यक्ष; भा. इ. सं. मंडळाच्या कार्यकारी मंडळाचे सभासद.

श्री. परशुराम कृष्ण गोडे, एम्. ए., पुणे. जन्म—११ जुलई १८९१. देवरुख (जि. रत्नागिरी). १९१८ ते १९१९ इंडियन् वुइमेन्स युनिव्हर्सिटींत इंग्लिश आणि संस्कृतचे प्रोफेसर. भांडारकर ओ. रि. इन्स्टिट्यूटमध्ये १९१९ पासून क्यूरेटर. लेखनकार्य— १९१६ ते १९५२ पर्यंत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास व कालनिर्णय आणि हिंदु संस्कृतीचा इतिहास यासंबधीं संशोधनात्मक निबंध चारशें तीस (सुमारें ३५०० पानें).

पं. अनन्त गोपाळ फडके, जन्म भाद्र. शु॥ १४ शके १८२२ पाचवड (वाई). प्रारम्भिक अध्ययन—इंग्रजी, मराठी, तुळशीबाग शाळा, मावेस्कूल सातारा. वेद व संस्कृत—वैदिक धर्मोधर्म संस्कृत पाठशाळा (पुणें). १९१९ काशींत आगमन, १९२६ सालीं व्याकरणाचार्य, (गव्हर्मेंट संस्कृत कॉलेज काशी), १९२९ मीमांसातीर्थ (कलकत्ता), वेदान्तकेसरी (विद्वत्परिषद, काशी), १९३० सालीं गव्हर्मेंट संस्कृत कॉलेजमध्ये पुराणेतिहास व भक्तिशास्त्र यांचे प्राध्यापक म्हणून नेमणूक. तेव्हापासून अध्यापन कार्य. विद्यार्थी व्याकरण, पुराणेतिहास, धर्मशास्त्र इत्यादि विषयात आचार्य झालेले. १९५३ संस्कृत विश्वपरिषदेचा प्राध्यापक म्हणून नेमणूक. उत्तर प्रदेशात संस्कृतचें प्रचारकार्य. ग्रंथलेखन—१. भूषण टिप्पण, २. भगवन्नाममाहात्म्यसंग्रहटीका, ३. भक्त्यधिकरणमाला—टीका, ४ वेदविषयक विविध निबंध. पुराणसंशोधन.

पं. लक्ष्मणशास्त्री जोशी मुरगुडकर "व्याकरणरत्न" "विद्वद्रत्न" जन्म आषाढ शु. १२ शके १८१३—सेवानिवृत्त शास्त्री. व्याकरण-मीमांसा-शास्त्रांतील निष्णात पंडित. अध्यापन १९२४-१९२९ मुख्याध्यापक, संस्कृत विद्यापीठ नाशिक, १९३०-१९३३ मुख्याध्यापक, प्राज्ञपाठशाळा, वाई. १९३४-१९४९ मुख्याध्यापक, राजकीय संस्कृत शाला, इचलकरंजी. लेखनः—(१) पुराणें व उपपुराणें (वेदशास्त्रदीपिका) (२) लो. टिळकचरितम् (काव्य) (३) वृहच्छब्देन्दुशेखराचें संपादन चालू. परीक्षक—वे. शा. सभा, पुणें. (व्याकरण व मीमांसा)

१४ श्री. गणेश हरी खरे, क्यूरेटर, भा. इ. स. म., इतिहास संशोधक, पुणें. जन्म १० जानेवारी १९०१. असहकारितेच्या चळवळींत कॉलेज शिक्षण बंद. १९२९ पासून पुण्याच्या भा. इ. सं. मंडळांत कार्य. ३४ पुस्तकें व

२१५ लेख प्रसिद्ध झाले आहेत. सध्यां 'मराठी इतिहासाची विस्तृत शकावली', 'मातृकोपासना' याचें संशोधन चालू आहे. फारसी, कानडी, आरबी, उर्दु, संस्कृत, प्राकृत इत्यादि भाषांचा व्यासंग. इ. स. १९५१ सालीं इंडियन् हिस्ट्री कॉंग्रेसच्या जयपूर अधिवेशनांत पूर्व मध्ययुगीन इतिहास विभागाचे अध्यक्ष.

श्री. यशवन्त गणेश फफे मनोहर, जन्म १८७९. ट्रेन्ड शिक्षक, मॅट्रिक सेवानिवृत्त शिक्षक, ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन पुणें. लेखनकार्य–महाभारताचें सुरस मराठी भाषांतर, सुमारें ½ भाग. व्युत्पत्तिदीपिका इ. शालोपयोगी अनेक पुस्तकें, इतिहास व संशोधनविषयक अनेक लेख.

श्री. पांडुरंग श्रीधर आपटे, बी.ए., जन्म सन १८८७. लेखनकार्य– (१) पंडित जवाहरलाल, (२) साने गुरुजी, (३) टिळक, (४) गांधी, (५) श्रीकृष्ण (६) पुढारी–अनुयायी, (७) खेड्यांची सेवा, (८) कुटुंबजीवन, (९) शिष्टाचार, (१०) कथासंग्रह (लहानमोठे तीन), (११) राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास, (१२) सेनापति बापट यांचें चरित्र. महात्मा व लोकशिक्षण या मासिकांत लेख. सामाजिक राजकीय कार्य–येवल्याच्या राष्ट्रीय शाळेंत ११ वर्षें मुख्याध्यापक, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ कार्यकारी मंडळाचे सभासद ५ वर्षें ग्रामसेवा कॉंग्रेसच्या कार्यांत व चळवळींत १९२१ पासून १९४८ पर्यंत भाग. पुणें येथें लोकशिक्षण समितीचे ६ वर्षें सभासद. कार्यकर्त्यांच्यासाठीं बौद्धिकवर्ग.

श्री. वसंत गजानन राहुरकर, एम् ए., बी टी. पुणें. जन्म २५ फेब्रुवारी १९१९. भाऊ दाजी व प्रा. आचार्य पारितोषिकें १९४५ ते १९४९ एम्. ई. एस्. कॉलेज पुणें येथें संस्कृत व अर्धमागधीचे प्राध्यापक. सध्या पुणें विद्यापीठांत संस्कृत विभागांत डॉ. आर. एन्. दांडेकर यांच्या नेतृत्वाखालीं वैदिक विषयावर संशोधन. महाविद्यालयोपयुक्त संस्कृत व अर्धमागधी पाठ्यपुस्तकांचे संपादक. मराठी व इंग्रजीमध्यें संशोधनात्मक लेख.

श्री. चिंतामण गणेश काशीकर, वाङ्मयपारंगत, सन्मान्य कार्यवाह, टि. म. विद्यापीठ पुणें, संस्कृताध्यापक, आयुर्वेद महाविद्यालय, पुणें सहमंत्री, वैदिक संशोधन मंडळ, पुणें, जन्म १७ ऑगस्ट १९१० सातारा. लेखन व संपादन कार्य–ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास, ऋग्वेदसंहिता सायण भाष्यासह, 'इंडियन मेडिसिन' या जर्मन ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर, आयुर्वेदीय पदार्थविज्ञान, भारतीय विद्याविषयक इंग्रजी व मराठी संशोधनपर लेख.

डॉ. रामकृष्ण गणेश हर्षे, बी. ए. (टिळक) डी. लिट् (पॅरिस) पुणें. जन्म २८ आक्टोबर १९०० मु. खडाळें, (उ. सातारा) लेखनकार्य–गोविंदाग्रज,

तुकाराम: टीका आणि अभ्यास, भगवद्गीता व्याख्यान : ज्ञानदेवी अध्याय १ (चिकित्सक आवृत्ति.) सार्वजनिक कार्य–राष्ट्रीय शिक्षण (१९२० ते ३१), आजीव सदस्य, टिळक महाविद्यालय पुणें (१९२४ ते ३१); कार्यवाह, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ (१९२६ ते १९३१), मंत्री, वैदिक संशोधन मंडळ, पुणें (१९२८ ते १९३१); संपादक 'रत्नाकर' (१९३२); प्रमुख, नवीन समर्थ विद्यालय (१९३४ ते ३६), संचालक–फ्रेंच संस्कृति मंदिर (१९३८); रजिस्ट्रार, डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिटयूट, पुणें (१९३९ पासून). संशोधनात्मक लेख.

प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर बी. ए. मराठ्यांच्या इतिहासाचे प्राध्यापक, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट, पुणें, मराठ्यांच्या इतिहासाचे गाढ अभ्यासक व विख्यात टीकाकार. लेखनकार्य–पानिपत; मराठ्यांच्या इतिहासावर शोधनिबंध.

श्री. मुरलीधर गजानन पानसे; बी. ए. पीएच्. डी. जन्म सन १९१८ ज्ञानेश्वरींतील भाषाशास्त्रीय वैशिष्टयें व बृहत्सूची या ग्रंथाचे लेखक. (१९४७-४९) मुंबई येथील रुइया कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट पुणें, येथें संशोधक (१९४९ पासून).

श्रीपाद महादेव माटे, एम्. ए. जन्म सन १८८६. स. प. कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक (निवृत्त). लेखनकार्य–अस्पृश्यांचा प्रश्न, उपेक्षितांचें अंतरंग, पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ, अनामिका, साहित्यधारा, परशुराम-चरित्र, विचारशलाका, आजकालचे विद्यार्थी; बारा शाळस, श्रेष्ठांचें वैवाहिक जीवन इ. संपादनः– केसरी-प्रबोध; केळकर; महाराष्ट्र सांवत्सरिक (तीन वर्षे); विज्ञानबोध, हिंदु समाजदर्शन, डॉ. भडकमकर चरित्र. इ. सार्वजनिक कार्य--अस्पृश्यता निवारणाच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग (२० वर्षे); मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (सांगली १९४३); महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष; मराठींतील उत्तम लेखक.

डॉ. एकनाथ दत्तात्रय कुलकर्णी, एम्. ए पीएच्. डी. जन्म ता. १४ मे १९१४; उपसंपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज इन्स्टिटयूट, पुणें. भाऊ दाजी प्राइझ; मंडलीक प्राइझ, संस्कृत व भाषाशास्त्राचे अध्यापक, लेखनकार्य-शालिहोत्र; इंग्रजी नियतकालिकांतून संशोधनपर निबंध.

———

शरीरयष्टि, प्रसन्न चेहरा आणि तें नुकतेंच साफ केलेलें डोकें पहातांच भेटावयास आलेला मनुष्य जरा गांगरतोच. त्यांत कारणाशिवाय बोलण्यास नाखुषी दर्शविणारी त्यांची वृत्ति दिसतांच त्यांच्याशीं कसें असा प्रश्न जाणारापुढें पडतो. पण एकदां व्यावहारिक आवरण बाजूस सारिल्यावर चर्चा सुरु झाली कीं त्यांच्यासारखा माहितगार व मोकळा मनुष्य अशी भेटणाराची खात्री पटल्याशिवाय रहात नाहीं.

आहेत संसारी पण वातावरण विरक्तच. अनेक व्याप असलेले सदा रिकामे. सुधारकांनाहि विचारानें मागें टाकणारे पण वृत्तीनें धार्मिक. बाह्यतः कठोर पण अंतःकरणाचे मृदु. सर्वांचें निष्ठुर परीक्षण करणारे साधुसंतांचे चहाते. चारित्र्यानें शुद्ध पण दुश्चरितांचा अनादर न करणारे. तत्त्वज्ञानी पण रसिक, वैयाकरणी पण कलाभिज्ञ. इतिहाससंशोधक पण प्रा. भावन्त. अशा परस्पर विरोधी गुणांचा समुच्चय शास्त्रीबोवांमध्यें प्रकर्षानें आढळून येतो.

शास्त्रीबोवांच्या जीवनकार्याचें साकल्यानें अवलोकन केलें असतां चिकित्सक संशोधकाचा समतोलपणा, परिवर्तनशील धर्मवादी सुधारकाचा तत्त्वनिष्ठ आग्रहीपणा व युयुत्सु सामाजिक कार्यकर्त्यांचा भेदक नि आक्रमक प्रचारपणा यांचा विलक्षण समन्वय शास्त्रीबोवांच्या बुद्धिमत्तेंत झालेला दिसून येतो. संस्कृत विद्वान्, एक चिकित्सक संशोधक, परिवर्तनशील धर्मवादी सुधारणांचे पुरस्कर्ते, अहिंदूंच्या शुद्धीकरण चळवळीचे एक आधारस्तंभ, १९२४ ते १९३६ या एका तपांतील महाराष्ट्रांतील हिंदुसभेचे पुढारी अशा विविध रीतीनें शास्त्रीबोवांनीं महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक व संशोधनात्मक क्षेत्रांत महत्त्वाची भर टाकलेली आहे.

## बालपण व शिक्षण

अरे हें पाहिलेंचि पहावें । विवरलेंचि मागुती विवरावें ।

वाचिलेंचि वाचावें । पुन्हां पुन्हां ॥ दासबोध

शास्त्रीबोवांचा जन्म मिति पौष व॥ ११ शके१८१५ ( ता. १ फेब्रुवारी १८९४)या दिवशीं एका कुलशीलसंपन्न देशस्थ ब्राह्मण घराण्यांत झाला. पुण्याजवळच्या पाषाण गांवांत त्यांच्या बालपणांतलीं बरींच वर्षे गेलीं. त्यामुळें खेड्यांतील रहाणीशीं त्यांचा आपलेपणाचा संबंध आहे. वयाच्या दहावे वर्षी पुणें शहरांतील

[त्य]ांचा कायमचा संबंध जोडला गेला. धडफळे घराण्यांतून ते चिंत्राव घराण्यात [दत्त]क म्हणून आले आणि पुण्यांतील अमृतेश्वर देवस्थानाशीं त्यांचा संबंध [का]यम झाला.

त्यावेळीं पुण्याला प्लेग दरवर्षी बिनचूक भेट देत असे. त्यांत त्यांच्या [घरा]तील एक एक माणसाचा बळी जाऊन अगदीं पोरकेपणा आला. आईचेंहि [छ]त्र नाहींसें झालें. ल्हान अल्पवयी भावंडें, आर्थिक स्थिति न सांगण्यासारखी [आ]णि दत्तक गेल्यामुळें कोर्टदरबारचीं खेंगटीं मागें लागल्यानें ऐन शिक्षणाचे [दि]वस मार्गदर्शनाच्या अभावीं अत्यंत कष्टांत गेले.

ज्याना कोठेंहि आश्रय नसेल त्याना वेदाच्या व शास्त्रांच्या शाळा मोफत शिक्षण देण्यास तयार असत. त्यांत "पुढें काय !" हा प्रश्न सतत भेडसावीत नसल्यानें फारसे विद्यार्थी येत नसत व आलेले फार दिवस टिकतहि नसत. या वेदशास्त्राच्या पाठशाळा, अशा कामाकरितां जमविलेल्या निधींतून चालत असत. छोट्यामोठ्या संस्थानांत राजे लोकांच्या ऐश्वर्यांतील हा एक भाग समजला जाई. या पाठशालांतील विद्यार्थ्यांना पुढें नोकरीचाकरी मिळण्याचें आमिष बेतानेंच असे. पण वेदशास्त्रांत सगळें आहे अशा अभिनिवेशाचा व सांप्रदायिक श्रद्धा वाढविणाऱ्या पारमार्थिक खुराकाचा वर्षाव मात्र तरतरी उत्पन्न करी व आजहि मोडकळीस आलेल्या या परंपरेंत थोड्याफार फरकाने हेंच कार्य चालू असल्यानें दिसून येईल.

तेथें कांहीं आदर्श विद्याव्यासंगी असत. पण बहुतेक भरणा बुभुक्षितांचा. तिथिवारपर्वणीला भोजनाचीं आमंत्रणें येत. सुग्रवस्तु व मिळवत्या घरात पूजादि निमित्तानें एखाद्या विद्यार्थ्याची सर्व सोय करण्याची प्रवृत्ति त्या-वेळीं विशेष दिसून येई. कांहीं धर्मशील धनिकांच्या घरीं वैदिक, शास्त्री व त्यांचे विद्यार्थी याना भोजनाच्या बाबतींत मुक्तद्वार असे. मग त्यात एकादा होतकरू बुद्धिमान् तरतरीत विद्यार्थी असल्यास त्याचा तेथें अग्रहक्कच मानला जाई.

अशा अशाश्वत व परावलंबी स्थितींतूनहि कांहीं बुद्धिमान्, मेहनती व काळाचीं पावलें ओळखणारीं माणसें मार्ग काढीतच असतात. त्याना समकालीन समाजांत स्वतःच्या गुणांनीं व विद्वत्तेनें मान्यता व स्थैर्यहि संपादन करतां येतें. पण या कामीं त्यांना मिळालेल्या शिक्षणापेक्षा त्यांच्या वैयक्तिक गुणानाच श्रेय दिलें पाहिजे. हें आपण चाळीस पंचेचाळीस वर्षांपूर्वीच्या परिस्थितीचें अव-लोकन करीत आहोंत. आज त्याहिपेक्षा शोचनीय अवस्था या परंपरेंत निर्माण झाली असून ही सर्व संस्थाच अधिकाधिक निष्प्रभ होत चालली आहे.

# विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

## — एक आदर्श पंडित —

( श्री वें. ल. जोशी )

पवित्र नद्यांच्या तीरावर ऋषि मुनि तप करीत बसलेले असतात व त्यांच्या तपाच्या प्रभावानें भोंवतालीं सर्व वातावरण उदात्त झालेलें असतें. या तपाचा प्रमुख उद्देश ज्ञानसाधना हा असतो अशी अखंड ज्ञानसाधना चालू असलेल्या तपोभूमि सर्वांनाच नेहमीं वद्य व रमणीय वाटतात. कारण मनुष्यमात्राची वा राष्ट्राची खरी संपत्ति विचारप्रधान ज्ञानच होय अशी ज्ञानाची अखण्ड उपासना ज्या ठिकाणीं चाले तें आश्रम, व या आश्रमांतून तपस्या करणाऱ्या उपासकानाच ऋषि किंवा मुनि ही प्राचीन काळातील संज्ञा आहे.

आजच्या काळातहि अशीं पवित्र स्थळें क्वचित् आढळतात. त्यापैकीं एकाचा परिचय करून देण्याचा सुयोग आज मला लाभला ही गोष्ट मी मोठ्या भाग्याची समजतों.

पुणें शहर विद्येचें माहेरघर म्हणून प्रसिद्ध आहे. तेथें इतर वैभव फारसें आढळणार नाहीं, पण विद्यावैभवाची कमतरता मात्र किंचितहि भासणार नाहीं. विद्यार्जन करण्याकरितां हाटाचीं वाडे करणारे विद्यार्थी, विद्यादान करण्याकरिता सर्वस्व वेंचणारे निष्ठावत अध्यापक, त्यानीं स्वार्थत्यागपूर्वक चालविलेल्या शिक्षणसंस्था व आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या ख्यातनाम संशोधकाचीं संशोधनकार्यें या पुण्यक्षेत्रांत विपुलतेनें पहावयास मिळतील.

ज्ञानाच्या उपासनेंतील मुख्य भाग व परमसाध्य म्हणजे ज्ञानाच्या साक्षात्काराचें यथार्थ प्रकटीकरण कोणत्याहि मोहाला वश न होता किंवा लोकक्षोभाची पर्वा न करता आपले विचार निर्भयपणें मांडण्याच्या वार्तीलाह या शहरात बरेंच वरचें स्थान दिलें जातें. विचारांच्या विविध धारांचा जिवत प्रवाह पुणें शहरातून वाहत असल्याचा प्रत्यहीं अनुभव येतो याच परपरेंत वाढलेल्या एका विचारवतांचें जीवन व कार्य आपल्यापुढे मांडण्याचा येथें प्रयत्न केला आहे

पुणें येथें मुठा नदीच्या काठीं अमृतेश्वराचें एक मंदिर आहे. भोंवतालीं अनेक भव्य देवालयें असलेल्या एका छोट्या खोलींत चित्रावशास्त्रींचा कायमचा मुक्काम असतो पुस्तकांच्या सान्निध्यातच प्राय ते आढळतात म-५

गेल्या व चालू पिढींत आपल्या गुणांनीं समाजात चमकणारे शास्त्री, पंडित, या वातावरणातून पुढें आले व त्यांनीं शिक्षण, संशोधन, समाजकारण, धर्मकारण, राजकारण इत्यादि विविध क्षेत्रात महत्त्वाची कामगिरी बजावली. अशा कर्तृत्ववान् विचारवंतामध्यें विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचें स्थान फार मोठें आहे, यात कोणाचेंहि दुमत होणार नाहीं.

शिक्षणाच्या राजमार्गानें एक एक पायरी क्रमाक्रमानें चढून उच्च पद भूषविणारा एक वर्ग आणि कोणतीच अनुकूलता नसताना दुर्दम्य महत्त्वाकांक्षेच्या जोरावर येईल त्या संधीचा फायदा घेऊन आपलें कर्तृत्व दाखविणारा दुसरा वर्ग. आर्थिक विषमतेच्या काळांत हे दोन वर्ग सर्वत्रच दिसून येतात. यातील दुसऱ्या वर्गांत शास्त्रीबोवांची गणना करावी लागेल. अशा लोकांचें आयुष्य धागा तुटलेल्या पतंगाप्रमाणें हवेवर स्वैरसंचार करीत चाललेलें असतें. अशा परिस्थितींतून शिक्षण घेतघेतच शास्त्रीबोवानी आपला मार्ग आक्रमिला आहे.

पुणें वेदपाठशाळेंतील त्या वेळचे गुरुजी वेदमूर्ति माहुलीकर प्रभृति यांच्याकडे शास्त्रीबोवांनीं थोडें वेदाचें अध्ययन केलें. त्याचा परिणाम शास्त्रीबोवांच्यावर कायमचा झालेला दिसून येतो विद्येची उपासना प्राचीनकाळीं किती श्रद्धापूर्वक, निष्कामबुद्धीनें केली जाई याचीं अनेक उदाहरणें आपण वाचलीं आहेत. त्यांच्याच लहान आवृत्त्या आपणांस प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावयास मिळाल्या असें शास्त्रीबोवा मोठ्या अभिमानानें सांगत असतात.

विख्यात वैयाकरण पंडित रामशास्त्री गोडबोले यांच्याजवळ काहीं दिवस घालविण्याचा योग शास्त्रीबोवाना लाभला. त्यांनीं निष्ठापूर्वक, विनामूल्य विद्यादानाचें व्रत आजीव चालविलें होतें. त्यामुळें त्याकाळीं त्यांच्या घरीं विद्यार्थ्यांची छावणाच पडलेली असे, असें शास्त्रीबोवा सांगतात. अशा पंडितांनीं श्रद्धेनें व धर्मरक्षणाच्या कल्पनेनें वेदशास्त्राच्या अध्यापनाचें व्रत स्वीकारलेलें होतें म्हणूनच वेदशास्त्राची परंपरा गेलीं पांच हजार वर्षे अखंडपणें चालत राहिली व आपणापर्यंत येऊन भिडली. यापुढें या विद्यांचें संरक्षण कसें होणार हा प्रश्न सर्वच विचारवंताना भेडसावीत आहे असें शास्त्रीबोवा म्हणतात. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, पं. मुकुंदशास्त्री अडवर, पं. वासुदेव शंकर उर्फ नाना डेंग्वेकरशास्त्री यांच्याजवळ झालेल्या अध्ययनानें शास्त्रीय चिकित्सक वृत्ति आपणांस प्राप्त झाली याचा कृतज्ञतापूर्वक निर्देश शास्त्रीबोवा करीत असतात. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं अध्यापनाबरोबरच, मध्यें काहीं पिढ्या विश्रांति घेणाऱ्या महाराष्ट्रीय शास्त्रीय लेखणीला कामाला लावलें व

त्यातच चित्रावशास्त्रींच्या लेखनकार्यातील स्फूर्तीची बीजें आहेत असें आम्हास वाटतें.

शास्त्रीबोवांच्या या अध्ययन कालातील त्यांचे सहाध्यायी म्हणून पंडितप्राण भगवानशास्त्री धारूरकर व विद्वद्रत्न लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर यांचा उल्लेख करणें जरूर आहे. व्याकरण, मीमांसा आदि शास्त्रें शास्त्रीबोवांनीं या आपल्या सहाध्यायांबरोबर वाचलीं आहेत. पंडितप्राण भगवानशास्त्री धारूरकर हे महाराष्ट्रांतील सनातनी पक्षाचे गेलीं तीस वर्षे अध्वर्यु असून "शास्त्रांत अस्पृश्यता आहे कीं नाहीं" या विषयावर येरवडा येथें महात्मा गांधींशीं झालेल्या वादांत ते एक प्रमुख प्राचीन पंडित म्हणून चमकले. यांचें वेदांत, मीमांसा व धर्मशास्त्र या विषयांवर चांगलें प्रभुत्व आहे.

विद्वद्रत्न लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर यांनीं व्याकरण, मीमांसा व साहित्य या विषयांचें गेलीं तीस वर्षे सतत अध्यापन करून महाराष्ट्रांत शेकडों विद्यार्थी प्राचीन परंपरेनें पढविले. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्यानंतर महाराष्ट्रांत तरी एवढ्या संख्येनें विद्यार्थी कोणी पढविलें नाहींत. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांचें नाशीक येथील संस्कृत विद्यापीठ, वाई प्राज्ञपाठशाला, इचलकरंजी संस्कृत पाठशाळा या सर्व ठिकाणीं यशस्वी मुख्याध्यापक म्हणून यांना कीर्ति मिळाली. यांची अध्यापनशक्ति असामान्य असून व्याकरणमहाभाष्य व शास्त्रभाष्य यांच्या अध्यापनातील प मुरगुडकरशास्त्री यांचा लौकिक महाराष्ट्रांतील विद्वानांना पूर्ण परिचयाचा आहे. "आमच्यांत कांहीं तात्त्विक मतभेद असतानाहि विद्यार्थीदशेतील आपला स्नेह कायम आहे किंबहुना उत्तरोत्तर दृढच होत आलेला आहे" असें प विद्यानिधि चित्रावशास्त्री सांगतात.

वेद, शास्त्रें व त्यांचें संरक्षण या कामीं विद्वान् व श्रद्धाशील शास्त्रीपंडितांप्रमाणेंच धर्म व परंपरा यांचे जळावर कांहीं संस्था कार्य करीत असल्या तरी त्यांत उपयुक्तता किंवा मूलभूत दृष्टीचा प्रवेश झाला होता असें तत्कालीन परिस्थितीवरून दिसून येत नाहीं. उपयुक्तता सांगता येत नसल्यानें व्यवहारार्थी संबंध सुटत होता व मूलभूत दृष्टी नसल्यानें त्याला केवळ सांप्रदायिक घोकपट्टीचें स्वरूप त्या वेळींच येत चाललें होतें हें नमूद करणें जरूर आहे. कोणतेंहि नवे विचार किंवा आक्षेप ऐकताच, प्राचीन परंपरेनें शिकलेली मंडळी गोंधळून जाऊन केवळ अकांडतांडव करीत व समाजातील अंधश्रद्ध लोकांच्या धार्मिक व सांप्रदायिक प्रवृत्तीचा उपयोग करून "आपण विजयी झालों" असें मानून आत्मतृप्त रहात वस्तुतः सर्व बाजूंनीं विचार करून नवनवीन सिद्धांत पारखून घेण्याच्या शिक्षणपद्धतीपासून ते सर्वथा दूर राहिल्या-

मुळें आत्मतृप्तता व इतरांबद्दल तुच्छता यांशिवाय त्यांच्याजवळ कांहींच नसे. काळाचा ओघ जाणण्याची शक्ति तर फारच थोड्यांत होती, त्यामुळें या परपरेंतील जीवनात एका परीची अगतिकता आलेली होती.

शास्त्रीबोवा पूर्णपणें याच वातावरणात वाढले होते. त्यांनीं या सर्व गोष्टींचा निराग्रही वृत्तीनें विचार करून प्रयत्नपूर्वक आपल्या जीवनाला निराळें वळण दिलें असावें असें वाटतें. सतत समाजाभिमुख म्हणणें हें शास्त्रीबोवांचे जीवनातील प्रमुख सूत्र दिसून येतें. आपल्या काळातील समाजाला आज कशाची जरूर आहे हें ओळखून त्या त्या वेळीं शास्त्रीबोवांनीं समाजापुढें स्वार्थत्यागपूर्वक आपली ज्ञानाची पाणपोई रिती केली आहे. काळाचीं पाउलें ओळखून वागणाऱ्या व्यवहारी शास्त्रीबोवाना समकालीन सांप्रदायिकाचा कडवा विरोध सहन करावा लागला व अनेक ग्रामण्याना व बहिष्काराना तोंड देण्याचा प्रसंग आला.

सुरुवातीस शास्त्रीबोवांनीं मोठ्या हिरीरीनें मुंबईच्या एका पाठशाळेच्या संचालनाची जबाबदारी आपणाकडे घेतली व सहा महिनेपर्यंत ती यशस्वीपणें पारहि पाडली. पण अंतर्गत मतभेदामुळें त्याना शेवटीं ती शाळा सोडून द्यावी लागली. त्यानंतर मात्र पाठशाळांच्या भवितव्याविषयीं व एकदर प्राचीन परंपरेविषयीं ते बरेच उदासीन असावेत असें त्यांच्या पुढील कार्यावरून वाटतें.

## वेद-सेवा

"पै अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।
नाहीं श्रुति परौति । माउली जगा ॥ ज्ञा १६.४६२

सर्व हिंदुस्थानभर शेंकडो वेदपाठशाळा अद्यापि आहेत शास्त्रीबोवांच्या काळात त्यांची संख्या आजच्यापेक्षाहि अधिक असेल. परंतु वेदाचा अर्थ शिकविण्याचीं परंपरा मात्र कोठेंहि नव्हती वेदाचा अर्थ करणें व त्याचा प्रचलित मानवी जीवनाशीं संबंध जोडणें हें अयोग्य असून तें एक प्रकारचें पाप आहे, अशी त्या काळीं सामान्यतः रूढ समजूत होती जो परंपरेनें वैदिक त्याला शास्त्राचें ज्ञान नाहीं आणि शास्त्रीय परंपरेनें अध्ययन केलेल्याला वेदाचा संस्कार नावापुरताच ब्राह्मण हे वैदिक खरे पण त्यांचा वेदाशीं संबंध पूज्य म्हणून दुरून अभिवादन करण्यापुरताच. मौञ्जीबंधनाचे वेळीं पित्याकडून मुलाला गायत्रीमंत्र प्राप्त होतो, एवढाच सध्यां ब्राह्मणांचा वेदाशीं संबंध शिल्लक राहिला आहे असें फार तर म्हणतां येईल. पूर्वीपूर्वीच्या पिढ्यांत आजच्यापेक्षां

थोडा जास्त वेदमन्त्रांशीं संबंध असे. पण अर्थ करून त्यांतील सिद्धांत पारखण्याविषयीं मात्र फारच अनास्था, अनादर किंबहुना विरोधाची भावना सर्वत्र प्रसृत होती असें म्हटल्यास अयोग्य होणार नाहीं. युरोपांत मात्र एकोणिसाव्या शतकांतच वेदादि प्राचीन ग्रंथांचा अभ्यास अनेक पंडितांनीं अगदीं नव्या पद्धतीनें सुरू केला. या पाश्चात्य पंडितांनीं प्रत्येक ग्रंथाचा सर्व बाजूंनीं अभ्यास करून अगदीं नवीं व आपल्या परंपरेस सर्वथा अपरिचित अशीं प्रमेयें सप्रमाण मांडलीं व वैदिक वाङ्मयाला जागतिक अढळस्थान प्राप्त करून दिलें. त्यामुळें *प्रथमतः आमच्यांतील नवीन सुशिक्षितांची वेदाकडे पहाण्याची दृष्टि बदलली* व वेदांचा अभ्यास करण्याची प्रवृत्ति उत्कटत्वानें त्यांच्यांत निर्माण झाली. या बाबतींत आधुनिक विद्यावंत पाश्चात्त्यांचे अनुयायी बनले असल्यास नवल नाहीं. नवीन सुशिक्षित विद्वान् तर या लाटेंत केव्हांच सांपडले, पण शास्त्रीबोवांच्यासारख्या जुन्या परंपरेंत वाढलेल्या वैदिकावरसुद्धां याचा परिणाम झाला. आपल्या धर्माचें प्रमाण ग्रंथ वेद व आपल्या संस्कृतीचा सर्वोधारहि तेच. त्यामुळें वेद समजावून घेणें योग्यच नव्हे तर अपरिहार्य आहे, या बुद्धींतून आपल्याकडील पंडितांनीं वेदाभ्यास सुरू केला. त्यांतून प्रत्यहीं युरोपांतून वेदावरील उत्तमोत्तम पुस्तकें येथें येऊन पोहोंचत होतीं. सायणभाष्यासारखे टीकाग्रंथ व्युत्पत्ति व व्याकरण यांच्या साहाय्यानें उलगडतात, पण वेदमंत्रांतून निघणारे विविध सिद्धान्त ध्यानांत येण्याला आणखी निराळीच दृष्टि व व्यासंग यांची आवश्यकता असते

अशा परिस्थितींतच मॅक्समुल्लरनें संपादलेली सभाष्य ऋग्वेदाची दुसरी आवृत्ति शास्त्रीबोवांच्या एका परिचिताकडून अगदीं अल्प किंमतींत घरीं येऊन पडली. त्या प्रतीची त्या वेळची दुर्मिळता व महर्घता लक्षांत घेतां शास्त्रीबोवांना तो मोठाच योग वाटला. आणि त्या वेळेपासून शास्त्रीबोवांच्या बोलण्यालिहिण्यावर वेदाभ्यासाचा विशिष्ट परिणाम झालेला दिसूं येतो. सार्वजनिक स्थळीं निर्भयपणें पुढें होऊन कोणाचाहि मुलाहिजा न ठेवतां आपलीं मतें मांडण्यानें शास्त्रीबोवा लोकांच्या लक्षांत भरलेच होते. त्यांत आणखी ऋग्वेदाच्या अभ्यासाचा मालमसाला अधिकच लज्जत उत्पन्न करूं लागला. नवमताबद्दलच्या पक्षपातानें सुधारक व आर्यसमाजी लोकांना हा माणूस आपला आहे असें वाटूं लागलें. वेदाच्या *या नव्या व्यासंगामुळें नवे नवे वाद व त्यांचे आधार तपासण्याचा नाद* शास्त्रीबोवांना लागला व त्यांचा वेदाचा अभ्यास वाढत चालला.

अशाच सुमारास स्वामी ॐकार सच्चिदानंद नांवाच्या वृद्ध संन्याशानें सर्व वेदांच्या पदसूची शास्त्रीबोवांना भेट म्हणून अर्पण केल्या. तेव्हांपासून त्यांची

वेदाभ्यासांतील एक महत्त्वाची अडचण दूर झाली. 'कामधेनु' म्हणजे काय असते याची कल्पना शास्त्रीबोवांना या सूच्यांवरून आली. इच्छा होईल तेव्हां वेदांतील कोणताहि शब्द या सूच्यांमुळें मुळांतून तपासतां येऊं लागला. सूच्या नव्हत्या तेव्हां वेद मुखोद्गत असणाऱ्या वैदिकांच्या साहाय्यानें मार्ग काढावा लागे. आतां ती अडचण दूर झाली होती. शास्त्रीबोवांच्या या वेदविषयक अभ्यासामुळें डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशांत वैदिकविभागाचे सहसंपादक म्हणून त्यांचा प्रवेश झाला. तेथील कामानें आत्मविश्वास वाढून ऋग्वेदाचें भाषांतर प्रसिद्ध करण्याचें धाडस करण्यास ते प्रवृत्त झाले.

शास्त्रीबोवांच्या ऋग्वेदाच्या मराठी भाषांतरापूर्वी अनेकांनीं तसे प्रयत्न केले होते. परंतु ऋग्वेदाचें संपूर्ण भाषांतर प्रसिद्ध करण्यांत शास्त्रीबोवाच प्रथम यशस्वी झाले. हें भाषांतर प्रसिद्ध करतांना शास्त्रीबोवांनीं दहावें मंडळ प्रथम प्रसिद्ध केलें. यांतील प्रधान हेतु कोणत्यातरी पद्धतीनें ऋग्वेदाचें संपूर्ण भाषांतर लोकांना उपलब्ध व्हावें हा होता. ऋग्वेद म्हणजे गूढ असून त्यांतील पारमार्थिक विषय आपणासारख्या पामरांना सर्वथा अज्ञेय आहेत व अज्ञेयच राहणार या पारंपरिक कल्पनेला धक्का देऊन श्रद्धाशीलांच्या बुद्धीला चाळविण्यांत शास्त्रीबोवांनीं अपूर्व यश मिळविलें. या यशामध्यें त्यांचे प्रकाशक श्री. श. रा. दाते यांचाहि महत्त्वाचा भाग आहे, हें येथें नमूद करणें जरूर आहे.

ऋग्वेद व पाणिनींचें व्याकरण यांना आज अलौकिक महत्त्व प्राप्त झालेलें आहे. या विषयांच्या सततच्या व्यासंगानें शास्त्रीबोवांच्या चरित्राला एक प्रकारची चमक आलेली आहे. ऋग्वेदाच्या अनुषंगानें त्यांनीं इतर वेदांचेंहि परिशीलन केलें आहे. पुराणादिकांच्या अभ्यासाची जोड या विषयाला मिळाल्यानें शास्त्रीबोवांच्या पांडित्याला चांगलीच व्यापकता आलेली आहे. वेद, शास्त्रें, पुराणें व इतिहास यांच्या सूक्ष्म व चिकित्सक अभ्यासामुळें शास्त्रीबोवांना यथार्थतेनें वेदशास्त्रसंपन्न असें म्हणतां येईल. मराठींत या विषयावर व्याख्यानें प्रवचनें अलीकडच्या काळांत त्यांच्या इतकीं क्वचितच कोणी दिलीं असतील. ग्रंथ निर्माण करून आपलें ज्ञान व परिश्रम लोकांना कायम उपयोगी पडेल अशीहि त्यांनीं व्यवस्था केली. ऋग्वेदाच्या भाषांतराशिवाय संध्या, उपनयन, विवाह इत्यादि संस्कारविषयक लहान लहान चौदा पंधरा पुस्तकेंहि शास्त्रीबोवांच्या वेदविषयक व्यासंगाचींच निदर्शक होत. अद्यापि अप्रकाशित असलेला "ऋग्वेदाचा उपसंहार" हा ग्रंथ म्हणजे शास्त्रीबोवांच्या या क्षेत्रांतील तपस्येचें परिणत फलच होय. शास्त्रीबोवांनीं हा ग्रंथ प्रकाशित न केल्यामुळें "शास्त्रीबोवांनीं यथासांग यज्ञ पार पाडला पण अवभृथस्नान

मात्र घडलें नाहीं " असें म्हणावें लागतें. म्हणून शास्त्रीबोवांना नम्रपणें सुचवावेंसें वाटतें कीं —

आधीं कर्माचा प्रसंग । कर्म पाहिजे केलें सांग ।
कदाचित् पडलें व्यंग । प्रत्यवाय घडे ॥ दासबोध

## व्याकरणाचा व्यासंग

आज जगांत पाणिनीच्या व्याकरणपरंपरेला असाधारण महत्त्व प्राप्त झालेलें आहे. भाषाशास्त्राला आवश्यक असणाऱ्या अनेक कोड्यांचा उलगडा पाणिनीच्या शास्त्रानें होऊं शकतो. आणि शब्दांच्या मूळ प्रकृतीकडे जाण्यास पुष्कळच मदत होते. संस्कृत वाङ्मयाच्या दृष्टीनें तर पाणिनीचें व्याकरण म्हणजे आत्मा होय. व्याकरणाचें महत्त्व आमच्या पूर्वजांनीं चांगल्या रीतीनें ओळखलें होतें. त्याचें संरक्षण व वाढ मोठ्या दक्षतेनें त्यांनीं केली आहे. प्रकृति प्रत्यय, त्यांचे अर्थ, त्यांचे कालमानाप्रमाणें होणारे संकोचविकास, बदल यांचा अभ्यास अत्यंत सूक्ष्मपणें या परंपरेंत चालतो. पाणिनीय परंपरेंतील " स्फोटवाद " व त्याला दर्शनामध्यें दिलेलें स्थान यांचें यथार्थ स्वरूपांत आकलन योगशास्त्राप्रमाणेंच इतरदेशीयांना अद्यापि झालेलें नाहीं. उच्चार, स्वर वगैरे बाबतींतील सूक्ष्म अभ्यास हा पाणिनीयांचा एक विशेष आहे.

या शास्त्राशीं शास्त्रीबोवांचें सर्व आयुष्य अत्यंत निगडित आहे. अध्ययनानंतरच्या काळांत या शास्त्राशीं संबंध क्वचित्च राहतो. पण शास्त्रीबोवांना मात्र मोठया भाग्यानें हा सम्बन्ध कायम ठेवण्याची संधि अखंड लाभलेली आहे. शास्त्रीबोवांनीं संस्कृत पाठशाळांतून व स्वतंत्र रीतीनें जैनमुनींना कौमुदी वगैरे व्याकरणाचे ग्रंथ पढविले आहेत. म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांच्याबरोबर महाभाष्य शब्दकोशासारखे ग्रंथ तयार करण्याची संधि मिळाल्यानें व्याकरणशास्त्रांतील प्रत्येक शब्द, पृथक्करणपूर्वक पर्यायांसह त्यांनीं अभ्यासकांच्या पुढें ठेविला आहे. उच्चार, स्वर, ध्वनि, लिपि इत्यादि व्याकरणशास्त्रसंबद्ध अनेक विषयांवर मौलिक प्रकाश पाडणारे प्रबंध त्यांनीं लिहिले-वाचले आहेत. शब्दचिकित्सा हा शास्त्रीबोवांच्या जीवनाचा एक छंदच बनलेला आहे. त्यामुळें बहुतेक प्रातिशाख्यें सूक्ष्मपणें त्यांनीं वाचलीं असून " ऋक्प्रातिशाख्य " उवटभाष्यासह संपादून त्यावर त्यांनीं एक स्वतंत्र टीकाहि लिहिली आहे. तिला प्रसिद्धीचा योग अजून आला नाहीं हें वेगळें.

प्रातिशाख्याप्रमाणेंच उच्चारशास्त्रावरील शिक्षाग्रंथाचाहि शास्त्रीबोवांचा गाढ व्यासंग आहे. या विषयावरील त्याचे ग्रंथ विशेष नावाजलेले आहेत. यापैकीं पुष्कळसे छापून प्रसिद्ध झालेले आहेत शास्त्रीबोवांच्या या अभ्यासामुळेंच महाराष्ट्र साहित्य परिषदेनें त्याची एक व्याख्यान माला या विषयावर करविली होती. तींत वर्णमालेपासून वर्णक्रम, स्थान-प्रयत्न यासंबंधीं नवे विचार मांडले आहेत. हे मौलिक विचार ग्रंथसंनिविष्ट होणें जरूर आहे आजहि शिक्षा, प्रातिशाख्यें याचे द्वारा वेदांतील उच्चारविशेष व प्रयोग यांचें संशोधन करण्याचें कार्य शास्त्रीबोवा सतत करीत असतात मधून मधून संस्कृत मार्फत व मराठींत त्यासंबंधींचें आपलें लिखाण विद्वानापुढें ठेवण्याची संधि ते वाया घालवीत नाहींत.

पाणिनीचें व्याकरण व ऋग्वेदादि ग्रंथ यांचा अगदीं निकटचा संबंध आहे केवळ सायणभाष्य घेतलें तरी पाणिनीच्या व्याकरणावाचून पदोपदीं नडतें. म्हणून पाणिनीच्या व्याकरणाला वेदांगामध्यें प्रामुख्य दिलें आहे अलीकडे तर पाणिनीविषयक सूक्ष्म अभ्यासामुळें केवळ व्याकरण भाषाशास्त्राच्या बाबतींतच नव्हे तर सर्वच विषयाचा ऐतिहासिक परामर्श घेण्यात व कालनिर्णय करण्यात फार मोठी मदत झाली आहे. त्यामुळें खिस्तपूर्वकालातील सर्वंच विषयाचा तलास लावताना पाणिनि दीपस्तंभाप्रमाणें मार्गदर्शक ठरतो प्राचीन भारत, त्याच्या सीमेवरील प्रदेश, अन्तर्गत प्रान्त, त्यांचीं तत्कालीन नावें इत्यादिकाचा सूक्ष्म अभ्यास पाणिनीच्या साहाय्यानें केला जात असून त्यांतून भारताच्या प्राचीन भूगोलावरहि नवीन प्रकाश पाडण्याचें कार्य केलें जात आहे. यामुळें पाश्चात्य व पौरस्त्य पंडितांनीं पाणिनीच्या कार्याविषयीं मुक्तकंठानें प्रशंसोद्गार काढले असले तरी "पाणिनीनें आपल्या व्याकरणाची रचना करिताना तत्कालीन भारतीयेतर भाषाचाहि परामर्श घेणें जरूर होतें" असें आधुनिक भाषाशास्त्रज्ञाचें मत आहे. शास्त्रीबोवानीं व्याकरण भाषाशास्त्रावर लिहिलेल्या अनेक ग्रंथामधून या विषयाचा परामर्श घेतला असून त्यामुळें प्राचीन व अर्वाचीन मताचा समतोल विचार करण्याची शास्त्रीबोवाची प्रवृत्ति दिसून येते

त्यांच्या व्यासंगात प्राचीन पंडितापेक्षा विशेष हा आहे कीं त्यांनीं आपल्या पांडित्याला आधुनिक उपयुक्ततेची जोड देऊन तें समाजाभिमुख ठेविलें आहे आणि आपले ग्रंथ आधुनिक अभ्यासकांना उपयुक्त व्हावेत अशी दृष्टि त्यांनीं ठेवली आहे. अभ्यासाचा विषय आणि उपजीविका यांची सांगड अनुम

विण्याचा योग अत्यंत दुर्लभ असतो. अध्ययन, अध्यापन, प्रवचन व लेखन या सर्व गोष्टी नित्य व्यवहाराशीं एकरूप करण्याचें भाग्य त्यांना लाभलें आहे; किंवा या सर्व गोष्टी मोठया कौशल्यानें त्यांनीं साधल्या आहेत असें म्हणणें अधिक उचित होईल.

## कोशकार्य

मथार्चें करावें स्तवन। स्तवनाचें कार्य प्रयोजन।
येथें प्रत्ययास कारण। प्रत्ययो पहावा॥ दासबोध

शास्त्रीबोवांच्या चरित्रकोशाचें प्रचण्ड कार्य पाहिलें कीं मन आश्चर्यानें थक होऊन जातें. एवढें प्रचण्ड कार्य आपल्या असामान्य उरकशक्तीच्या जोरावर शास्त्रीबोवांनीं तडीस नेलें. म्हणून शास्त्रीबोवांचें व त्यांच्या प्रमाचें जेवढें "अभिनंदन स्तवन" करावें तेवढें थोडें आहे. तथापि त्यांतील 'प्रत्यय' हा महत्त्वाचा असून तो 'पहाणें' योग्य होय.

शास्त्रीबोवांचें "जीवनसूत्र" कोश या 'प्रत्याहारा'वर अवलंबून आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. शास्त्रीबुवांच्या जीवनाची सुरवात ज्ञानकोशातील कार्यानें झाली आणि सध्या ते डेक्कन कॉलेजमधील ऐतिहासिक संस्कृत महाकोशात कार्य करीत आहेत. म्हणजे शास्त्रीबोवांचें उभ्या चाळीस वर्षांचें आयुष्य या "कोश" प्रत्याहारानें बांधलेले आहे. त्यांच्या आयुष्यातील या कोशकार्याच्या ज्ञानाशिवाय आपणास शास्त्रीबोवांचें "जीवनसूत्र" समजलें असें म्हणणें चुकीचें होईल.

निघण्टु निरुक्ताच्या काळापासून भारतीयांनीं कोशकार्याचें महत्त्व ओळखून ही परंपरा चिकाटीनें जतन करून फार मोठ्या प्रमाणात वाढविली आहे. संस्कृत वाङ्मयात आज चारशेंहून अधिक कोश उपलब्ध आहेत. एवढी कोशसंपदा इतर कोणत्याहि वाङ्मयाला लाभलेली नाहीं. या कोशवाङ्मयाचा प्राथमिक परिचय लहानपणीं पाठशालीय जीवनांतच शास्त्रीबोवांना झाला होता. अमरकोशाचें तर साक्षात् पठनच करावें लागतें. परंतु इतरहि विश्व, मेदिनी, शाश्वत, वैजयन्ती इ., कोश मल्लिनाथादि टीकाकारांच्या उल्लेखावरून परिचित होतात व शक्यतेप्रमाणें मूळ कोशांचेंहि अवलोकन केलें जातें. परंतु हे सर्वच कोश "पर्यायकोश" किंवा "अनेकार्थकोश" आहेत. एका शब्दाचे पर्यायशब्द किंवा एका शब्दाचे अनेक अर्थ यांत एकत्र समाहित

केलेले असतात. यात वर्णनात्मकता असत नाहीं, व केवळ शब्दविषयापुरते हे कोश मर्यादित आहेत.

ज्ञानकोशानें मात्र महाराष्ट्रात एक नवीनच कोशयुग सुरू के असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानकोशाचा प्रचंड पसारा आवरण्यासाठ डॉ. केतकरांनीं तरुण, बुद्धिमान, व कर्तृत्ववान माणसें निवडतान चित्रावशास्त्री यांचा समावेश आपल्या कार्यात मोठ्या चातुर्यानें केला लो. टिळकांनीं "आपल्या वैदिक मन्त्राच्या अर्थाकडे आपण लक्ष देतां वाटेल तें मन्त्र वाटेल त्या ठिकाणीं नियुक्त करतों" असें सांगून 'दधि क्राव्णो अकारिषम्' या मन्त्रातील 'दधिक्रावन्' शब्दाचा व दह्याचा काहीं एक संबंध नाहीं असें एका व्याख्यानात सांगितलें होतें. त्यावर चित्राव- शास्त्री यांनीं 'आचार्य' या पाक्षिकात "दधिक्रावन्" शब्दाचा दही हा अर्थ कसा करता येईल तें एका अप्रसिद्ध ग्रंथाच्या आधारें मांडलें होतें. त्या वेळीं शास्त्रीबोवा अगदीं तरुण होते व्यासंगपूर्ण लेखन करण्याच्या प्रयत्नात असलेला संशोधक वृत्तीचा हा तरुण शास्त्री आपल्या कोशकार्यास आवश्यक आहे असें वाटून डॉ. केतकर यांनीं शास्त्री- बोवाना या कार्यास येण्यास सांगितलें त्यावेळीं शास्त्रीबोवा लोकमान्य टिळ- कांच्या व्यक्तिमत्वानें भारावून गेले होते. शास्त्रीबोवांनीं डॉ. केतकरांना सांगितलें कीं मला प्रमुखपणें समाजकार्य व राष्ट्रकार्य करावयाचें आहे, त्यानंतर आनुषंगिक म्हणून संशोधन किंवा लेखन करावयाचें आहे. त्यावर डॉ केतक- रांनीं सविस्तरपणें चर्चा करून शास्त्रीबोवाना पटवून दिलें कीं "समाजकार्य किंवा राष्ट्रकार्य म्हणजे केवळ व्याख्यानें देणें, सभा जिंकणें, एकाद्या गोष्टीचा निष्कारण वादंग माजविणें नव्हे तर समाजात ज्ञानाचा प्रसार करून एकूण समाजाची ज्ञानाची उंची वाढविणें व खऱ्या ज्ञानाची भूक समाजामध्यें निर्माण करणें हें खरें सामाजिक कार्य होय. हेंच कार्य करावें म्हणून आम्हीं ज्ञानकोशाचें काम सुरु केलें असून त्यात तुम्ही सहभागी व्हावें अशी आमची इच्छा आहे." या चर्चेचा परिणाम शास्त्रीबोवांच्या मनावर झाला व डॉ. केतकरांनीं सांगितल्याप्रमाणें वैदिक विभागाचें सहसंपादकत्व शास्त्री- बोवांनीं स्वीकारलें.

या प्रकरणातून शास्त्रीबोवांच्या जीवनाला एक निरालेंच वळण लागलेलें दिसून येतें शास्त्रीबोवांच्या जीवनावर ज्यांची छाप पडलेली आहे त्यांत डॉ. केतकर यांचें स्थान मोठें आहे, याचा कृतज्ञतापूर्वक निर्देश ते करीत असतात.

१९२० ते १९२३ पर्यंत शास्त्रीबोवांनी ज्ञानकोशाच्या वैदिक विभागात काम केलें. यात दाशराज्ञ युद्धाची चर्चा करितांना डॉ. केतकरांकडून जें मार्गदर्शन शास्त्रीबोवांना मिळालें त्याचा फार मोठा परिणाम शास्त्रीबोवांच्या पुढील कार्यावर झाला आहे. मुळात असलेल्या शास्त्रीबोवांच्या चिकित्सक वृत्तीला डॉ. केतकरांच्या चर्चेतून चांगलेंच खतपाणी मिळालें. तो अंकुर वाढीला लागला आणि त्यातूनच चरित्रकोशाचें खण्डत्रयात्मक प्रचंड कार्य बाहेर पडलें.

मोठमोठ्या संस्थांना पार पाडण्यास कठीण वाटावें असें हें कार्य शास्त्रीबोवांनी फारसा गाजावाजा न करिता पार पाडलें. यामुळें शास्त्रीबोवांच्या उत्कटशक्तीची कल्पना येते. योजना आंखून ती त्वरित अमलांत आणताना निर्णायक बुद्धिमत्तेबरोबरच इतर परिस्थितींचीही अनुकूलता असावी लागते. शास्त्रीबोवा फार स्पष्ट नसले तरी काम करीत असतांना स्वतःकरितां झोळी पसरण्याचा प्रसंग सुदैवानें त्यांच्यावर कधींच आला नाहीं. त्यामुळें शास्त्रीबोवांना स्वाभिमानाला यत्किंचितहि मुरड न घालतां हें कार्य करता आलें. " अर्धाची किंमत एक रुपया जरूर तर अधिक घेईन, पण कोणाकडून देणगी किंवा वर्गणी मिळविण्याकरितां त्यांच्या दारीं जावें हें मला पसत नाहीं" ही स्वाभिमानाची परंपरा आमच्या डॉ. केतकरांची आहे असें शास्त्रीबोवा सांगतात.

प्राचीन खंड सातशें पृष्ठें, मध्ययुगीन खंड आठशें पन्नास पृष्ठें, अर्वाचीन खंड सहाशें पृष्ठें मिळून प्रस्तावनादिकासह एकूण बावीसशें पृष्ठें व १९ हजार चरित्रें शास्त्रीबोवांनीं संपादिलीं. त्यास आज वीस वर्षे होऊन गेलीं. पण अद्यापि कोणत्याही भारतीय भाषेंत किंवा खुद्द इंग्रजी भाषेंतही या तोडीचें कार्य होऊं शकलें नाहीं, हेंच शास्त्रीबोवांच्या या कार्यांतील अपूर्व यशाचें गमक आहे. वीस वर्षांपूर्वीच मुंबईच्या Times of India नें प्राचीन चरित्रकोशावर अभिप्राय देताना स्पष्टपणें लिहिलें होतें कीं:—

An English edition might make it a standard work all over the world.

म. म. द. वा. पोतदार यांनीं " श्री. चित्रावशास्त्री यांनीं गाजावाजा न करता केलेल्या प्रचंड कार्यानें महाराष्ट्राची योग्यता व सेवा सर्व जगाला पटेल इतकें त्याचें महत्त्व आज ना उद्या सर्वमान्य होईल " असें म्हटलें होतें तें आज खरें ठरलें आहे. कारण आज वीस वर्षे अनेक विद्वानांनीं घासूनपुसून पाहिल्यानंतरहि प्राचीन चरित्रकोश तावून सुलाखून निघाला आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. शास्त्रीबोवांचें गाजावाजा न करता कार्य करण्याचें सूत्र पुढीलप्रमाणें आहे:—

अभ्यासोनि प्रगटावें । नातरि प्रगटोचि नयें ॥
परी प्रगटोनि नासावें । हें बरें नोहे ॥ दासबोध

## परिवर्तनशील धर्मशास्त्र

श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्ना नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम् ।
धर्मस्य तत्त्व निहित गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः ॥

कालचा सुधारक आज सनातनी ठरतो व "आपण अगदीं सोवळेपणानें सनातनधर्माचें आचरण करतों" असें आज सांगणाऱ्या सद्गृहस्थाचें आचरण पचवीस वर्षांपूर्वीच्या सुधारकाच्या आचरणाहून निराळें असणार नाहीं. हा कालाचा महिमा आहे. शेंकडों वर्षांतील सनातनी भारतीयाचे व्यवहार पाहिले तरी आपणास हेंच आढळून येईल. प्रत्येक काळात रूढ व्यवहार धर्म बदलत असताना पुराणमतवादी जुन्या पिढीनें त्यास तुच्छता दाखवावी, क्वचित् प्रसंगीं विरोध करावा व नव्या पिढीनें मोठ्या हिरिरीनें त्याचा पुरस्कार करावा, असा देखावा आपणास दिसून येतो. हा व्यवहारांतील बदल इतक्या सूक्ष्मपणानें होत असतो कीं सामान्यजनाना त्याची जाणीवहि न होता ते नवीन रूढी आत्मसात करीत असतात. परंतु मूलतःच क्रांतिकारक बदल घडवून आणण्याचा मोठा प्रयत्न झाल्यास मात्र त्याच्या क्रिया व प्रतिक्रियाहि तितक्याच मोठ्या प्रमाणात समाजात घडून आल्याचें इतिहास सांगतो.

महावीर व बुद्ध यांच्या कालांतील घडामोडींचें निरीक्षण केल्यावर वरील विधानांतील सत्यता लक्षांत येते. महावीर बुद्धांच्या नंतरच्या प्रदीर्घ काळात प्रथमच एकोणिसाव्या शतकात मोठ्या प्रमाणात ख्रिस्ती धर्माशीं संघर्ष आल्यानंतर हिन्दु धर्मांतील विचारवंतानीं अंतर्मुख होऊन क्रांतिकारक फेरबदल करण्याच्या विचारास चालना दिली. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं प्रथम आंग्लविद्याविभूषित नव्या विद्वानांनीं यात प्रामुख्यानें भाग घेऊन धर्मसुधारणेच्या कामास सुरवात केली, तर विसाव्या शतकाच्या सुरवातीस पुष्कळ शास्त्रीपंडितहि या कार्यांत सहभागी झाल्याचें दिसून येतें. या विचारवंतांत चित्रावशास्त्री यांचें स्थान मोठें आहे.

पण मौज अशी कीं चित्रावशास्त्री प्रथम सनातनी पक्षाचे म्हणूनच लोकांच्यापुढें आले. कै. विष्णुशास्त्री बापट यानीं चालविलेल्या 'आचार्य' पाक्षिकांत त्यानीं प्रथम सनातनधर्माचें महत्त्व प्रतिपादन करणारे लेख लिहिण्यास सुरवात केली. नंतर 'आचार्य' पाक्षिकाच्या संपादनातहि हे भाग घेऊं लागले. त्या वेळीं 'आचार्य' पाक्षिक हे सनातनी पक्षाचें म्हणून प्रसिद्ध होतें.

त्यात धर्मशास्त्राविषयींचे निरनिराळे शास्त्रार्थ, चर्चा, पूर्वोत्तरपक्ष, शंकासमाधान, हे विषय शास्त्रीबोवा अभ्यासपूर्वक लिहीत असत. त्या वेळीं कांहीं नैमित्तिक चर्चा विशेष गाजून चिकित्सशाली यांनें स्थान सनातनी पक्षात महत्वाचें समजलें जाऊ लागलें. पुढें श्रीशंकराचार्य शिरोळकर यांनीं मोरगांव येथें ऋक्संहिता स्वाहाकार करविला त्या वेळीं "अशा स्वाहाकाराला प्रमाण आहे का ?" याविषयीं तेथें बरीच चर्चा झाली. त्यामध्येंहि शास्त्रीबोवांचें प्रत्युत्पन्नमतित्व व सनातनधर्म-शास्त्राचा गाढ व्यासंग लोकांच्या नजरेस आला.

आपल्याकडे परंपरेनें वेदाङ्गांचें अध्ययन फक्त ऋग्वेदीच करितात. कारण वेदांगें आपल्या वेदांना उपयुक्त नाहींत अशी इतर वेदपरंपरेंतील लोकांची समजूत होती. ही समजूत चुकीची असून ऋग्वेद्यांप्रमाणेंच इतरवेदीयांनींहि वेदांगांचें अध्ययन करणें आवश्यक आहे ही गोष्ट शास्त्रीबोवांनींच प्रथम साधार विद्वानांच्या पुढें मांडिली. या लेखाचें लोकांकडून फार मोठें स्वागत झालें. 'आचार्य' पाक्षिकातला हा लेख पुनः पुरुषार्थात प्रसिद्ध करण्यांत आला व शास्त्रीबोवांचा गौरव करण्यांत आला.

या रीतीनें शास्त्रीबोवा सनातनी पक्षात काम करीत असतांना एका जैन साधूला संस्कृत व्याकरण शिकविण्याच्या निमित्तानें त्यांना नगर जिल्ह्यांत जाण्याचा प्रसंग आला. तो दुष्काळी भाग लोकांना पूर्ण परिचयाचा आहे. पण तेथें खेडेगांवातील जीवनाचें अंतरंग पाहण्याचा जेव्हां प्रसंग आला, त्या वेळीं मात्र शास्त्रीबोवांना आश्चर्याचा धक्का बसला. हा विभाग मुळातच दुष्काळग्रस्त असल्यानें आर्थिक दृष्ट्या सर्व लोक अगदीं कंगाल झालेच होते, पण त्याचें जे सांस्कृतिक व धार्मिक पतन होत होतें, त्यामुळें शास्त्रीबोवांचें सनातनी हृदय चांगलेंच हादरलें, व येथेच त्यांची परिवर्तनशील धर्मवादी भूमिका सुरू झाली.

नगर जिल्ह्यांतील ज्या दृश्याचा परिणाम शास्त्रीबोवांच्या मनावर झाला तें दृश्य म्हणजे पाद्री लोकांचें अस्पृश्यांच्यामध्यें शिरून त्यांना अज्ञानानें व बला-त्काराने बाटविणें होय. अस्पृश्य वर्गातील अज्ञानाचा व आर्थिक असहायतेचा फायदा हे पाद्री लोक घेत असत. शास्त्रीबोवांनीं अस्पृश्यांच्या वस्तीमध्यें प्रवेश केला तेव्हां त्यांना दिसून आलें कीं, आई-बाप हिंदु तर मुलगा खिस्ती, नवरा हिंदु तर बायको खिस्ती अशीं अनेक कुटुंबें उध्वस्त झालीं आहेत. "तुम्हीं खिस्ती का झालात" असें विचारता "आमच्याकडे पाद्री येतात, औषधें देतात, कपड्याची वगैरेहि मदत करितात आणि देवाधर्माच्याहि गोष्टी सांगतात" असें त्यांच्याकडून शास्त्रीबोवांना उत्तर मिळे. शास्त्रीबोवांना वाटू लागलें —"आपल्या ब्राह्मणांनीं पुरोहितांनीं या गोष्टी का करू नयेत ? 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' या

वैदिक उपदेशाप्रमाणें आपणहि आपल्या धर्मांच्या अनुयायाची सख्या कां वाढ नये ! निदान ती सख्या घटूं न देण्याकरिता आपण प्रयत्न करणें आपलें कर्तव्य नाहीं का ? " येथें शास्त्रीबोवाच्या शुद्धिसघटने-या कार्याचें बीज पेरिलें गेलें.

योगायोगानें थोड्याच दिवसात शास्त्रीबोवा मुबईच्या एका सस्कृत पाठशाळेवर अध्यापक म्हणून काम करू लागले. त्या वेळीं तेथें कै. ग. भा. वैद्य यानीं हिंदु मिशनरी सोसायटी काढून परधर्मातल्या लोकाना हिंदु धर्मात घेण्याचें काम सुरू केलें होतें. त्या कामाचें सपूर्ण निरीक्षण करून शास्त्रीबोवानीं ठरविलें कीं पुण्यात गेल्यावर आपण या कामास वाहून घ्यावयाचें

शुद्धिसघटनेच्या या कार्यात शास्त्रीबोवानीं सर्व प्रकारची मेहनत घेतली. पूर्वी ' शुद्धि ' विधि नव्हता, तो शास्त्रीबोवानीं स्वत. तयार केला व छापून प्रसिद्ध करून फुकट वाटला ! शुद्धिकरणाच्या वेळीं पौरोहित्य करण्यास कोणी तयार होत नसे. शास्त्रीबोवानीं स्वत पुष्कळ दिवसपर्यंत या कार्यात अर्थनिरपेक्ष पौरोहित्य केलें. प्रथम प्रथम या कार्यास विरोध होत असे परतु श्रीशकराचार्य डॉ. कुर्तकोटि यानीं शास्त्रीबोवाच्या शुद्धीकरणविधीस मान्यता देऊन या कार्यास उचलून धरलें. त्यामुळें या शुद्धीकरण चळवळीकडे प हण्याची सामान्य लोकांची दृष्टि बदलली व हळुहळु या विधीस लोकमान्यताहि मिळू लागली पुढें एका प्रसगीं तर श्रीशकराचार्य डॉ. कुर्तकोटि यानीं स्वत जातीनें शुद्धीकरण केलें. तेव्हा शास्त्रीबोवानीं आता आपलें काम सपलें असें समजून ते शुद्धिसघटनेच्या दैनदिन कामातून निवृत्त झाले. एखाद्या सस्थेला कायमचें चिकटून त्यांत आपलें प्रस्थ माजवावयाचें हा शास्त्रिबोवांचा स्वभावच नाहीं योग्य वेळीं निवृत्त होऊन नवीन लोकांना कामाची सधि द्यावयाची हे सूत्र सार्वजनिक कामांत शास्त्रीबोवानीं सर्वत्रच वापरल्याचें दिसून येतें.

सनातन परपरेला विरुद्ध अशा पुनर्विवाह, समुद्रयान, मदिरप्रवेश, अब्राह्मण त्रैवर्णिकाचें मौजीबधन, स्त्रियांचें मौजीबधन, पुनर्विवाहित सततीचे सस्कार इत्यादि विषयांवर शास्त्रीबोवानीं साधार व सशास्त्र अनेक लेख लिहिले, व्याख्यानें दिलीं, खाजगी चर्चा बैठका करून प्रचार केला आणि प्रसगविशेषीं पौरोहित्यहि केलें. पुरोहितवर्गाला अनेक वेळा विनत्या करून ते अशा कार्यास जात नाहींत असें दिसून येऊ लागलें, तेव्हां शास्त्रीबोवांनी जाहीर केलें कीं " जेथें कोणी पुरोहित जाणार नाहींत तेथें आपण स्वत येऊन पौरोहित्य करू." या वार्तेत " आधीं केलें मग सागितलें " अशी भूमिका शास्त्रीबोवांची असल्यानें या क्षेत्रातील त्यांचा अधिकार सर्वमान्य झाला व परिवर्तनवादी पडितामध्यें त्यांचें स्थान निश्चित झालें.

परिवर्तनवादी पंडितापुढें शुद्धिसंघटनेप्रमाणें किंवा त्याहून अधिक जिवत व समाजधारणेच्या दृष्टीनें जीवन-मरणाचा प्रश्न म्हणजे अस्पृश्यतानिवारण. या कार्यांत सनातनी पंडितांनींहि प्राणपणानें विरोध केला. सर्व हिन्दुस्थानभर या चळवळीनें अक्षरशः हलकल्लोळ उडवून दिला. म. गांधी, प. मालवीयजी, लोकनायक अणे, बॅ. सावरकर, डॉ. आंबेडकर इत्यादि राजकीय पुढाऱ्यांनीं या प्रश्नाला फार मोठी चालना दिली. या प्रश्नाचें केवळ धार्मिक स्वरूप न ठेवता त्याला राजकीय स्वरूप देऊन भारतीय राजकारणाचें एक अविभाज्य अंग म्हणून अस्पृश्यतानिवारणाकडे सर्वदृष्टि खेंचण्याचें या युगांतील महान् कार्य म. गांधींनीं केलें. वर्णव्यवस्थेचें हिडीस स्वरूप अस्पृश्यतेमध्यें अपरिहार्यपणें व्यक्त होतें असें म. गांधींचें म्हणणें होतें. "समाजशास्त्रानें अत्यंत सूक्ष्म व निःस्वार्थपणें विवेचन करणाऱ्या आपल्या शास्त्रांना अस्पृश्यता मान्य असणें शक्य नाहीं" असें म. गांधींचें म्हणणें होतें. आपल्या म्हणण्याची साधकबाधक चर्चा करण्याकरिता येरवड्याच्या तुरुंगांत असताना म. गांधींनीं प्राचीन पंडितांची एक परिषद बोलाविली होती. योगायोग असा होता कीं त्याच वेळीं पुण्यात बॅ. जमनादास मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदुधर्म परिषद भरली होती. त्या परिषदेच्या स्वागताध्यक्षपदीं चित्रावशास्त्री होते. त्यांनीं आपल्या भाषणांत स्पष्टपणें सांगितलें कीं, "सनातनी पंडित म्हणतात कीं शास्त्रांतून अस्पृश्यता प्रतिपादिलेली आहे. मला त्यांचें म्हणणें मान्य आहे. परंतु आजपर्यंत मनु-याज्ञवल्क्य इत्यादि समाजशास्त्रज्ञांनीं जशा स्मृती लिहिल्या तशा त्या यापुढें लिहिल्या जाऊ नयेत याला काय प्रमाण आहे ? आजचे विद्वान्, पंडित, समाजशास्त्रज्ञहि पूर्वीच्या ऋषींप्रमाणें आजच्या काळाला अनुकूल समाजशास्त्र रचण्यास पूर्णपणें समर्थ आहेत. बदलत्या समाजाला परिवर्तनशील धर्मशास्त्रच योग्य होय. आजपर्यंत आपल्या ऋषि-मुनींनीं धर्मशास्त्रांत वारंवार भर घालून त्याचें परिवर्तनशीलत्वच मान्य केलें आहे." असें जाहीररीत्या प्रकट केल्यामुळें व्यवहारतः म. गांधींनीं प्रसिद्ध केलेल्या "शास्त्रामध्यें अस्पृश्यता नाहीं" या पत्रकावर चित्रावशास्त्री सही करू शकले नाहींत. जे विचार अस्पृश्यतेबाबतींत तेच विचार इतरहि धार्मिक सुधारणांच्या बाबतींत चित्रावशास्त्री यांनीं सर्वत्र प्रदर्शित केले आहेत. वस्तुतः सनातनी पंडितांची मीमांसान्यायप्रधान वादपद्धति आहे तर परिवर्तनवादी पंडित ऐतिहासिक पद्धतीनें विचार करितात. यामुळें दोघांनीं एका बैठकीवर येऊन वाद करणें योग्य नव्हे, व त्यांतून काहीं निष्पन्नहि होणार नाहीं असें आम्हास वाटतें.

या परिवर्तनशील धर्मवादी भूमिकेंतूनच श्री. चित्रावशास्त्री यांनीं धर्मग्रंथमाला काढिली. त्यांत सद्य परिस्थितीला अनुसरून संस्काराचा व नित्यकर्म-

प्रयोगांचा सक्षेप केला असून हीं सर्वच पुस्तकें अत्यंत लोकप्रिय झाली आहेत. या पुस्तकापैकीं पुष्कळ पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या असून काहींच्या तर चौदा पधरा आवृत्त्याहि खपल्या आहेत. शास्त्रीबोवानीं या विषयावर मौलिक प्रकाश पाडणारे अनेक प्रबंधहि लिहिले—वाचले असून सर्वत्र एकच अनुस्यूत सूर दिसून येतोः—

धारणात् धर्ममित्याहुः धर्मो धारयते प्रजाः।
यः स्यात् धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः॥

## सामाजिक कार्य

अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान इत्यादींप्रमाणेंच राज्यशास्त्रहि समाजशास्त्राचेंच एक अंग आहे; तथापि "सामाजिक कीं राजकीय" या वादानें एके काळीं महाराष्ट्रात प्रचण्ड वादळ निर्माण केलें होतें. यात सामाजिक शब्दाचा अर्थ "आत्मनिरीक्षण करून आपले दोष काढून टाकणें व आपला समाज सुधारणें" असा होता. त्यामुळें सामाजिक कार्यकर्त्यांची दृष्टि विधायक या स्वरूपात मांडता येईल, तर राजकीय कार्यकर्त्यांची भूमिका "परके निघून जावेत" एवढ्यापुरती मर्यादित म्हणजे निषेधात्मक व अभावस्वरूपी होती.

श्री. चित्रावशास्त्री याची सहजप्रवृत्ति विधायक कार्यकर्त्याची म्हणजे समाजसुधारकाची आहे. त्यांचा स्वाभाविक कल दुसऱ्यातील दोष दाखविण्यापेक्षा आपल्यात निरनिराळ्या सुधारणा घडवून आणण्याकडे अधिक दिसून येतो. या सुधारणा प्रत्यक्षात उतरविण्याकरितां त्यांनीं धर्मशास्त्राचेंहि परिवर्तनशीलत्व कसें प्रतिपादन केलें हें आपण पाहिलेंच आहे. त्यामुळें चित्रावशास्त्रींच्या समाजसुधारकाच्या भूमिकेविषयीं सन्देह रहात नाहीं.

१९२४ ते १९२६ पर्यंत सतत शास्त्रीबोवा महाराष्ट्र हिन्दुसभेचे अध्यक्ष होते व सभेचेंहि कांहीं काळ कार्यकर्ते होते. या अवधींत शास्त्रीबोवानीं आपल्या समाजाची संघटना करण्याकरिता जिवापाड मेहनत घेतली असल्याचें दिसून येतें. अस्पृश्यता निवारण करणें, जातीजातींतील वैमनस्य नाहींसें करणें, आपल्या समाजांतील पतित व अनाथ स्त्रियाचा प्रश्न सोडविणें, बहुजन समाजात शिक्षणाचा प्रसार करून एकदर समाजाची व ज्ञानाची उंची वाढविणें, सांस्कृतिक आणि धार्मिक दृष्ट्या आपण हिंदु म्हणून कोणीतरी एक आहोंत ही संघटित भावना निर्माण करणें याकरिता शास्त्रीबोवांनीं अखिल महाराष्ट्रात केलेलें कार्य अविस्मरणीय आहे. या प्रचारांतील शास्त्रीबोवाचीं सर्वच भाषणें भावनाप्रधान, लोकाना भारावून टाकून कार्यप्रवण करतील अशीं होतीं. शास्त्रीबोवा स्वतः

अपर्दी शिस्तीचे भोक्ते होते व समाजामध्येंहि शिस्त उत्पन्न व्हावी अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळें वर्तमानपत्रातून शास्त्रीबोवांचा उल्लेख "मिलिटर शास्त्री" असा झाला असल्याचें दिसून येतें.

शास्त्रीबोवांच्या काळातील हिंदुसभा समाजसुधारकांची होती. धार्मिक, सांस्कृतिक व सामाजिक प्रश्नाचा विचार विधायक दृष्टिकोणातून तेथें केला जाई. त्यामुळें एके काळीं या संस्थेविषयीं सर्वच पक्षांत आदराची भावना होती व सामान्य लोकांनाहि ही संस्था आपल्याकरितां कार्यवरी करणारी आहे असें वाटू लागलें होतें. संस्थेची लोकप्रियताहि वाढू लागली होती. पुढें या संस्थेला प्रामुख्यानें राजकीय स्वरूप दिले गेलें. सुरवातीच्या विधायक कार्यांतील जोर कमी होऊन इतर राजकीय संस्थाप्रमाणेंच विशेषत. निवडणुकावर लक्ष ठेवून कार्य करणारी ही संस्था बनली. शास्त्रीबोवांच्या स्वभावाला व प्रवृत्तींना हें जमणारें नव्हतें. त्यामुळें या क्षेत्रातून शास्त्रीबोवांनीं आपलें अंग काढून घेतलें. लोकशाहीच्या काळात सामान्य जनाच्या दैनंदिन जीवनात चैतन्य निर्माण करणारें विधायक कार्य हा फार महत्त्वाचा भाग आहे. नीतिधर्माचें अधिष्ठान, विधायक कार्यांतील पुष्कळ अशीं कर्मठपणा यानींच समाजात विश्वास उत्पन्न करता येतो व लोकांच्यामध्यें संपादन केलेल्या विश्वासाच्या जोरावरच खरीं कार्यें घडून येतात, असा सामाजिक कार्यांतील शास्त्रीबोवांचा दृष्टिकोन दिसून येतो.

या विधायक दृष्टिकोनातूनच शास्त्रीबोवांनीं दे. ब्र. शि. ब्राह्मण संस्था, वैदिक संशोधन मंडळ, सरस्वती मंदिर, भारत हायस्कूल, समर्थ मंडळ इत्यादि संस्थांच्या स्थापनेपासून महत्त्वाचा भाग घेतला आहे. वेदशास्त्रोत्तेजक सभेचे (१९४२ ते १९५०) चिटणीस म्हणून केलेलें कार्यहि महत्त्वाचें आहे. हिंदु-धर्म परिषद्, अ. भा. शुद्धि परिषद्, इत्यादि नैमित्तिक परिषदांमधूनहि अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, चिटणीस या नात्यानें शास्त्रीबोवांनीं फार मोठी जबाबदारी यशस्वीपणें पार पाडली आहे.

## कौटुंबिक

प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण ॥
महावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ दासबोध

शास्त्रीबोवांचें गृहसौख्य अतिशय संमिश्र आहे. सुरवातीची आर्थिक स्थिति अगदींच सामान्य. नंतर पुष्कळ वर्षे कोर्टात खेटे घालून उपजीविकेचें साधन संपादावें लागलें. वडिलार्जित घरसुद्धा सावकाराच्या कर्जातून सोडवितांना फार त्रास झाला. लहानपणींच मातृछत्र दूर झाल्यानें लहान भावंडांची जबाब-

दारी अगावरच. अल्पवयी अपत्यांच्या मृत्यूचे तडाखे सहन करावे लागलेच आहेत. पत्नीच्या आजारीपणानें तत्र मार्गे सारखें लागलेलें असे. नुकत्याच त्यांच्या पत्नी निवर्तल्या. त्यामुळें चाळीस पंचेचाळीस वर्षे सुरळीत चाललेल्या संसारशकटाचें एक चाकच गळून पडलें. या सर्व अडचणींना धीमेपणानें व यशस्वीपणें तोंड देत देत शास्त्रीबोवांनीं आपला संसारशकट पुढें नेलेला आहे. घरगुती अडचणींचा सार्वजनिक आयुष्यावर त्यांनीं कधीं परिणाम होऊं दिला नाहीं. तसेंच घरातहि सार्वजनिकपणा येऊं दिलेला नाहीं. प्रत्येक गोष्टीची मर्यादा बरोबर ओळखणें व कोणाचेंहि कोणावर अतिक्रमण होऊं न देणें या विषयात व्यवहारी शास्त्रीबोवा सदैव तत्पर असतात. या कौशल्यामुळें संसार व सार्वजनिक आयुष्य हे दोनहि परस्परास पूरकच झालेले आहेत. घरांतील दु:ख बाहेरच्या कामात रंगून विसरून जावें आणि बाहेरच्या समाधानानें घरच्या वातावरणात उत्साह व समाधान निर्माण करावें हा शास्त्रीबोवाचा स्वभावच बनून राहिला आहे. शास्त्रीबोवाचा घरचा व्याप जरा मोठाच. हा सर्व व्याप सांभाळून शास्त्रीबोवांच्या पत्नी शास्त्रीबोवांना त्यांच्या कार्यांत मदत करीत असत. यापुढें एकाकीपणा शास्त्रीबोवाना विशेषच जाणवणार. आपल्या साठ वर्षांच्या आयुष्याचें सिंहावलोकन करीत असता शास्त्रीबोवांना ही उणीव फारच भासेल.

शास्त्रीबोवाचा स्वत:चा परिवार फारसा मोठा नाहीं. त्याना एक मुलगा व एक मुलगी अशीं दोनच अपत्यें आहेत. मुलें सुविद्य, सुसस्कृत व आज्ञांकित आहेत. शास्त्रीबोवा आपला विनोदाचा काळ त्यांच्यात रममाण होऊन घालवितात.

सुदैवानें सध्या शास्त्रीबोवाची आर्थिक स्थिती समाधान मानण्यासारखी आहे. प्राचीन पंडितांना क्वचितच लाभणारी ही आर्थिक स्थिति उद्योगप्रियता व समाजाभिमुखता या दोन गुणांनीं शास्त्रीबोवांनीं संपादिली आहे.

## व्यक्ति व व्यक्तिमत्त्व

उत्कट भव्य घेवावें । मिळमिळीत अवघेंचि टाकावें ।
नि:स्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ दासबोध

शास्त्रीबोवांचा स्वभाव गुणग्राहक आहे. कोणाचेहि गुण तेवढे त्यांच्या प्रथम ध्यानात येतात दोष लक्षांत आले तरी त्यांच्या मुखातून बाहेर पडणार नाहींत त्यांच्या लिखाणांतहि ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते त्यांचा पुष्कळांशीं मतभेद असेल. शास्त्रीबोवाकडून त्याची निन्दा केव्हांही ऐकावयास मिळावयाची नाहीं.



श्री. चित्रावशास्त्री आणि पत्नी कै. सौ. यमुताई चित्राव
(सन १९२८)

अगदीं विरुद्ध विचारांच्या लोकांतही ते खुल्या दिलानें मिसळू शकतात. जेथें अमत नसेल तेथें वितंडवाद घालीत बसणें त्यांना पसंत नाहीं. जमेल तोंपर्यंत सर्व क्षेत्रांत सहकार्य करण्याची त्यांची सदैव तयारी असते. एकदा विरोध म्हणजे विरोध हें त्यांचें सूत्र नाहीं.

स्वतःचीं मतें ठाम असलीं तरी त्यांना दुसरी बाजू असते, हें ते विसरत नाहींत. म्हणूनच त्यांच्या बुद्धींत समतोलपणा दिसून येतो. योग्य समजुती-नंतर मतें बदलण्यास त्यांची तयारी असते. मतपरिवर्तन हें जिवंत विचारांचें निदर्शक होय. पण याचा अर्थ सरड्याप्रमाणें रंग बदलणें नव्हे.

शास्त्रीबोवांची प्रकृति सुदृढ आहे. पूर्वी निकोपहि होती. पण १९३२ सालीं चरित्रकोशाचा प्राचीनखंड प्रसिद्ध करण्यात शास्त्रीबोवांनीं जिवापाड मेह-नत घेतली व त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून शास्त्रीबोवा त्यावेळीं अंथरुणाला खिळून राहिले; त्यांतून ते उठतील असें त्यांनाहि वाटलें नव्हतें. पण सुदैवानें त्या आजारातून ते उठले. त्यांत त्यांचा खऱ्या अर्थानें पुनर्जन्म झाला. त्यांची प्रकृति पूर्वीसारखी निकोप झाली नाहीं. दम्यानें शरीरांत कायम घर केलें. तथापि त्यामुळें शास्त्रीबोवांच्या व्यक्तिमत्त्वावर कांहीं परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं. सुदृढ शरीरयष्टि, प्रसन्न पण गंभीर मुद्रा यांची दुसऱ्यावर विलक्षण छाप अद्यापि पडते.

शास्त्रीबोवांच्या या व्यक्तिमत्त्वामुळें त्यांच्या वक्तृत्वाला विशेष स्थान प्राप्त होण्यास मदत झाली आहे. शास्त्रीबोवांच्या लेखनापेक्षां वक्तृत्वांत एक प्रकारचें तेज आहे. समतोलपणा न सोडतां प्रतिपक्षावर चौफेर हल्ला करितांना शास्त्री-बोवांचा आक्रमकपणा लक्षांत न येतांच श्रोतृवर्ग जिंकला जातो. याच गुणामुळें शास्त्रीबोवांचा सार्वजनिक जीवनांत प्रवेश झाला असें म्हणणें योग्य होईल. भरदार आवाज, विषयाशीं तन्मयता आणि स्पष्ट विचारपद्धति हें त्यांच्या वक्तृ-त्वाचें विशेष होत. विषयाच्या मर्यादा कधीं सुटत नाहींत व तात्त्विक सिद्धा-न्ताची पकडहि ढिली पडत नाहीं. ते व्यक्तिविषयक उखाळ्या काढणार नाहींत किंवा वादांत शिरून आपल्या भूमिकेपासून च्युत होणार नाहींत. त्यामुळें सभेच्या वातावरणांत केव्हांच चिडरपणा निर्माण होत नाहीं.

उत्कशक्ति हा त्यांच्या एकंदर जीवनकार्याचा आत्मा आहे. वाद-विवाद करीत बसणें हा प्रकार त्यांना मानवत नाहीं. झटकन निर्णय घेणें व कामाला लागणें हा त्यांचा स्वभावच झाला आहे. यामुळें नेमकें मोजकें बोलणें ही संवय त्यांना लागली आहे. यावरून ते रुक्ष आहेत असें म्हणणें योग्य नव्हे. "यः क्रियावान् स पण्डितः" ही त्यांची भूमिका आहे.

रसिकतेची बाजूहि शास्त्रीबोवाच्या जीवनांत एका कोपऱ्यांत सदैव वास करीत असते, हें त्याच्या जवळच्या माणसांना चांगलें माहीत आहे. नाटक, सिनेमा, गाणें हें त्याना आवडतें. पण करमणुकीपेक्षां अधिक महत्त्व त्या विषयांना नाहीं. व्यसन तर कसलेंच नाहीं. मात्र लवंग-सुपारी सदैव संनिध सिद्धहस्त आहेत.

असो. आपले चित्रावशास्त्री कसे आहेत हें मीं थोडक्यांत येथें सांगितलें. याहीपेक्षा ते फार मोठे आहेत. तसें वर्णन करावयाचें झाल्यास अभिनंदन ग्रंथाची सर्वच जागा त्यासाठीं खर्ची घालावी लागेल.

शास्त्रीबोवांना साठ वर्षें पूर्ण झालीं आहेत. त्याच्या आयुष्याचा महत्त्वाचा काळ त्यानीं सामाजिक कार्यांत व संशोधनांत खर्ची घातला आहे. आपलें कर्तव्य त्यानीं पूर्णपणें पार पाडलें आहे. आता विश्रांति घेण्याचा त्याना पूर्ण अधिकार आहे. तथापि काम करणें हें त्यांचें एक व्यसनच बनलें आहे. अजूनहि डेक्कन कॉलेजमध्यें तरुणांच्या उत्साहानें ते कार्य करीत असतात. परमेश्वरानें त्यांना निरामय दीर्घायुष्य द्यावें व "स्थलकोश" "ऋग्वेदाचा उपसंहार" इत्यादि ग्रंथ प्रकाशित करण्याचें सामर्थ्य त्याना द्यावें; हीच त्यांच्या सर्व चहात्याची इच्छा या सुमङ्गल महोत्सव प्रसंगीं व्यक्त करतों.

# चित्रावशास्त्री यांचा व माझा परिचय

( श्री. केशवराव मारुतराव जेधे )

चार सहा महिन्यापूर्वीची गोष्ट. पुणें नगर वाचन मंदिरांत सायंकाळीं वाचावयास गेलों होतों. खुर्चीवर बाजूला श्रीयुत चित्रावशास्त्री विश्रांती घेण्याकरिता बसले असता मी त्याना त्यांच्या प्रकृतीबद्दल विचारणा केली व प्रश्न केला कीं आता आपलें वय काय ? त्यांनीं उत्तर केलें, "लवकरच मला ६१ वें वर्ष लागेल; आणि प्रकृतीबद्दल म्हणाल तर वरून प्रकृति चांगली दिसते पण आतून रोगानें पोखरून गेलेली आहे. रक्तदाब वाढल्यानें फारसा कोठें बाहेर जात नाहीं आणि सायंकाळीं थोडें वाचन व थोडी विश्रांति याखाठीं येथें येतों आणि अशा वेळीं आपल्यासारख्या चार दोन मंडळींच्या भेटी होतात व सुखासमाधानाचे चार शब्द बोलता येतात." या वेळीं शास्त्रीबोवांची मुद्रा गंभीर होती व ते मोठ्या आपलेपणानें माझ्याशीं बोलत होते. मधून मधून ओंठावर हास्य चमकत होतें. त्याचा माझा परिचय विरोधातून झालेला. ते पर्वी हिंदुसभेचे अध्यक्ष होते आणि एकदा त्यांच्या अध्यक्षतेखालीं सार्वजनिक सभेच्या हॉलमध्यें कै. भास्करराव जाधव यांचें व्याख्यान ठरलें होतें. त्या व्याख्यानास मी व आमचे मित्र कै. दिनकरराव जवळकर असे आम्ही दोघेहि हजर होतों. कै. भास्करराव जाधव यांचें व्याख्यान हिंदुधर्माच्या दृष्टीनें "एक देव, एक वर्ण व एक धर्मग्रंथ" या विषयावर होतें. व्याख्यान उत्तम, समतोल बुद्धीचें, विचारपरिप्लुत व तर्कबुद्धीला पटण्यासारखें झालें. श्री. चित्रावशास्त्री यांनीं त्यावेळीं हिंदुधर्मातून बाहेर गेलेल्या लोकांचें शुद्धीचें कार्य हातीं घेतलें होतें. अध्यक्ष या दृष्टीनें त्यांची योजना योग्य होती. त्यांनीं सभेचें महत्त्व जाणून व निरनिराळ्या मतांची मंडळी जमलेली पाहून सभा व्यवस्थितपणें चालविण्याचा प्रयत्न केला. पण मी व कै. जवळकर असे आम्ही त्या वेळीं अत्यंत जहाल होतों. तारुण्याच्या ऐन भरांत असल्यानें सभेमध्यें व्यत्यय आणण्यास सुरुवात केली. सभेचें रूपांतर दंगलींत झालें व शेवटीं सभा उधळली गेली. तेव्हापासून आम्ही एकमेकाला ओळखतों आहोंत. तें साल १९२४ किंवा १९२५ असावें. त्यानंतर एकदां मी व जवळकर त्यांना घरीं भेटावयास गेलों व एकमेकांचीं मतें समजावून घेतलीं. त्या वेळेपासून शास्त्रीबुवा बरीच वर्षें हिंदुसभेचे अध्यक्ष होते; पण तेवढ्या अवधीमध्यें त्यांचा आमचा खटका उडण्याचा प्रसंग आला नाहीं. समाजांत समता नांदावी, उच्चनीच भाव नष्ट

व्हावा, समाजात एकोपा असावा, धर्माची सुधारणा व्हावी, हिंदुधर्मात असलेली सनातनी, पुरातनमतवादी दृष्टि बदलून त्या ठिकाणीं पुरोगामी दृष्टि येऊन हिंदुधर्म उज्ज्वल व्हावा या दृष्टीनें समाजात प्रयत्न चालू असतां शास्त्रीबुवांची गाठ आर्यसमाजात पधरा वर्षापूर्वी पुनः पडली. शास्त्रीबुवांचा त्या वेळचा पोषाख आहे तसा आजतागायत आहे. साधी रहाणी, वागण्यात सभ्यपणा, शिष्टाचार हे गुण ओतप्रोत भरलेले आहेत. संस्कृत भाषेचे पंडित आणि विद्वान म्हणून त्यांची आजच्या महाराष्ट्रात गणना आहे. ज्ञानकोशमंडळात त्यांनीं कै. डॉ. केतकर व श्रीयुत यशवंतराव दाते यांचेबरोबर काम करून मराठी भाषेची सेवा केली आहे. ऋग्वेदाचें मराठी भाषांतर करून धर्माची निरपेक्ष बुद्धीनें त्यांनीं सेवा करून समाजावर उपकार केले आहेत. जागतिक महत्वाच्या संस्कृत कोशकार्यांत ते सहभागी झाले आहेत. अशा दृष्टीनें आपल्या देशातील पवित्र व जुनी भाषा संस्कृत हिची ते सेवा करीत आहेत. त्यांच्या विद्वत्तेचा व ज्ञानाचा फायदा देशाला आज भरपूर होत आहे.

काँग्रेसमध्यें काम करीत असतां माझी बैठक नेहमीं श्री. काकासाहेब गाडगीळ यांचेकडे असे. त्या वेळीं सात आठ वर्षांपूर्वी शास्त्रीबुवा आपले तीन जाडे ग्रंथ घेऊन काकासाहेबांचेकडे आले. त्यांनीं त्यावेळीं म्हटलें, "केशवराव, हे माझे तीन ग्रंथ माझ्या आयुष्यातील मोठी कामगिरी आहे, प्राचीन, अर्वाचीन आणि आधुनिक असे ऐतिहासिक दृष्टीनें लिहिलेले तीन चरित्रकोश ग्रंथ मीं लिहिले आहेत. ते उपयुक्त व संग्रहीं ठेवण्यासारखे आहेत. काकासाहेबांनीं हे ग्रंथ घेतले आहेत, तुम्हीहि घ्या." तिसऱ्या ग्रंथामध्यें देशातील पुढाऱ्यांचीं त्रोटक चरित्रें दिलीं असून त्यात माझाहि उल्लेख आहे. शास्त्रीबुवा आपणास विसरले नाहींत हें पाहून मी लगेच त्यांच्या गुणाचें चीज म्हणून तेथेंच तीन ग्रंथ विकत घेतले व लगेच खिशातून पैसे काढून दिले तसा स्वभावानें मी चिक्कू आहें; पण शास्त्रीबुवांच्या कामगिरीचा गौरव करण्याकरितां म्हणून लगेच ग्रंथ खरेदी केले. या तीन ग्रंथांनीं शास्त्रीबुवांनीं मराठी वाङ्मयात मोठी भर घातली असून समाजाला मोठे ऋणी केलें आहे.

पुष्कळ वेळा फिरावयास जात असतां रस्त्यानें आमच्या गाठीभेटी होतात व हस्तभुस्तानें एकमेकांचें स्वागत होत असतें राजकीयदृष्ट्या दोघांचीं मतें जवळजवळ सारखीं, पण मी काँग्रेस सोडल्यानें त्यांना फार वाईट वाटलें एकदा नदीच्या पलीकडे फिरावयास जात असतां त्यांची गांठ पडली आणि त्यांनीं आपलें हृदय माझ्यापुढें खुलें केलें. ते म्हणाले. "केशवराव, अठरा वर्षें तपश्चर्या करून तुम्ही एकदम काँग्रेस सोडली हें फार वाईट केलेंत. तुमचें वर्तन

अगदीं शिपायासारखें आहे. एकदा ठरलें कीं त्याप्रमाणें वागावयाचें हा तुमचा स्वभाव; पण त्यामुळें तुमचें केवढें नुकसान झालें! तुमचा फायदा भलतेच लोक घेत असतात आणि तुम्ही त्याच्याकरिता स्वतःचें नुकसान करून घेता. आज कॉंग्रेसमध्यें तुमचें स्थान मोठें होतें, व त्यागही काहीं कमी नव्हता. आतां स्वराज्याचें फळ हातीं आलें असतां तें चाखावयाचें सोडून तुम्ही कॉंग्रेस सोडून गेलात हें बरें केलें नाहीं." त्यांनीं माझ्या सार्वजनिक आयुष्याबद्दल चांगले उद्गार काढले आणि स्पष्टवक्तेपणाची तारीफहि केली; पण फळ पदरात पडण्याची वेळ आली असता त्याला लाथ मारून मीं बाहेर पडल्याबद्दल त्याना फार वाईट वाटलें व त्याबद्दल त्यांनीं मला बोलूनहि दाखविलें. ही गोष्ट १९४८ सालच्या अखेर अखेरची. भलत्याच्या नादीं लागून आपल्या राजकीय आयुष्याची होळी करून घेतली याबद्दल त्यांनीं दुःखोद्गार काढले, त्यावेळचा प्रसंग मला आठवतो. त्यावेळीं ते गंभीरपणें बोलत होते व त्याच्या ठिकाणीं सहानुभूति परिपूर्ण होती. अशीं सहानुभूतीचीं माणसें समाजात फारच थोडीं असतात. तेव्हापासून शास्त्रीबुवाबद्दल माझा आदर वाढत गेला व आजतागायत आहे तसाच आहे.

शास्त्रीबुवांना दीर्घायुष्य चिंतितों, व त्यांचे हातून अशीच समाजाची सेवा उत्तरोत्तर घडो अशी आशा व्यक्त करतों.



# सिद्धपुरुष सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

( श्री. ग. म. नलावडे )

माझ्या ल्हानपणीं ज्या काहीं व्यक्तींनीं मला आकर्षित करून घेतलें त्यामध्यें विद्यानिधि श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांची गणना मी आतांपर्यंत करीत आलों आहे श्री. चित्राव हे माझ्यापेक्षा फार तर ७ ८ वर्षांनीं वडील पण ३० वर्षांपूर्वी मुद्दा त्यांच्या अस्खलित वाणीनें, अमोघ विचारसरणीनें नि ठासीव वक्तृत्वानें मी मी मोडून गेलों.

१९१६–१७ चा सुमार. त्या वेळीं कै. डॉ. गोपाळराव पळसुले यांनीं स्थापन केलेल्या भारत स्वयंसेवक मंडळाच्या कार्यासाठीं एकत्र येत होतों. डोक्याला रुमाल बांधलेली, भरीव बांध्याची, तेजस्वी तरतरीत चेहऱ्याची एक व्यक्ति अचानक त्या सभेला आली हा मटजी वेषाचा मनुष्य इथें कशाला अशा प्रश्नार्थक मुद्रेनें आम्ही एकमेकांकडे पाहिलेंहि कै डॉ पळसुले यांनीं त्याची सर्वांना ओळख करून दिल्यावर तिथें जें भाषण झालें त्यामध्यें शास्त्रीबोवांनीं समाजसेवेसंबंधीं काहीं विचार धीरगंभीर नि विद्वत्तापूर्ण भाषेंत मांडले. संस्कृत प्राकृत अवतरणांनीं युक्त असें त्यांचें अमोघ वक्तृत्व ऐकून आम्ही सारे स्तंभित झालों. शास्त्राध्ययन करणारी माणसेंही राजकारणी मुत्सद्यांप्रमाणें सभा जिंकू शकतात याचा पडताळा आला तेंव्हांपासून माझा नि शास्त्रीबोवांचा परिचय वाढला. त्यांनीं लिहिलेलीं संध्या, ब्रह्मयज्ञ इत्यादि आचारधर्मावरील पुस्तकें मीं वाचलीं, त्यांच्यापाशीं बसून समजावूनही घेतलीं. पुढें पुण्यास डॉ. कुर्तकोटी श्रीशंकराचार्य यांच्या अध्यक्षतेखालीं एक हिंदुधर्म परिषद घेण्यात आली त्यावेळीं ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद ऐन भरात होता त्या सभेंत कै नामदार जाधवांच्या विधानांना शास्त्रीबोवांनीं जुने नवे आधार देऊन जीं समर्पक उत्तरें सभेंत दिलीं तीं अद्याप माझ्या स्मरणांत आहेत सहज लीलेनें सभा जिंकण्याची त्यांची हातोटा जशी मला त्या वेळीं दिसली त्याचप्रमाणें गर्दीगदारोळाच्या सभेंत शांतता राखण्याची त्यांची कामगिरीही मीं अनेक सभांत त्यांच्या समवेत काम करताना पाहिली हा ब्राह्मण नुसताच पंडित नसून पट्टीचा योद्धा आहे हें ध्यानांत घेऊनच मीं त्यांचे तेजस्वी लेख वेळोवेळीं माझ्या संग्राम साप्ताहिकांत मुद्रित केले. पुण्यात हिंदुमहासभेची शाखा काढण्यांत शास्त्रीबुवांनीच पुढाकार घेतला येवढेंच नव्हे तर तें कार्य त्यांनीं सबंध महाराष्ट्रांत दौरा काढून नांवारूपाला आणलें त्यावेळीं शुद्धि संघटन, गोरक्षण,

अस्पृश्योद्धार नि हिंदु हितरक्षण हींच हिंदु महासभेचीं प्रमुख कार्यें मानलीं जात असत.

हें कार्य करीत असताहि त्यांनीं आपल्या साहित्यसेवेंत कधींच खंड पडू दिला नाहीं. त्यांनीं ऋग्वेदाचें सुलभ मराठी भाषांतर केलें. माझ्या कल्पनाशक्तीलाहि अनाकलनीय असा प्राचीन अर्वाचीन चरित्रकोश तयार केला; यांतच त्यांचा दीर्घोद्योग, चिकाटी, अभ्यासू वृत्ति नि राष्ट्रीय प्रवृत्ति दिसून येते. देशाचें नि प्राचीन ऋषिमुनींचें घेतलेलें सांस्कृतिक ऋण फेडण्यासाठीं खरोखर ते झटले, झिजले. गडगडाटी पावसापेक्षा थेंबाथेंबानीं झिरपून भूमीला समृद्ध करण्याचें गाजावाजा न करता केलेलें असें कार्य शास्त्रीबोवानीं केलें, त्यात त्यांनीं नांवाची, कीर्तीची, प्रसिद्धीची हाव धरलीच नाहीं. सदैव हसतमुखानें सर्वांचें स्वागत करून स्वतःचे विचार मनमोकळेपणानें मांडून इतराच्या शंकांचें समाधान करणें ही त्यांची वृत्ति आजच्या व्याधिग्रस्त स्थितींतही कायम आहे. ते सागराप्रमाणें गंभीर भासले तरी वडवानलाप्रमाणें प्रखर दाहक आहेत याची प्रचीती मला वेळोवेळीं त्यांचीं भाषणें ऐकताना आली आहे. विरोधी श्रोते सभेंत विघ्न आणतात असें दिसताच शास्त्रीबोवाची मैदानी तोफ व्यासपीठावर गरजली कीं निमिषार्धांत सारी सभा मंत्रमुग्ध झाली, असलीं दृश्यें मीं अनुभवलीं आहेत.

'शापादपि शरादपि' या ऋषिवर्णनाप्रमाणें ते वाणी लेखणीचे सव्यसाची धनुर्धर, ब्राह्म आणि क्षात्रवृत्तीचें जणु काय एकत्रीकरण, त्यांचें सान्निध्य म्हणजे गंगेचें पावित्र्य, वैदिक धर्माची तेजस्विता, प्राचीन पूर्वजाची मूर्तिमत तपस्या, अशी देशभक्त, धर्मप्रवर्तक, समाजसेवक व्यक्ती आज पुण्याचें भूषण होऊन राहिली आहे. त्यांनीं आपल्या तेजस्वी आयुष्याचीं साठ वर्षे ओलांडून ते ६१ व्या वर्षांत पदार्पण करीत आहेत. एवढ्या दीर्घ कालांत त्यांच्यावर आलेल्या सांसारिक आपत्ती त्यांनीं प्राप्त कर्तव्य म्हणून हसतमुखानें सोसल्या, पचविल्या, त्याबद्दल त्यांचे ठायीं विषाद नाहीं. ईश्वरप्रणीत वेदांचें ज्यांनीं मंथन केलें त्यांचें मन एवढें स्थिर नि त्यांची वृत्ति एवढी सहनशील असावी यांत नवल नाहीं. त्यांची माझी दृढ मैत्री आहे हें मला केवढें भूषण वाटतें! हें मानाचिन्ह मला सदैव लाभो एवढी एकच इच्छा मी या शुभ समयीं प्रकट करतों.

---

# आधुनिक कोशयुगांतील एक मानस्तंभ

( श्री. चिंतामण गणेश कर्वे )

विसाव्या शतकात डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी भारतांत जें कोशयुग प्रवर्तित केलें त्या युगातील एक स्वतंत्र कोशचरनेचा भाग विद्यानिधि चित्रावशास्त्री यांनी उचलून तो यशस्वी रीतानें पारहि पाडला. मागील शतकात असेच एक कोशयुग-प्रवर्तक होऊन गेले. ते म्हणजे रघुनाथ भास्कर गोडबोले होत. यांनी १८६३ साली मराठी कवितामधील कठिण शब्दाचा अर्थ देणारा ' हसकोश ', १८७० साली मराठी भाषेचा नवीन कोश, १८७६ साली 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ' व १८८१ साली ' भरतखंडाचा अर्वाचीन कोश ' प्रसिद्ध केले. शेवटले दोन कोश चित्रावशास्त्री याच्या कोशाची जुनी आवृत्ति म्हणता येईल अशा चरित्रात्मक स्वरूपाचे आहेत. भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोशात कोशकर्ते म्हणतात:—

" देशामध्यें अशा जातीचा ग्रथ असल्यापासून जे लाभ आहेत त्यातील पहिला हा कीं, आमच्या सस्कृत भाषेंत जे प्राचीन इतिहासाचे ग्रथ आहेत, त्यात ज्या गोष्टी श्लोकबद्धसरणीमुळें मुग्ध ( मोघम ) लिहिल्या असतात, म्हणजे पाडव अज्ञातवासार्थ मत्स्यदेशात गेले, चपराजानें चपानगरी स्थापली, जनक-राजा याज्ञवल्क्य ऋषीस शरण गेला. परतु मत्स्यदेश तीन चार असल्यामुळें कोणत्या मत्स्यदेशात पाडव गेले ? चप दोन असल्यामुळें कोणत्या चपराजानें चपा-नगरी स्थापिली, व जनकराजे अनेक असल्यामुळें कोणता जनकराजा याज्ञवल्क्यास कधीं शरण गेला ? त्या सर्वांची निश्चयात्मक टीका, टीकाकारास लिहिण्यास सापडते. हें साधन आमच्या देशात अवश्य पाहिजे असता तें नसल्याकारणानें आजपर्यंत जेवढ्या म्हणून टीका झाल्या आहेत, त्याचे कर्ते न्याय, मीमासा व व्याकरण या विषयातून उत्तम प्रवीण असताहि इतिहासविषयक टीका लिहि-ताना त्यास, श्लोकातील एक दोन अक्षरापुढें इति, म्हणजे जसें ( पृथुरिति ) ( ध्रुवराष्ट्रेति ) इतकेंच लिहून अकाच्या ओळीच्या ओळी मांडून ठेवून स्वस्थ बसावें लागलें असल्याचें भारत पाहिलें म्हणजे ध्यानात येत. म्हणून ही अड चण त्याच्या योगानें दूर होते त्या ग्रथाचा हा सामान्य उपयोग आहे काय ?"

या रघुनाथशास्त्र्याच्या चरित्रकोशाच्या उपयुक्ततेच्या अचूक मीमांसे-वरून चित्रावशास्त्र्याच्या चरित्रकोशाची महती कळून येणार आहे. गोडबोले यांनी पौराणिक आणि अर्वाचीन चरित्रेंच तेवढीं विवेचिलीं आहेत, वैदिक

व्यक्तींच्या चरित्राचा ऊहापोह करण्याचें साधन व सामर्थ्य त्याजवळ साहजिक त्या काळाच्या मानानें नसावें. ही आवश्यक अशी अनुकूलता त्यानतर ६० वर्षांत पाश्चात्य चिकित्सक संशोधनदृष्टीमुळें इकडे निर्माण झाली. विविध वाङ्मयक्षेत्रात नवी गणती सुरू होऊन लवकरच चागले ज्ञानांकुर वर आले. प्राच्यविद्यांच्या सूक्ष्म अभ्यासात पाश्चात्य पडितांची विशिष्ट चिकित्सक शास्त्रीय पद्धति घेऊन महत्त्वाचे आणि मौलिक शोध आपल्यातील विद्वानांनीं पुढें आणले. ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांचा श्रौत वाङ्मयाचा चागला चिकित्सक अभ्यास होता व त्यांनीं ज्ञानकोशाचें संपादन चालू असतानाच वैदिक संशोधनासाठीं श्रौताचार्य धुंडिराजशास्त्री बापट, चिंतामणशास्त्री दातार, चित्रावशास्त्री प्रभृति शास्त्रीमडळी जवळ करून त्याच्यापासून या वाङ्मयाची जुनी अर्थ विनियोग परपरा जशी त्यांनीं अवगत करून घेतली त्याचप्रमाणें आपली पाश्चात्य चिकित्सक दृष्टि या शास्त्रीमडळींना देऊन त्याच्यात आधुनिकपणा आणला. डॉक्टरसाहेबांचें वैदिक वाङ्मयासबधीं या सूक्ष्म अभ्यासानंतर असें ठाम मत बनलें होतें कीं, हें प्राचीनतम वाङ्मय भारतातच निर्माण झालें आहे, उत्तरध्रुवप्रदेशीं नाहीं, तसेंच वैदिक यज्ञसस्था देखील भारतभूमीवरच विकास पावली दाशराज्ञ युद्धानतरच सर्व संहिता व सूक्तें तयार झालीं असा डॉ. केतकराचा पूर्वपक्ष, तर सिद्धेश्वरशास्त्री चित्राव व धुंडिराजशास्त्री बापट उत्तरपक्ष करीत असा अनेक दिवस वाद चालू होता नतर डॉक्टरांनीं अनेक पुरावे पुढें करून या शास्त्रीद्वयास आपल्या बाजूस ओढलें. श्री. यशवतराव दाते व चित्रावशास्त्री एकत्र बसून दाशराज्ञयुद्धाचा सांगोपाग अभ्यास अनेक दिवस करीत होते. असो हें येथें सांगण्याचा उद्देश, सिद्धेश्वरशास्त्री जरी ज्ञानकोशांत येण्यापूर्वी चागले सस्कृतभाषाव्याकरण-शास्त्रज्ञ व वैदिक पडित होते तथापि त्यांना कोशरचनेला लागणाऱ्या अभ्यासाची शास्त्रीय आणि सशोधकीय दृष्टि ज्ञानकोशांत काम करतानाच आली असली पाहिजे. श्रौताचार्य बापट तर नेहमीं हें ऋण कृतज्ञतेनें बोलून दाखवितांना पुष्कळांनीं ऐकलें असेल.

प्राचीनतम काळांतील सर्व परिस्थितीचा इतिहास लक्षांत येण्यासाठीं सहितांतर्गत शब्दसृष्टीशीं नीट ओळख करून घेतली पाहिजे. अशी ओळख करून घेणें सहज शक्य नाहीं व त्यामुळें डॉ. केतकरांच्या शिवाय कोणाच्याहि मनांत ही सृष्टि परिश्रमानें परिचित करून घेण्याचें येणें शक्य नव्हतें. डॉ. केतकर यांनीं पुण्यास कचेरी आणल्यावर चारहि वेदांतील शब्दांचें पृथक्करण करून, देवता अजीव जीव मानवी असा चार विभागांत वैदिक शब्दसृष्टि आणली व मॅक्डोनेल कीथ यांच्या ‘ वेदिक इडेक्स ’ च्या आधारें कांहीं मद-

त्यांच्या शब्दावर साधार विवेचन दिलें. असें हें ज्ञानकोशाच्या तिसऱ्या विभागांतील ५ वें प्रकरण ( वेदकालांतील शब्दसृष्टि ) एक महत्त्वाचा वैदिक कोशच म्हणतां येईल. पण याकडे फार थोड्या संशोधकांचें लक्ष्य गेलें आहे.

श्री. चित्रावशास्त्री यांना आपल्या प्राचीन चरित्रकोशाच्या कामीं गोडबोले यांच्या कोशांप्रमाणेंच हा भाग उपयोगीं पडला असला पाहिजे. या प्रकरणाचें असल्य चिह्नयावार साहित्य कै. शंकरशास्त्री पराडकर वैद्य याच्या नेतृत्वाखालीं तयार होत असताना श्री. चित्राव हे ज्ञानकोशात होतेच.

तसेंच महाराष्ट्रीय ज्ञानकोशांत जीं प्राचीन आणि अर्वाचीन चारित्रें (अदमासें वैदिक २००; पौराणिक ३००; रजपूत १००; मुसलमान २००; मराठे ४००; इंग्रजी अमदानींतील पुरुष १०० ) दिलीं होतीं त्याचा त्यांना उपयोग झालाच; शिवाय त्यांनीं अनेक इंग्रजी, मराठी चरित्रपर ग्रंथ, नियतकालिकें, टिपणें, अहवाल इ. साहित्यातून लागेल तेवढी माहिती काढून घेतली. अर्वाचीन चरित्रकोशासाठीं अनेक भाषांतील चरित्रनायक निवडून त्यांच्याविषयीं अधिकृतपणें लिहिण्यास कोण यातायात पडली असेल, किती लोकांची मनधरणी करावी लागली असेल, किती जवळच्या मडळींना त्याचीं ( ते अपेक्षित असतील, भीड धरिला लावीत असतील म्हणून ) भलावणी न केल्यामुळें दुरावावें लागलें असेल; किंवा अमुक एक माहिती दिली नाहीं, थोडीच दिली, इ. कारणानीं कितीकाचा घुस्सा सहन करावा लागला असेल, याची कल्पना आम्हास पुरेपूर आहे. अनेक वर्षांनून जेमतेम एकदाच निघणाऱ्या अशा सदर्भग्रयाला जी विशिष्ट पातळी ठेवावी लागते ती आपणाकडे कोशसपादकाला ठेवणें अनेक अडचणींमुळें अशक्य होऊन जातें. असो.

श्री. चित्राव यानीं प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे कालानुक्रमें एकामागून एक असे तीन मोठे कोश १९३२ ते १९४७ या पंधरा वर्षांत जे प्रसिद्ध केले त्यांत सुमारें १९००० चारित्रें आलीं आहेत. एवढें मोठें कार्य शास्त्रीबोवानीं एकट्यानीं पेललें, ही गोष्ट त्यास व महाराष्ट्रास भूषणभूत आहे यात शकाच नाहीं. मोठा सपादकवर्ग किंवा प्रचारक न ठेवतां निमूटपणें, एकनिष्ठेनें त्यांनीं हें अत्यत क्लिष्ट, वादग्रस्त व अपुऱ्या साधन-साहित्याचें सपादन करून त्याचें प्रकाशनहि स्वतःच बराच खर्च सोसून केलें, हें पाहिल्यास इग्रजी शिक्षणाच्या चाकोरींतून न गेलेला पण आधुनिक चाकोरीच अभ्यासाशीं परिचित असलेला आमचा शास्त्रीवर्ग, वेळ आल्यास विद्यापीठाच्या मुर्शीनून मुद्रा घेऊन बाहेर पडलेल्या ' साहेबी ' पडिताच्या तोंडीचें सशोधन-लेखन करू शकतो, याची कोणालाहि खात्री पटणार आहे.

अशा कोशस्वरूपी संदर्भ ग्रंथाच्या संपादनांत व प्रकाशनांत अनेक दोष दाखविले जातात; पण त्या परिस्थितींत खाजगी रीतीनें, अपुऱ्या साहाय्य-साधनांनीं अशीं कामें उरकलीं जातात ती परिस्थिति नीट लक्षांत घेतल्यास झालें हेंच विशेष म्हणावें लागतें. 'विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम्।' या प्रसिद्ध उक्तीप्रमाणें 'कोशकर्तैव जानाति कोशसंपादनश्रमम्।' अशी स्वरचित स्वानुभवी उक्ति रूढ करावी लागेल. अमुक अमुक प्रकारें कोशाची योजना आणि मांडणी केली पाहिजे असें 'परोपदेशे पांडित्य' करणारे कितीतरी भेटतात; पण अखेरीस सर्व व्यवस्था करूनहि सर्व गोष्टी एकट्यालाच कराव्या लागतात व कसेंतरी एकदां हें काम हातावेगळें होऊं दे, असें कोशकाराला होऊन जातें. कोश काढण्याच्या सुरुवातीस केलेली योजनाहि पुढें कमी अधिक प्रमाणांत बदलते, असा सर्वच कोशकाराचा अनुभव आहे.

बरें, जिवापाड मेहनत करून, झीज सोसून एकदाचा असा मोठा कोश बाहेर काढला तरी त्याचें कोणी लागलीच चीज करतील असेंहि नाहीं. काढणाऱ्यालाच तो खपविण्याची, त्याच्याविषयीं वर्तमानपत्रें-मासिकें यांतून अभिप्राय आणविण्याची, विद्वद्वृवाच्या तोंडून त्याविषयीं कांहीं शाबासकीचे मोडके तोडके शब्द बाहेर पडतील अशी खटपट करण्याची सर्व यातायात करावी लागते. संपादक-प्रकाशकाच्या अनेक वर्षांचा डोक्यावरचा भार कोश बाहेर पडल्यानंतर कमी होण्याऐवजीं पुस्तकाचे भारे समोर पडलेले पाहून त्याची छाती दडपून गेलीच असते. इतकें विस्तारानें सांगण्याचें कारण, ललित वाङ्मय किंवा पाठ्य पुस्तकें यांच्याप्रमाणें हव्हास खपणारें व पैसा मिळवून देणारें हें कोशसाहित्य नव्हे. असें असूनहि श्री. चित्रावशास्त्री यांनीं एकामागून एक तीन मोठाले कोश काढून आपला संकल्प पुरा केला.

या तीन कोशग्रंथांची योग्यता, प्रमाणता व उपयुक्तता सर्वांना सारखीच वाटेल असें नाहीं. जों जों अलीकडच्या काळाकडे यावें तों तों साधनसंभार वाढत जातो व अडचणी उत्पन्न होतात. निश्चित मत देणें अवघड होऊन बसतें. शिवाय, लेखनविषयाशीं परिचित असे अनेक विद्वान् असतात व त्या प्रत्येकाचें समाधान करणें शक्य नसतें. वैदिक पौराणिक काळांतील कांहीं व्यक्तींची मलावणी केली न केली, किंवा कशीहि आपल्याला उपलब्ध असलेल्या साधनद्वारा केली व काम भागवलें तरी कोणाला विशेष कांहीं खटकेल, असें होत नाहीं. तसें मध्ययुगीन किंवा अर्वाचीन चरित्रकोशाच्या बाबतींत होत नाहीं. आजच्या काळांतील, डोळ्यांपुढील व्यक्तींविषयीं कांहीं गुणदोषदृष्टि प्रत्येकाला आली असते व तो त्या दृष्टीनें चरित्रांतील व्यक्तींचें गुणदोषमापन करीत असतो. प्रत्येकाची

आवड वेगळीच असते. ती पुरी न झाल्यास त्याचें मत चांगलें बनत नसतें. सर्वच चरित्रें संपादकाला देणें शक्य नसतें. तो कांहीं तरतमभाव व कांहीं विशिष्ट पातळी ठेवून चरित्रनायकांची निवड करीत असतो; पण ही त्याची वैयक्तिक निवड पक्षपाती मानण्यांत येते. अशा प्रकारच्या अनेक अपरिहार्य अडचणी सोसूनहि श्री. चित्रावांसारखा जो कोशकार निमूटपणें आपलें काम चालू ठेवतो तोच खरा स्थितप्रज्ञ समाजसेवक, किंवा विद्यासेवक म्हणा, असतो.

कोशकाराच्या कष्टाची जशी सुविद्य जनतेलाहि कल्पना येत नाहीं तशीच त्याच्या योग्यतेचीहि येत नाहीं. म्हणून चार दोन कविता प्रसविणाऱ्या, किंवा लघुकथा-निबंध लिहिणाऱ्या एखाद्या लेखकाला साहित्यक्षेत्रात जो मान मिळेल तोहि याला मिळत नाहीं. हा साहित्यिकहि बहुधा समजला जात नसतो. साहित्याचा आढावा घेताना, बहुधा कोशवाङ्मय गुंडून जातें, अथवा अनेकदा दाखला दाखवून देतां येईल. ललित व त्याच्या आनुषंगिक वाङ्मय तेंच एकदर साहित्य; व अशा साहित्यिकाचाच नेहमीं बोलबाला असल्यास किंवा त्यांना मानसन्मान मिळत असल्यास आश्चर्य वाटावयास नको. आपल्याकडे, संकलन किंवा संग्रहण करण्याला विशेष बुद्धि किंवा कौशल्य लागतें, असें समजलें जात नाहीं. भाषांतरकारालाहि असेंच कमी दर्जाचें मानलें जातें. उत्कृष्ट भाषांतरित ग्रंथ न होण्याला हें एक प्रधान कारण आहे. अशा परिस्थितींत कोशकाराला निरुत्साही वातावरणांत एकनिष्ठेनें काम करावें लागतें. त्याच्या चुकांचा ( कित्येकदा त्या चुका नसताहि ) मात्र कोश अक्षय वापरणारेच पंडित बाऊ करून दाखवीत असतात. त्याना अशा कोशाशिवाय तर चालत नाहीं, पण कोशकाराला बरें म्हणवत नाहीं ! तेव्हा पस्तीस वर्षांपूर्वी डॉ. केतकर यांनीं प्रवर्तित केलेलें महाराष्ट्रातलें कोशयुग आता संपत आलें आहे असें वाटणें निराधार नाहीं श्री. चित्राव यांनीं आपल्या कोशमंडळाचें मागेंच विसर्जन केलें. श्री. दाते व श्री. कर्वे यांच्या कोशमंडळाचेंहि सुलभ विश्वकोशानंतर असेंच विसर्जन झालें आहे. बडोद्याच्या व्यायामज्ञानकोशानंतर तेंहि कोशकार्य सरदार मुजुमदारांनीं बंद ठेवलें आहे. श्री. य. गो. जोशी यांचें 'प्रसाद-प्रकाशन' मंडळ 'महाराष्ट्र-परिचया'नंतर प्रि. आपटे यांच्या संस्कृतादि कोशांचें पुनर्मुद्रण करण्याचा संकल्प सोडून आहे, व पुढें सतत सदर्भग्रंथांचेंच प्रकाशन करण्याचा त्यांचा मानस आहे. पण विकट आर्थिक परिस्थितीशीं एकाकी टक्कर देण्याचें सामर्थ्य चालकांना सुदैवानें लाभेल तरच सर्व मनोरथ पुरे होणार आहेत.

शेवटीं, चालू कोशयुगांतील या खंबीर व मार्गदर्शक मानरत्नमाला, नांवाप्रमाणेंच सिद्धेश्वर-सिद्धहस्त असलेल्या या विद्यानिधीला, त्यांच्या अत्यंत महत्त्वाच्या कोशकार्याबद्दल एका समव्यवसायी सहकाऱ्यानें त्यांच्या षष्ट्यब्द-पूर्तीपन दिनीं ही मानवंदना देणें कर्तव्यच ठरतें.

# आमचे चित्रावशास्त्री

( श्री. शंकर रामचंद्र दाते )

श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या वयाला साठ वर्षे यंदा पुरीं होत असून त्यास ६१ वें वर्ष लागत आहे. या समयीं त्यांचें अभिनंदन करण्यास मला फार आनंद वाटतो. शास्त्रीबोवांचा व माझा परिचय ३३ वर्षांपूर्वी झाला, व सन १९२३ ते १९३० पर्यंत त्यांच्याबरोबर प्रत्यक्ष काम करण्याची मला संधि मिळाली. त्यामुळें शास्त्रीबोवांचा निरनिराळ्या कार्यांत मला विशेष सह-वास घडून त्यांची मला चांगली ओळख झाली. त्यानंतर माझें कार्यक्षेत्र बदललें व त्यांचेंहि बदललें. त्यामुळें अलीकडे जरी पूर्वीसारखा सहवास घडत नसला तरी शास्त्रीबोवांचा व माझा स्नेह पूर्वीसारखा अकृत्रिम व कायम आहे; व त्यांच्याबद्दलचा माझ्या मनातील आदरभावहि कायम टिकून आहे.

शास्त्रीबोवा सामाजिक व सांस्कृतिक संक्रमणाच्या काळांत विशेष पुढें आले. त्या काळांत त्यांनीं फार मोठी कामगिरी बजाविली आहे. सन १९१८ ते १९३० ह्या काळांत सांस्कृतिक पुनरुत्थानाच्या दृष्टीनें करवीर मठाचे शंकरा-चार्य डॉ. कुर्तकोटि यांनीं फार मोठी कामगिरी बजावली आहे. त्या वेळच्या त्यांच्या सहकारी मंडळींत विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव हे एक प्रमुख होते.

शंकराचार्य डॉ. कुर्तकोटि हे कोल्हापूरच्या महाराजांच्या अरेरावीस कंटाळून व पीठ सोडून पायींच कोल्हापूरहून बाहेर पडले. त्यांच्या त्या तेजस्वी वृत्तीनें महाराष्ट्रांतील त्या काळच्या तरुण पिढीवर विशेष छाप पाडली. डॉ. कुर्तकोटि यांनींहि महाराष्ट्रांत सर्वत्र संचार करून व व्याख्यानें देऊन जुन्या शास्त्रपरंपरेचा व नव्या विचारांचा कोठपर्यंत व कसा मेळ घालतां येतो हें आपल्या उदाहरणानें दाखविलें. त्यांनीं १९२० सालीं नाशकास हिंदुधर्म परि-षद् बोलाविली व त्यानंतर १९२१ सालीं नागपूर, १९२२ सालीं अकोला येथें व १९२४ सालीं पुण्यास हिंदुधर्म परिषदा भरविल्या. डॉ कुर्तकोटींच्या या अनेकविध कार्यांत विद्यानिधि चित्रावशास्त्री यांचा प्रामुख्यानें भाग असे.

पुण्यास हिंदुधर्म परिषद् भरण्यापूर्वीच सन १९२३ सालीं हिंदुसभेची स्थापना झाली त्या वेळीं चित्रावशास्त्री यांची अध्यक्ष व प्रस्तुत लेखकाची कार्यवाह म्हणून नियुक्ति झाली तेंव्हापासून चित्रावशास्त्री यांच्याशीं हिंदुसभेच्या कामाच्या निमित्तानें नित्य विचारविनिमय सुरू झाला. अध्यक्ष व कार्यवाह या नात्यानें आमची ही जोडी १९२९ अखेरपर्यंत कायम टिकून होती.

सन १९२३ ते १९३० ह्रीं वर्षे हिंदुसभेच्या महाराष्ट्रातील इतिहासांतील विधायक कार्याच्या दृष्टीनें विशेप महत्त्वाचीं अशीं होतीं. परधर्मीयांच्या शुद्धिकरणाच्या कार्याला त्या वेळीं नव्यानेंच सुरुवात होत होती. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटि यांचा या सर्व कार्यास आशीर्वाद व प्रोत्साहन होतें. अस्पृश्यता-निवारण, शास्त्रसंशोधन, परधर्मीयांचा परत स्वजातींत स्वीकार, अहिंदूंचें हिंदुकरण, परधर्मीयांच्या आक्रमणाचा प्रतिकार, सामाजिक परिषदा भरवून निरनिराळ्या पोटजातींचें एकीकरण करण्याचा प्रयत्न इत्यादि विविध विषयांचा विचार त्या काळात प्रामुख्यानें होत होता, व जुन्या शास्त्रीय परपरेला न सोडता पण तिला नवें वळण कसें देतां येईल व चालू व्यवहारांतील अडचणींची उकल कशी करतां येईल याकडे त्या काळात हिंदुसभेचें विशेप लक्ष्य होतें. या दृष्टीनें विद्यानिधि चित्रावशास्त्री याची कामगिरी विशेप मोलाची व महत्त्वाची झाली आहे.

शुद्धिकरणाचा विधि योग्य रीतीनें व्हावा म्हणून त्यांनीं शुद्धिकरणाचा एक प्रयोगहि तयार केला. त्या वेळीं चित्रावशास्त्री यांनीं संध्या, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, पूजा इत्यादि नित्यकर्मविषयक पुस्तकें मंत्रांचें भाषांतर देऊन तयार केलीं. तीं प्रस्तुत लेखकानें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यामुळें शास्त्रीय व नित्यकर्मविषयक ग्रंथांचें कार्य चालूच झालें होतें. त्यातच शुद्धिकरणाचा नवा प्रयोग तयार करून तो प्रसिद्ध करण्यांत आल्यानें शुद्धिकरणाच्या कार्याला चांगली चालना मिळाली व त्या कार्याला पावित्र्य, गांभीर्य व शास्त्रमान्यताहि मिळाली. या शुद्धिकरण प्रयोगाच्या पुस्तकास शास्त्रीबोवांनीं लिहिलेली प्रस्तावना अतिशय महत्त्वाची आहे. त्यांत शुद्धिकरणाच्या कार्याचा पूर्वेतिहास दिला आहे. देवलस्मृति दिलेली आहे, व ऐतिहासिक परंपरा का व कशी लुप्त झाली याचें साधार व मार्मिक विवेचन केलें आहे. त्यानंतर हीं पुस्तकें लोकप्रिय होत गेल्यामुळें शास्त्रीबोवांनीं सर्व महत्त्वाच्या संस्कारांचींहि पुस्तकें तयार केलीं व मीं तीं प्रसिद्ध केलीं. तथापि पुढें त्यांचें व माझेंहि व्यवसायान्तर झाल्यानें अन्त्येष्टि प्रयोग प्रकाशित करण्याचें जें राहून गेलें तें कायमचेंच! अजूनहि त्याची आवश्यकता कायमच राहिली आहे. असो.

शुद्धिकरणाच्या प्रयोगाइतकेंच दुसरें महत्त्वाचें पुस्तक शास्त्रीबोवांनीं तयार केलें तें म्हणजे हिंदुधर्मतत्त्वसंग्रह हें होय. हें पुस्तक प्रश्नोत्तररूप असून शेवटीं हिंदुधर्मशास्त्राच्या ग्रंथांची माहिती दिली आहे.. तेंहि चांगलें लोकप्रिय झालें आहे.

शास्त्रीबोवांच्या व माझ्या सहकार्यातून आणखी एका मोठ्या प्रयत्नाची निष्पत्ति झाली व तो म्हणजे ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषांतर हा होय. या बाबतींत शास्त्रीबोवांना महाराष्ट्रानें धन्यवाद दिले पाहिजेत. ऋग्वेदसंहितेचें संपूर्ण मराठी भाषांतर त्या वेळपर्यंत झालेंच नव्हतें. अनेक पंडितांनीं प्रयत्न केले व ते कोणत्या ना कोणत्या कारणामुळें अपुरेच राहिले होते.

यानंतर शास्त्रीबोवांनीं चरित्रकोशाचें कार्य हातीं घेतलें व तें तडीस नेलें. तें कार्य स्वयंभूपणेंच मोठें आहे यांत शंका नाहीं. पण असें कार्य स्वतंत्रपणें हातीं घेऊन पार पाडण्याचा विश्वास त्यांना ऋग्वेदाच्या भाषांतरानें प्राप्त करून दिला यांत शंका नाहीं.

शुद्धिकरणाच्या चळवळीचा महाराष्ट्रांत शंकराचार्यांनीं उपक्रम करून पीठाचा पाठिंबा त्यास दिल्यानें त्यास सार्वत्रिक मान्यता प्राप्त झाली हें जितकें खरें, तितकेंच या चळवळीचा सार्वत्रिक प्रसार होण्यास विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचे परिश्रम हे प्रामुख्यानें कारणीभूत झाले आहेत. शुद्धिकरणाला ज्या काळांत शास्त्रीमंडळींचा विरोध होता, त्या काळांत त्याला शास्त्रमान्यता मिळवून देणें, पुराणमतवादी शास्त्री व वैदिक मंडळींचीहि सहानुभूति व मान्यता मिळविणें, त्या कामीं कांहीं वड्या मंडळींकडून होणारी अवहेलना सहन करणें व मिशनरी पद्धतीनें, चिकाटीनें व निष्ठेनें अंगीकृत कार्य तडीस नेण्यासाठीं सतत प्रयत्न करणें हे शास्त्रीबोवांचे विशेष गुण होत. अभ्यास, निष्ठा, व चिकाटी या गुणांमुळें तत्कालीन वातावरणांत कायापालट घडवून आणण्यास चित्रावशास्त्री यांची फार मोठी मदत झाली आहे.

त्या वेळीं शास्त्रीबोवा तरुण होते. त्यांच्या वाणींत तेज होतें. विचारांत आत्मविश्वास होता, अंगांत धमक होती, अंगांत गळ्यापर्यंत गुंड्यांचा कोट, डोळ्यांला चष्मा, डोक्याला कोशा, अंगावर उपरणें, हातांत काठी, धिम्म्या पावलांची चाल, वाणींत विनय व स्पष्टता, विचारांच्या देवाणघेवाणीची तयारी, कष्ट करण्यास तत्पर, व्यवहाराला सरळ व हिशेबी, हातीं घेतलेल्या कामावर निष्ठा ठेवून काम करणारे, त्यासाठीं तनमनधन ओतणारे असे त्या वेळचे शास्त्रीबोवा आजहि माझ्या डोळ्यांसमोर दिसतात. त्यांच्या माझ्या प्रत्यक्ष दैनंदिन सहकार्याचा काळ १९३० नंतर संपला पुढें मी विलायतेस आल्याच्या उद्योगास लागल्यामुळें हिंदुसभेचें कार्य दुसऱ्यांकडे सोंपविलें व

माझ्याप्रमाणेंच शास्त्रीबोवांहि इतर उद्योगाकडे वळल्यानें त्यांनींहि हिंदुसभेचें दैनंदिन कार्य सोडून दिलें. त्यामुळें आतां आमच्या भेटी फार थोड्या वेळां होतात. परंतु जेव्हां होतात तेव्हां त्या सर्व जुन्या स्मृतींची आठवण ताजी होते व त्यांच्याबद्दलचा आदरभावहि दुणावतो. एक विद्वान् पंडित, निरलस व स्वार्थत्यागी समाजकार्यकर्ता, जुनी परंपरा मानणारा पण तिला नवें वळण देणारा समाजसुधारक असें शास्त्रीबोवांचें वर्णन करतां येईल. शास्त्रीबोवांच्या साठाव्या वर्षगांठीस त्यांच्याबद्दलचा आदरभाव व्यक्त करण्याची संधि मिळाल्या-बद्दल मी स्वतःला धन्य समजतों व शास्त्रीबोवांना सुदीर्घ आयुरारोग्य चिंतितों.

# प्रसिद्धि-पराङ्मुख निष्ठावन्त कार्यकर्ता

(श्री. द. गो. फडके)

विद्यानिधि चित्राववशास्त्री यांचा व माझा गेल्या तीस वर्षांचा परिचय आहे. या दीर्घ काळांत विविध संस्थांतून बरोबर काम करण्याचा योग आला. सन १९२३ सालीं मी सरस्वती मंदिर संस्थेचा सभासद झालों, त्या वेळीं त्या संस्थेच्या रात्रीच्या हायस्कूलमध्यें ते काम करीत होते. त्याच सुमारास विद्याप्रसारिणी सभेनें भारत हायस्कूल काढलें, त्या संस्थेत ते होते. त्या संस्थेंत कांहीं दिवस मीहि शिकवावयास जात होतों. ज्ञानकोशांत काम करीत असतां कोशवाङ्मयाची त्यांना स्पष्ट कल्पना आली व चरित्रकोश हातीं घेण्याचें त्यांनीं ठरविलें. त्याचप्रमाणें ज्ञानकोशाच्या प्रास्ताविक खंडांत वैदिक वाङ्मयाचा भाग आला, त्यामुळें त्यांनीं ऋग्वेदाचें भाषांतर करण्याचें काम हातीं घेतलें. ज्ञानकोश मंडळ सोडल्यानंतर त्यांनीं हीं दोन्हींहि कामें पुरीं केलीं. चरित्रकोशाचें काम मोठ्या मेहनतीचें. इंग्रजी वाङ्मयाचाहि त्या कामीं उपयोग आवश्यक. कारण प्राचीन असो किंवा अर्वाचीन असो, परदेशस्थ व्यक्तींचीं चरित्रें इंग्रजींतूनच उपलब्ध व्हावयाचीं; परंतु असें जिकीरीचें कामहि त्यांनीं मोठ्या नेटानें एकहातीं पुरें केलें.

या प्रकारची वाङ्मयीन भरीव कामगिरी करीत असतां सामाजिक व थोडें राजकीय कामाकडेहि त्यांनीं लक्ष घातलें. हिंदु-महासभा व राष्ट्रीय स्वयंसेवक संघ या संस्थांमधून त्यांनीं शुद्धिसंघटनेचें कार्यहि मोठ्या निष्ठेनें व जोमानें केलें. सन १९४२ पासून सन १९५० पर्यंत आठ वर्षें ते वेदशास्त्रोत्तेजक सभेंत सहकारी चिटणीस होते या दीर्घकाळांत सभेचे अभ्यासक्रम, परीक्षापद्धति, परीक्षक-संभावना इत्यादि गोष्टी ठरविण्याचे कामीं त्यांच्या हार्दिक सहकार्याचा व उत्कृष्ट मार्गदर्शनाचा लाभ मला मिळाला.

विद्येच्या प्रेमानें त्यांनीं विद्यानिधि हें उपपद जसें सार्थ केलें आहे, त्याचप्रमाणें 'विद्या विनयेन शोभते' हें वचन यथार्थपणें त्यांचे बाबतींत लागू पडतें. कोशवाङ्मयाची इतकी भरीव कामगिरी करूनहि त्या कामाचा त्यांनीं गाजावाजा कधीं केला नाहीं. असा अबोल व धिम्मा दिसणारा गृहस्थ वैदिक वाङ्मयाचें महत्त्व अथवा त्याच्या संघटनेची आवश्यकता ओघवती वाणीनें प्रतिपादन करतांना ऐकलें म्हणजे त्यांचा अबोल दिसणाऱ्या व्यक्तीबद्दल प्रभावी वक्तृत्व पाहून ऐकणाराला आश्चर्याच वाटावयाचा. त्यांच्याबरोबर निरनिराळ्या

संस्थांमध्यें काम करतांना त्यांची वागण्याची पद्धति पाहून समर्थांच्या पुढील ओव्यांची सहज आठवण होतेः—

अपार असावें पाठांतर । सन्निधचि असावा विचार ।
सदासर्वदा तत्पर । परोपकारासी ॥
हिरवटासी दुरी धरावें । कचरटासीं न बोलावें ।
संबंध पडतां सोडून जावें । एकीकडे ॥

असा हा प्रज्ञावान् वाड्मयसेवक व सामाजिक कार्यकर्ता वयाला साठ वर्षे पूर्ण झाल्यानें प्रतिष्ठितप्रज्ञ झाला याबद्दल त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों. आतांपर्यंत झालें त्याचप्रमाणें पुढेंहि त्यांचे हातून वाड्मयीन व समाजसेवेचें कार्य होवो व त्याकरितां त्यांना दीर्घायुष्य व आरोग्य लाभो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

---

# महामहोपाध्याय-सिद्धेश्वरशास्त्रि-चित्रावाणां

## अभिनन्दन-पद्यानि

महनीयगुणौघाय
हातविद्यास्मयाय च ।
मङ्क्षुसिद्धेश्वराख्याय
होतृशाखामनीषिणे ॥ १ ॥

पारगाय च शास्त्रेषु
ध्यायते चामृतेश्वरम् ।
यच्छतान्मङ्गलाजानिः
सिद्धिं सर्वोद्यमेषु सा ॥ २ ॥

धेयाच्च महदैश्वर्यं
श्वःश्वो वृद्धिं च संततम् ।
रम्यं वाक्पाटवं सत्त्वं
शास्त्रनैपुण्यमेव च ॥ ३ ॥

स्त्रीस्मृतेर्निरतिं दद्यात्
चिराय मदनान्तकः ।
त्रायतां वर्षपूगांस्त्वं
वन्द्यो विश्वस्य योगिराट् ॥ ४ ॥

विरिञ्चिवल्लभा दद्यात्
जयं सर्वत्र संसदि ।
यतिर्भवतु वार्धक्ये
तेजस्वि लभतां वपुः ॥ ५ ॥

सौशील्यादिगुणग्रामान्
दृष्ट्वा चित्रावशास्त्रिणाम् ।
सुसंतुष्टः कृष्णमूर्तिः
पद्यान्येतान्यकीर्तयत् ॥ ६ ॥

के. व्ही. कृष्णमूर्ति शर्मा

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

# भारतीयराजनीत्यनुसारी अध्ययनक्रमः

( श्री. राजेश्वरशास्त्री द्रविड )

विद्याध्ययनक्रमो भारतीयराजनीत्यनुसारी कीदृश इति प्रश्ने प्रत्यक्ष-परोक्षानुमानलक्षणप्रमाणत्रयनिर्णीतायां फलसिद्धौ देशकालानुकूल्ये सति यथासाध्यमुपायानुष्ठानलक्षणा क्रिया नीतिर्नय इति नीतिलक्षणानुसारेण निर्णयः समुचितः । तत्र उत्पत्तिविनियोगविधिनिष्पन्नानां प्रयोगविधिना क्रमो निर्णेय इति सिद्धान्तात् अष्टादशविद्याः चतुष्षष्टिकलाश्च इति उत्पत्त्या निर्णीतानां विद्यानां तत्तद्विद्याफलेषु विनियोगः, तत्तद्विद्यास्थितेन अनुबन्धचतुष्टयेनैव सम्यक् ज्ञायते यद्यपि, तथापि सर्वासां विद्यानामुपसंहारेण प्रयोगविधानं कौटिलीयेऽर्थशास्त्रे श्रीमहामीमांसकश्रीमद्भास्कररायविरचिते नित्याषोडशिकार्णवसेतुबन्धव्याख्याने च एवमुपलभ्यते । तथाहि–"वृत्तचौलकर्मा लिपिं सङ्ख्यानं चोपयुञ्जीत, वृत्तोपनयनस्त्रयीमान्वीक्षिकीं च शिष्टेभ्यः, वार्तामध्यक्षेभ्य', दण्डनीतिं वक्तृप्रयोक्तृभ्यः ।" ( कौटिलीयेऽर्थशास्त्रे अ. ५ प्र. २ ) । एवं "ततश्च जगदाप्तपरमशिवप्रणीतत्वाविशेषेण सर्वासां विद्यानामधिकारिभेदेन प्रामाण्यमेव" इति स्पष्ट सूतसंहितार्थां । अधिकारश्च यथा नास्तिकानामेव अर्हद्वादिदर्शनेषु, त्रैवर्णिकादेरेव वैदिकमार्गेषु इति पुरुषभेदेनैव व्यवस्थितस्तथा एकस्यापि पुरुषस्य चित्तशुद्धितारतम्यादपि कश्चिद्व्यवस्थितः, वर्णभेदेनेव आश्रमभेदेनापि धर्मव्यवस्थादर्शनात् । एवं च यानि तत्तद्विद्याप्रशंसकानि वचनानि तानि तत्तदधिकारिणं प्रत्येव प्रवर्तकानि । यानि च तन्निन्दकानि तानि तत्तदनधिकारिणं प्रत्येव प्रतिनिवर्तकानि न पुनर्नहि निन्दान्यायेन विधेयस्तावकानि, अतिबाल्यदशायां बालक्रीडनके प्रवर्तयतामेव पित्रादीनां सर्वथाध्ययनाधिकारे ताडशक्रीडायां ताडनकर्तृत्वदर्शनात् ।

तदयं मथितोऽर्थः । जातमात्रस्य त्रैवर्णिकस्य क्रीडाधिकारे निवृत्ते अक्षराभ्यास', ततः छन्दोभाषाज्ञानार्थं काव्याध्ययने प्रवर्तकानि "अदोषं गुणवत्काव्यम् " इत्यादीनि अग्निपुराणवचनानि । व्युत्पन्नस्य "काव्यालापांश्च वर्जयेत्"

इति निषेधः। काव्याध्ययनजन्यप्रयोजनस्य जातत्वेन उत्तरभूमिकायामेव अवतारात् तां विहाय पूर्वभूमिकायामेवायुः क्षपयतः अनिष्टं भवतीति तदर्थः। ततो देहातिरिक्तत्वेनात्मनो ज्ञानार्थं न्यायशास्त्राध्ययने विधिः "शुष्केनात्मानमन्विच्छेत्" इत्यादिः। शुष्कं हेतुः अवयवसमुदायात्मकं न्यायः इति यावत्। देहादिभिन्नत्वेन आमुष्मिकयातायातक्षमतया आत्मनि ज्ञाते तु तादृशफलककर्मसु अधिकारात् "आन्वीक्षिकीं तर्कविद्यामनुरक्तो निरर्थिकाम्" इत्यादयो निषेधाः पूर्वभूमिकां निषेधन्ति। धर्ममेवाचरेत्प्राज्ञः इत्यादिविधयः उत्तरभूमिकायां प्रवर्तयन्ति। तदुपयोगित्वेन पूर्वमीमांसाया वेदे कर्मकाण्डस्य च अध्ययनं, तेन धर्मार्थकामेषु साधितेषु चतुर्थपुरुषार्थलिप्सया पूर्वभूमिकात्यागाय नास्ति अकृतकृतेन इति कर्मनिन्दा। ( सेतुबंधव्याख्या )

"वेदाः प्रमाणं स्मृतयः प्रमाणं धर्मार्थयुक्तं वचनं प्रमाणम्" इति स्मृत्यनुसारेण "धर्मार्थयुक्तं धर्मतत्त्वविचारकं सन्निबन्धवाक्यम्" इति रघुनंदनव्याख्यानुसारेण च निश्चितप्रामाण्यकस्योक्तनिरूपणस्यानुसारेणावगतस्याचारस्याविदितशिष्टाचारतया परिगणितुमर्हत्वेनादौ क्रीडाधिकारः, पश्चात् लिपिसंख्याज्ञानयोः, तदनंतरं छन्दोभाषाज्ञानाय काव्याध्ययने, तदनु देहातिरिक्तात्मनिश्चयाय न्यायशास्त्रे, तस्मिन् दृढे सत्येव तत्पश्चात् धर्मशास्त्ररूपेषु षडङ्गवेदाध्ययनादिष्वधिकारसिद्धिरितीदृशेन क्रमेण अध्ययने क्रियमाणे न कोऽपि दृष्टादृष्टविरोधः।

एतदतिक्रमेण क्रियमाणं त्वध्ययनं अनधिकारिणा कृतमकृतं भवतीति न्यायात्, "यदधीतमविज्ञातं निगदेनैव शब्द्यते। अनग्ना इव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित्" इति वचनानुसारेण दृष्टादृष्टसमस्तफलशून्यमेव भवति। इति प्रोक्तक्रम एव आदरणीयो देशोन्नतिकामैरिति विद्वत्परिषदो मतम्।

---

# A NOTE ON INDIC *diśati* 'SAYS'

*by*

S M KATRE

1. In his interesting note on Indic *diśati* 'says' contributed to the *Woolner Commemoration Volume* (Lahore, 1940, p. 88), Professor Franklin EDGERTON has drawn our attention to the fact that the Sanskrit root *diś-* means regularly 'to show, to point out', a meaning which is shared by cognates in Greek and most related Indo European Languages In Italic, however, it has developed the meaning 'say' (Latin *dicere* etc ) In the Indo-Aryan field Professor EDGERTON cites an Apabhraṁśa occurrence in Bhavisatta Kahā 232 7 and two occurrences in Buddhist Hybrid Sanskrit where the sense is conveyed by English 'say, declare' Professor EDGERTON mentions that so far as he is aware no one has previously pointed out that this same meaning occurs with the root in Indic 'not to be sure, in Samskrit proper, nor apparently in Pāli, but in Apabhraṃśa, and in Buddhist (hybrid) Samskrit' (*loc cit* )

2 It is the object of this note to point out that this meaning has been recorded for the Sanskrit root *diś-* by no less an authority than Patañjali in his Mahābhāṣya The first occurrence is indicated under the vārttika *Vṛttisamavayārtha Upadeśah* (ed Kielhorn, p 13⁷) Atha ka Upadeśah? Uccāranam Kuta etat? *Diśir uccāranakriyah* Uccārya hi varnān āha upadiṣtā ime varnā iti

The second occurrence of this significance is found in the gloss on Pānini 6 3 109 (Kiel ed vol III, p 174⁹) Atha kim idam upadiṣṭāniti? Uccāritāni Kuta etat? *Diśir uccaraṇakriyah* Uccārya hi varnān āha upadistā ime varnā iti

3 It will be seen that in both passages of the Mahābhāṣya the verbal base *diś-* is associated with the definite sense of 'utter, speak, say, declare', even without the preposition upa This, therefore appears to be one of the earliest Indic usages in Sanskrit where the base *diś-* has developed the sense of 'utter, say, declare' according to the unimpeachable authority of the Bhāṣyakāra

# THE LEGEND OF BHUJYU

*by*

Shri N G CHAPEKAR

There are in the Rgveda a large number of legends which are difficult to understand and so appear mystic. One such is the legend of Bhujyu This legend was unknown to the seers of the Atharvaveda

Briefly, the story is as follows —"One Bhujyu was the son of Tugra (6 62 6) He was, as such, called Tugrya (8 3 23, 74 14) and, more often, Taugrya (8 5 22, 1 118 6, 180 5, 182. 5, 6, 7, 10 39 4) He was thrown into the sea but was eventually rescued by the Aśvins " From the context it is clear that both Tugrya and Taugrya denote the same person, namely Bhujyu Though there are many references to this episode in the Rgveda, there is only one specific reference to the person who threw Bhujyu into the sea And that is at 1 116 3 which says that Tugra, Bhujyu's father, abandoned him on the high seas There is another reference which is rather vague (7 68 7) It says that evil-minded relatives or friends (*sakhayah*) of Bhujyu threw him into the sea.

At another place (1 116 4) we are told that the ship of the Aśvins took three days and three nights to reach land This gives us an idea as to the distance from the shore of the spot where Bhujyu was thrown into the sea The rk further tells us that the Aśvins landed Bhujyu on the beach Another rk (8 3 23) says that the Aśvins carried Bhujyu to his house (*astam*) The apparent discrepancy may be explained by supposing that Tugra's house was on the sea shore At yet another place (1 119 4) we are informed that Bhujyu was restored to his parents or guardians (*pitrbhyah*)

There is some ambiguity regarding the means employed to bring Bhujyu to the shore Three ships were employed for the purpose (1 116 3, 4) These had a hundred oars and six horses (1 116 4, 5) Very likely the horses were ornamental wooden figures fixed to the vessels (*svayuktibhih*, 1 119 4) It seems that these ships had sails spread to the

winds, for they are described as so many winged birds (*patatribhih, vibhih, patangaih*) The ships are compared to chariots (*rathaih*, 1 116 4) They had wooden horses and the poet fancies them as real ones (*aśvaih*, 1 117 14, 8 3 23) The adjectives *aśramaih* and *avyathibhih*, meaning 'without labour' (1 112 6, 7 69 7), seem to be quite appropriate here, as the ships used sails

The place at which the Aśvins picked up Bhujyu has been described in the Rgveda in various ways It was in the midst of the ocean (*samudrasya madhye, arnasah madhye, udameghe*). There was no land within sight (*anāsthāne*, 1 116 5) There was nothing to hold on to (*agrabhane*) The place was far away from Bhujyu's house (*parāvati*, 1 119 8)

When cast away, Bhujyu went down much below the surface of the waters (*apsuantah*) where it was all dark (*tamasi*, 1 182 6)

It seems that a ship was nearby (*kah svid vrkṣah nisthitah*) and the son of Tugra clung to it (1 182 7) Here *vrksa* stands for the ship which was made of wood

Trying to trace the causes of the calamity, the expressions *tyajasā nibādhitam, samudramadhye jahuh, samudre jahitah* clearly indicate that it was not a case of wreckage. I do not think it to be an act of sheer wickedness on the part of the father or a punishment for some heinous offence of Bhujyu That he was given up just as a dying man abandons (all hope of) his wealth (1 116 3), speaks against any such inference Probably, Bhujyu was suffering from some malignant disease The term *jivrih* (1 180 5) points in that direction

As regards the number of ships that brought Bhujyu to the shore 1 116 3 puts them at three, while 1 182 6 says, they were *four* *This inconsistency seems inexplicable*

The Vedic people knew well the story of Bhujyu's rescue Thus when Asura speaks to Śyena (hawk) he says, "Oh Śyena, just like Bhujyu, Soma was carried down by you from heaven" (4 27 4) At another place (8 74 14) a Ṛṣi says,

"I was carried by four horses to an appointed place in the manner of Bhujyu who was wafted by the winged ships over the sea" RV 8 3 23, which is rather unintelligible, says "as the *flying ships* (*vayah*) *carried home the son of Tugra*, so ten horses (*vahnayah*) yoked together carry him"

It seems that some Rsis had no clear idea as to what the Aśvins did for Bhujyu They, naturally, exhort the Aśvins to come to them with the equipment with which the Aśvins protected Bhujyu (1 112 6, 20) Some other rks praise the Aśvins for saving Bhujyu who was trembling in the waters (*samudre tnkhitam*, 10 143 5), and for transporting him to his place (1 116 4, 5, etc )

It is difficult to locate the place of this incident. I believe that it was not a contemporary event but had occurred in the distant past

Undoubtedly Bhujyu was the name of a living person. Sāyaṇācārya, while commenting on the well known hymn recording the conversation between Purūravas and Urvaśī (10 95 8), says that the term signifies *bhogasadhanabhūtā strīmrgi*, *sa yatha vyādhad bhita palayate*, that is, a female deer who is an object of an enjoyment and who runs away being afraid of the hunter The term according to some others, denotes a serpent (4 27 4)

It was not Bhujyu's father only who went by the name Tugra There were others bearing the same name (10 49 4). Indra subdued one Tugra for the benefit of Kutsa Another Tugra, also an enemy of Indra, was an Asura (6 20 8)

# भारतांतील भौतिक विद्यांच्या इतिहासाचीं साधनें

( श्री. प. कृ. गोडे )

आध्यात्मिक संस्कृति ही भारताला परंपरेनें लाभलेली अत्यंत वैभवशाली ठेव असून प्राचीन वैदिक, बौद्ध व जैन वाङ्मयांत तिचें प्रतिबिंब स्पष्टपणें दिसतें. भारताच्या संपूर्ण ऐतिहासिक कालखंडावर तिचा प्रभाव उमटलेला आहे. त्याचप्रमाणें भारतांतील प्राचीन राज्यांचे आणि साम्राज्यांचे जे कांहीं अवशेष आज उरलेले आहेत ते भारताच्या आधिभौतिक उन्नतीची साक्ष पटवितात. आध्यात्मिक संस्कृतीच्या जोडीनेंच भारताच्या आधिभौतिक संस्कृतीचीहि वाढ झाली. परंतु उत्कर्षाच्या परमोच्च बिंदूवर असतांना देखील जीवनाच्या आध्यात्मिक मूल्यांना ती डावलू शकली नाहीं. "अध्यात्म तत्त्वज्ञान मातींतून निर्माण होत नाहीं" असें एका आंग्ल कवीचें वचन आहे. धुळींतून जन्मास आलेलीं साम्राज्यें धुळीस मिळत असतांना मनुष्यनिर्मित दुःखानें परिपूर्ण व युद्धपीडित अशा जगांतील अखिल मानवजातीला आध्यात्मिक तत्त्वज्ञानच आजाहि संजीवन देत आहे.

भारतांतील भौतिकशास्त्रें व कला यांचा इतिहास हा मानवी भौतिक संस्कृतीच्या इतिहासाचा एक भाग आहे. मानवी संस्कृतीच्या निर्मितींत भारतानें वाटा उचलला आहे. भारतीयांची नैसर्गिक प्रवृत्तीच बाह्य परिस्थितीशीं जुळतें घेण्याची असल्यानें ज्या वेगवेगळ्या संस्कृतींशीं त्यांचा निकट संबंध आला त्यांतलीं भिन्नभिन्न वैशिष्ट्यें त्यांनीं आपल्यांत सामावून घेतलीं. ऐतिहासिक दृष्ट्या सूक्ष्म चिकित्सा केल्यास ' आर्य संस्कृति ' म्हणून जिला संबोधण्यांत येते तिच्यांत समाविष्ट झालेले परकीय अंश निश्चित ऐतिहासिक प्रमाणांच्या आधारें शोधून काढणें शक्य आहे.

पौरस्त्य देशांत सुधारणेची सुरवात झाली. पौरस्त्य संस्कृतीनें बजावलेल्या कामगिरीचा भक्कम पुरावा उपलब्ध वाङ्मयाच्या रूपानें सुदैवानें आपल्या जवळ जतन केलेला आहे. वास्तविक तेथ्या चार हजार वर्षांतील एकूण वाङ्मयनिर्मितीमधला हा केवळ अल्पसा भाग आहे. अर्थशास्त्र, कामसूत्रें, नाट्यशास्त्र, चरकसंहिता वगैरे जुन्या ग्रंथांमध्यें प्राचीन आर्यांच्या भरभराटीचे ठोस आढळतात. हें लिखाण नैसर्गिक वा राजकीय कारणांमुळें बहुधा नष्ट

झालें असावें. या लिखाणाच्या नाशाबद्दल हळहळ वाटणें स्वाभाविक असलें तरी आध्यात्मिक व भौतिक अशा समग्र भारतीय संस्कृतीची ऐतिहासिकदृष्टया जुळणी करण्याकडे आपणांला दुर्लक्ष करून चालणार नाहीं. त्यासाठीं उपलब्ध असणाऱ्या हस्तलिखित किंवा प्रकाशित अशा ग्रंथांच्या बहुमोल साधनांचा *अमलत्र केला पाहिजे. सांस्कृतिक इतिहासाच्या या साधनांचें शास्त्रीय संशोधन* करण्यासाठीं सुमारें इ.स.च्या दहाव्या शतकापूर्वी लिहिल्या गेलेल्या सर्व महत्त्वाच्या ग्रंथांची संपूर्ण शब्दसूची तयार करणें आवश्यक आहे. सध्यां आपल्याला असे महत्त्वाचे उल्लेख मुद्रित ग्रंथांतून बारकाईनें हुडकून काढण्यांत पुष्कळसा वेळ खर्च करावा लागेल. आक्सफोर्ड-इग्लीश डिक्शनरीप्रमाणें ऐतिहासिक तत्त्वांवर आधारलेले भाषेंतील प्रत्येक शब्दाचे निरनिराळे प्रयोग कालक्रमानुसार दर्शविणारे हिंदी भाषाचे विस्तृत कोश आपल्याकडे झालेल नाहींत. संस्कृत भाषेंत सुदैवानें पुष्कळ कोश असले तरी त्यांपैकीं फारच थोड्यांचें प्रकाशन *झालेलें आहे. या कोशांतहि उपलब्ध ग्रंथांत आढळणाऱ्या विशाल शब्द-*संपत्तीपैकीं फारच अल्प शब्दांचा संग्रह केलेला दिसतो. भारतीय संस्कृतीशीं निगडित अशा कल्पना किंवा वस्तू यांच्या इतिहासाची सगतवार मांडणी करावयाची म्हटल्यास साहजिकच त्या कल्पनांचा व वस्तूंचा ज्यांनीं बोध होतो ते शब्द आपल्याला ज्ञात अशा वाङ्मयांत हुडकावे लागतील. या दृष्टीनें प्रयत्न करीत असतांना वर निर्देश केल्याप्रमाणें अडचणी उपस्थित होतात, आणि उपलब्ध भारतीय वाङ्मयाच्या संदर्भ ग्रंथांची सूची नसल्यामुळें त्या अधिकच बिकट होतात. अशा सूचींची आवश्यकता आपल्या देशांतील सर्व संशोधनसंस्थांना भासत असली तरी या कार्यासाठीं कोणींहि संघटितरीत्या प्रयत्न केलेला दिसत नाहीं.

कालक्रम हा ऐतिहासिक पुराव्याचा आधारस्तंभ आहे, आणि विषय व वस्तु हे त्या ऐतिहासिक पुराव्याचे दोन घटक आहेत. विषय म्हणजे वाङ्मयीन उल्लेखावरून अनुमानिलें जाणारें चित्र, आणि वस्तु म्हणजे भूपृष्ठावर किंवा भू-गर्भांत आढळणाऱ्या कालक्रमदर्शक पदार्थांवरून व्यक्त होणारें दृश्य रूप अशा प्रकारें विषय आणि वस्तु यांची म्हणजेच वाङ्मयीन उल्लेख व शिल्पादि साधन-द्वारा उपलब्ध झालेले पदार्थ यांची संगति जुळविली असतां आपल्याला मानवी *संस्कृतीच्या कोणत्याहि प्रभागाचा इतिहास निश्चितपणें उपलब्ध होऊ शकतो.* अशी संगति जुळविणें सोपें व्हावें यासाठीं ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाच्या अशा सर्व ज्ञात वस्तूंची विस्तृत सूची तयार करणें अगत्याचें आहे. या सूचीमध्यें प्रत्येक वस्तूचा निश्चित किंवा संभाव्य कालनिर्देश केलेला असावा. वाङ्मयीन

पुराण्याच्या दृष्टीनें शब्दसूचीचें जें महत्त्व तेंच महत्त्व चित्रद्वारा किंवा शिल्पद्वारा झालेल्या रूपांतराच्या बाबतींत वस्तुसूचीचें मानावें लागतें

प्राचीन भारतांतील भौतिक विद्याच्या विस्तृत इतिहासाची सगतवार मांडणी करणें हें कार्य अत्यन्त प्रयासाचें असून तें यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठीं भौतिक शास्त्रज्ञ आणि भारतीय संस्कृतीचे अभ्यासक यांचें निकट सहकार्य होणें आवश्यक आहे. अलीकडे भारतीय शास्त्रज्ञांना त्यांच्या क्षेत्रांत ऐतिहासिक दृष्टीनें संशोधन करण्याची आवड उत्पन्न झालेली आहे ही समाधानाची गोष्ट आहे. पण यांतील प्रमुख अडचण अशी आहे कीं, बहुसंख्य शास्त्रज्ञांना भारतीय वाङ्मयाचें सखोल ज्ञान नाहीं. त्यामुळें ऋग्वेदकाळापासून पुढील भारतीय इतिहासाच्या कालखंडात उत्कर्षास पोंचलेल्या भौतिक विद्याची यथार्थ कल्पना त्यांना होऊं शकत नाहीं. उलटपक्षीं प्राचीन विद्याचे अभ्यासकहि भौतिक शास्त्रविषयक प्रश्न आपल्या क्षेत्राबाहेरच मानून त्यासंबंधीं पुरेशी आस्था दर्शवीत नाहींत. शास्त्रज्ञानीं जुन्या संस्कृत हस्तलिखितांकडे लक्ष पुरविल्याचे क्वचित् दाखले मिळतात. अशा प्रकारें अधिकारी अभ्यासकाकडून ऐतिहासिक दृष्टिकोनांतून निरनिराळ्या विषयांवर निबंध लिहिले जातील तेंव्हांच आपल्या प्राचीन पूर्वजांनीं भौतिक विद्याच्या क्षेत्रात बजावलेल्या कार्यांचा योग्य रीतीनें आढावा घेणें शक्य होईल

प्रस्तुत विषयाकडे माझें लक्ष वेधण्याचें श्रेय आल्बर्ट नॉयबुर्गेर या जर्मन पंडिताच्या The Technical Arts and Sciences of the Ancients या बहुमोल ग्रंथाला दिलें पाहिजे हा ग्रंथ पाहतांच चटकन् लक्ष्यात येणारी गोष्ट अशी कीं प्राचीन भारतांत भरभराटींत असलेल्या भौतिक विद्यांसंबंधीं त्यांत मुळींच उल्लेख नाहीं. या अनुल्लेखाबद्दलचा दोष ग्रंथकाराकडे देण्यापेक्षा आपणच आपल्याकडे घेणें युक्त होईल. तथापि भारतीय साधनांच्या साहाय्यानें या विषयाचा व्यासंग करणाऱ्या आपल्याकडील अभ्यासकाला मार्गदर्शनासाठीं हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे या पुस्तकांत ग्रंथकारानें ज्या विषयासंबंधीं वाङ्मयीन व पुराणवस्तुविषयक उपलब्ध झालेला पुरावा ग्रथित केलेला आहे ते विषय असे — खाणीकाम, धातू व लाकडावरील नक्षीकाम, चामडें कमावणें, कृषि, तेलाचें उत्पादन व उपयोग, कांच, रंग, यंत्र आणि यंत्रशास्त्र, नगररचना, सडकरी, स्थापत्य, पाणीपुरवठा, रस्ते, पूल व गटबंधारे, जहाजें, नौकानयन आणि बंदरें इत्यादि. वाङ्मयीन पुराव्याचा उलगडा करणारीं अशीं ६७६ चित्रें या पुस्तकांत घातलेलीं आहेत. या ग्रंथाच्या वाचनानें प्राचीन भारतीय कला व शास्त्रें यांच्या इतिहासाचें समालोचन करण्याची प्रवृत्ति होईल. अशा

समालोचनाय उपयुक्त असे कांहीं निबंध प्राच्यविद्याविषयक नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. सर्वभक्षक काळाच्या तडाख्यातून सुदैवानें वाचलेल्या कौटिलीय अर्थशास्त्र व शिल्पशास्त्रावरील ग्रंथांतील विषयांची छाननी केल्यास नॉयरगेररनें दर्शविलेल्या विषयविभागानुसार कित्येक वाङ्मयीन पुरावे उजेडांत आणता येतील. शब्दशास्त्रांत निष्णात अशा बुद्धिमान् साहित्यकांनाहि, ते वस्तुज्ञानाला पारखे असल्यामुळें, हें कार्य सहजासहजीं अभ्यासारखें नाहीं. एवढेंच नव्हे, तर स्थलकालदृष्ट्या सर्व शब्दांचा विचार झालेला नसल्यामुळें त्यांचें शब्दज्ञानहि विश्वसनीय होऊ शकत नाहीं.

मानवाचा भौतिक सृष्टीशीं अव्याहतपणें चालू असलेला झगडा अशी भौतिक शास्त्रांची व्याख्या करून नॉयबुर्गरनें पुढील निष्कर्ष काढले आहेत —

( १ ) मानववंशाच्या प्रारंभापासून सर्व कालखंडात भौतिकशास्त्र अस्तित्वात आहे. अतिप्राचीनकालांत तें उदयास आलें म्हणणें ही समजूत चुकीची आहे.

( २ ) भौतिकशास्त्र हा शब्दप्रयोग मनुष्याच्या मनांत तयार झालेला असून मानवाच्या अस्तित्वाबरोबरच अनादिकालात तो उदयास आला.

( ३ ) भौतिकशास्त्राचें एकादें विशिष्ट युग मानणें हें चुकीचें होय. भौतिकशास्त्राच्या उत्कर्षापकर्षाचे काळ अगदीं स्वतंत्र असतात.

( ४ ) प्राचीन भौतिकशास्त्राच्या पद्धतींत आधुनिक पद्धतीच्या तुलनेनें पहाता अत्यंत साधेपणा असे. परंतु त्या पद्धतीनें केलेलें कार्य इतकें विलक्षण आहे कीं त्यापुढें अद्यापि मजल गेलेली नाहीं.

( ५ ) वाष्प, विद्युत् इ. सारखीं नवीन शक्तिसाधनें उपयोगात येत असल्यानें आधुनिक भौतिकशास्त्राची प्रगति अधिक व्यापक व विस्तृत असली तरी प्राचीनाची दृष्टि अधिक सूक्ष्म व मूलग्राही होती.

( ६ ) मध्ययुगाचा काळ व पुढील काहीं शतकें यामध्यें व्यवसायावर आधारलेल्या समाजव्यवस्थेंतून आलेल्या बंधनामुळें भौतिकशास्त्राची प्रगति खुटली.

( ७ ) प्राचीनकाळीं व्यावसायिक वर्गाला समाजामध्यें महत्त्वाचें स्थान असे.

( ८ ) प्राचीन शासनसंस्थेवर तसेंच व्यक्तिगत जीवनावर भौतिक विद्याचा मोठा प्रभाव पडलेला होता.

( ९ ) प्राचीन काळाच्या अंतरंगात प्रवेश करण्यासाठीं भौतिक विद्यांचें ज्ञान हें अपरिहार्य साधन आहे.

प्राचीन भारतातील भौतिक विद्यांच्या इतिहासाचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास नॉयबुर्गेरच्या काहीं सिद्धान्तांना पुष्टि मिळण्यासारखी आहे.

फ्रँकलिन् यानें ' हत्याराचा उपयोग करणारा प्राणी ' या शब्दांत मनुष्याची व्याख्या केली आहे; कारण भौतिक सृष्टीशीं अव्याहत चालू असलेल्या द्वंद्वांत यशस्वी व्हावें म्हणून तो हीं साधनें उपयोगात आणतो. या हत्यारांच्या इतिहासावरून आणि प्राचीनकाळीं निरनिराळ्या देशांनीं ज्या कल्पकतेनें त्याचा वापर केला त्यावरून त्या काळीं उदयास आलेल्या विविध सुधारणाची पुरेशी कल्पना येते. हत्याराचा उपयोग करण्याचे बाबतींत प्राविण्य संपादन केल्यामुळें निरनिराळे उद्योगधंदे व कला उदयास येऊन त्यातील तज्ज्ञांना समाजातील मानाचें स्थान प्राप्त झालें. तथापि कामातील तारतम्यामुळें काहीं धंदे उच्च व इतर नीच असे भेद पडले. त्या त्या धंद्यातील कसबी लोकांच्या 'श्रेणी'च्या स्वरूपांत संघटना होऊं लागल्या. ऋग्वेदापासून तो सुमारें इ. स. ५०० पर्यंतच्या प्राचीन ग्रंथाच्या अवलोकनावरून तत्कालीन भारतात धंद्यावरून पडलेल्या पुढील जाती दृष्टोत्पत्तीस येतात:—सुतार, लोहार, सोनार, पाथरवट, रंगारी, विणकरी, रथकार, कुंभार, जव्हेरी, कोळी, खाटिक इत्यादि. कात्यायनाचे मतें शिष्य, अभिज्ञ, कुशल, ' नूतनमार्गप्रवर्तक ' असे आचार्य या सर्वांची मिळून श्रेणी होत असे. प्राचीन भारतात भौतिक शास्त्रांची भरभराट झाल्याचा पुरावा जुन्या ग्रंथातून मिळत असला तरी निरनिराळ्या धंद्यासाठीं लागणाऱ्या हत्याराची आणि त्यांचा उपयोग करण्याच्या पद्धतीची माहिती उपलब्ध होत नाहीं. ही माहिती या विषयाचें विवेचन करणाऱ्या स्वतंत्र ग्रंथामध्येंच मिळू शकेल. असे ग्रंथ कधींकाळीं अस्तित्वांत असले तरी आज ते उपलब्ध नाहींत. या धंद्यासंबंधीं काहीं माहिती पुरविणाऱ्या शिल्पशास्त्रावरील उत्तरकालीन ग्रंथांनीं ही उणीव अंशत' भरून काढली आहे. प्राचीनांना अवगत असलेल्या या कलांच्या प्रत्येक शाखेच्या इतिहासाचें संशोधन करण्यास अद्यापि भरपूर वाव आहे. प्राचीन भारतीय भौतिक शास्त्रविषयक बरीच सामग्री प्राचीन वाङ्मयाचे द्वारा उपलब्ध होण्यासारखी असून या शास्त्रांच्या इतिहासांतील तुटलेले दुवे जुळविण्याच्या कामीं तिचा उपयोग करतां येईल.

उपलब्ध संस्कृत व प्राकृत कोशांत मिळणाऱ्या व मुद्रित वा अमुद्रित शास्त्र तंत्रविषयक स्वतंत्र ग्रंथांत उपयोगांत आणलेल्या एतद्विषयक शब्दांचा एक तात्पुरता कोश केल्यानें प्राचीन भारतीय कला व शास्त्रांची पुन' मांडणी करण्याचें कार्य बरेंच सुकर होणार आहे. अशा कोशासाठीं लागणारें साहित्य तद्विषयक मुद्रित ग्रंथांच्या शेवटीं संपादकांनीं जोडलेल्या शब्दसूचींच्या रूपानें

मिळण्याजोगें आहे. एखाद्या शब्दाचा अर्थ देण्यास नेहमींचे संस्कृत कोश ज्या-वेळीं असमर्थ ठरतात त्या वेळीं अशा सूचींचा उपयोग होतो असा माझा स्वतःचा अनुभव आहे.

## ललित-कला

ललितकलांमध्यें प्रायः संगीत, काव्य, चित्रकला व शिल्पकला यांचा समावेश होतो. अनुकूल भावनिर्मिति हें या सर्व कलांचें उद्दिष्ट आहे. पहिल्या दोहोंचा एक व दुसऱ्या दोहोंचा एक असे त्यांचे दोन भाग पडतात. संगीत व काव्य यांनीं होणारा आनंद हा डोळ्यांनीं दिसणारा नाहीं. उलटपक्षीं चित्रकला व शिल्प यांचा आनंद चक्षुरिंद्रियानें अनुभवितां येतो. यांपैकीं संगीत, चित्रकला व शिल्प या तिहींविषयींच मी येथें आपले विचार मांडणार आहें. अर्थात प्रस्तुत विषयांत माझ्या अभ्यासाचें स्वरूप केवळ ऐतिहासिक आहे हें नमूद करणें जरूरीचें आहे.

संगीत—

भारतीय संगीताच्या तांत्रिक बाजूविषयीं तसेंच संगीतविषयक वाङ्-मयाच्या इतिहासाविषयीं विस्तृत माहिती देणारा असा एकादा ग्रंथ अद्यापि लिहिला गेलेला नाहीं. मेंच भाषेंतील संगीताच्या ज्ञानकोशांत अशा इतिहासाची रूपरेषा दिलेली आढळते. तथापि या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर उपलब्ध नाहीं. उपरिनिर्दिष्ट इतिहासविषयक ग्रंथात पुढील गोष्टी असाव्यात—

( १ ) भारतीय संगीतावरील उपलब्ध अशा सर्व जुन्या हस्तलिखित ग्रंथांची सूची.

( २ ) शास्त्रीय संज्ञांचें स्पष्टीकरण देणारी सूची.

( ३ ) भारतीय संगीतविषयक नवीन झालेल्या वाङ्मयातील संदर्भ-ग्रंथाची सूची.

( ४ ) भारतीय वाद्यांचा सचित्र व विस्तृत इतिहास.

( ५ ) आजवर होऊन गेलेल्या नामवंत भारतीय गायकांचीं चरित्रें.

आपल्याकडील प्राच्यविद्याविषयक नियतकालिकांत भारतीय संगीता-वरील लेख अधूनमधून प्रसिद्ध होत असलें तरी ललितकलाच्या अभ्यासास सर्वस्वीं वाहिलेल्या अशा एकाद्या नियतकालिकाची आवश्यकता आहे. मद्रा-सच्या म्युझिक ॲकॅडमीनें परिश्रमपूर्वक चालविलेलें नियतकालिक या दृष्टीनें प्रशंसाई आहे. कलेचा दर्जा वाढण्याचे दृष्टीनें संगीताचा शास्त्रीय रीतीनें अभ्यास होणें अगत्याचें आहे. भारतीय संगीताला उज्ज्वल भूतकाळ लाभलेला

असून त्याचा वर्तमानकालहि भरभराटीचा आहे. तेव्हा स्वतंत्र भारतात भविष्यकाळीं संगीताचा उत्कर्षच होईल.

चित्रकला—

भारतीय संगीताप्रमाणेंच भारतीय चित्रकलेचाहि इतिहास लिहिला जाणें अवश्य आहे. त्याच्या एका भागात चित्रकलेवरील सर्व संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें द्यावींत. भारतीय व विदेशीय विद्वानांनीं लिहिलेल्या कलाविषयक लेखांची माहिती पुरविणारी संदर्भसूची तयार करण्यात यावी. चित्रकलेच्या भिन्नभिन्न शाखांचा ऐतिहासिक दृष्ट्या सूक्ष्म अभ्यास होत असल्याचें नियतकालिकात प्रसिद्ध होणाऱ्या लेखांवरून दिसतें. परंतु सूचीच्या साहाय्याच्या अभावीं त्यांचा उपयोग होत नाहीं. निरनिराळ्या चित्रसंग्रहांचे व कलाकुसरीच्या वस्तूंचे वर्णनात्मक सूचीग्रंथ तयार व्हावयास पाहिजेत. यातील वस्तूंच्या संदर्भसूचीची उणीव फार जाणवते. पौरस्त्य चित्रकलेचे नमुने व तत्सम वस्तू यांची माहिती देणारे कॅटलॉग लंडनमध्यें अशा वस्तूंचा संग्रह करणाऱ्यांकडे मिळू शकतात, व त्याचा पौरस्त्य कलेच्या अभ्यासकांना फार उपयोग होतो. हिंदुस्थानांत देखील कलात्मक व ऐतिहासिक दृष्टीनें मूल्यवान् अशा चित्रांचे व इतर वस्तूंचे संग्रह अस्तित्वांत आहेत, परंतु त्यांची नुसती यादी देखील मिळू शकत नाहीं. मग वर्णनात्मक सूची दूरच राहिली.

सामान्य जनतेंत कलेची अभिरुची उत्पन्न करण्यासाठीं कांहीं उत्साही व्यक्तींनीं भारतीय कलेला वाहिलेलीं चांगलीं नियतकालिकें सुरू केलीं आहेत हें भारतीय संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाचें चिन्ह होय. लोकशाहीच्या युगांत जनते मध्यें कलेविषयीं आवड निर्माण करण्याच्या दृष्टीनें अधूनमधून भरणाऱ्या कलाविषयक प्रदर्शनांना प्रोत्साहन देणें आपल्या राष्ट्रीय शासनसंस्थेचें कर्तव्य आहे.

आपल्या देशांतील विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत ललितकलांचा समावेश होणें आवश्यक आहे. कलकत्ता व बडोदा येथील विद्यापीठांत या विषयासाठीं स्वतंत्र शाखा उघडलेली दिसते. विद्यापीठें व महाविद्यालयें यामधून कला व शास्त्रें यांची चालणारी स्पर्धा हितावह असली तरी ललितकलांच्या बाबतींत केला जाणारा सापत्नभाव आत्मघातकीपणाचा ठरेल. वास्तविक उत्कृष्ट चित्र रंगविणारा चित्रकार, किंवा हृदय हेलावून सोडणारें संगीत गाणारा गायक हा पदवीधराहून कमी प्रतीचा कां मानला जावा ? जीवनाच्या झगड्यांत टिकाव लागण्यासाठीं कलावन्ताला आपल्या कलेंत अधिकाधिक कौशल्य मिळवावें लागतें. उलट यत्किंचित् ज्ञानाचे जोरावर पदवीधराचे जीवनास सहज स्थैर्य लाभू शकतें. ही विषमता दूर करण्याकरितां ललितकलांच्या पुरस्कर्त्यांनीं शासन संस्थेवर दडपण आणून या विषयाचा विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमांत समावेश

करवून घेतला पाहिजे. हें शक्य नसल्यास सरकारनें स्वतःच्या खर्चानें निरनिराळ्या प्रांतांत या कलांच्या अभ्यासासाठीं स्वतंत्र संस्था चालवाव्यात.

शिल्पकला—

भारतीय शिल्पकलेपैकीं सिंधु नदीच्या खोऱ्यांतील शिल्पकला, मौर्यकालीन शिल्पकला, मध्ययुगीन शिल्पकला इ. चें विवेचन करणारे पुष्कळ ग्रंथ व लेख प्रसिद्ध झालेले आहेत. आज आपलें चित्त वेधून घेणारे हिंदी शिल्पाचे उत्कृष्ट नमुने हे केवळ नैसर्गिक दृश्याच्या प्रतिकृती नव्हत. तर त्यांमध्यें वास्तवता प्रतिबिंबित होत असून जिवंतपणा, परिपूर्णता व सौंदर्य या गुणानिशीं भारतीय जीवन त्यांत दृग्गोचर होतें. मानवशास्त्रज्ञांच्या मतें मातीपासून भांडीं, मूर्ति वगैरे वस्तू बनविण्याची कला प्रस्तर युगांतहि चांगली पुढें गेलेली होती. या विधानाला उपोद्बलक भारतीय पुरावा म्हणजे सिंधु नदीच्या खोऱ्यांत इ. पू. ३००० च्या सुमाराचे अवशेष होत. या अवशेषांवरून असें अनुमान करतां येतें कीं, सिंधूच्या प्रदेशांत प्राचीन सुधारणेच्या काळीं आढळणारी ही कला बहुधा प्राचीन अश्मयुगांत उदयास आली असून मोहेंजोदडो, हडप्पा येथील सुधारणेच्या काळापर्यंत ती प्रचारात होती आणि पुढील काळांतहि भारतीय शिल्पकलेवरील तिची पकड कायम होती. पुढील काळांत हिंदी शिल्पकला मागें पडण्याचें कारण हेंच कीं, नवनवोन्मेषशालिनी अशा प्रतिभेचा लोप झाला. चित्रकला व शिल्प यांच्या निर्मितीच्या तंत्रांत आमूलाग्र बदल करणाऱ्या आधुनिक शास्त्रीय पद्धतीचा अंगीकार करून कांहीं हिंदी कलावन्त यशस्वी ठरले असतील, तथापि सर्वश्रेष्ठ परदेशी कलावन्त व टीकाकार यांनीं ही गोष्ट मान्य केली आहे कीं आधुनिक काळात ज्यांनीं आपल्या कलेच्या द्वारा भारतीय जीवन व विचारसरणी यांना व्यक्त स्वरूप देण्याचा प्रयत्न केला अशाच भारतीय कलावंतांचे हातून खरी भारतीय कला निर्माण करण्याचें कार्य घडलें आहे. "आधुनिक भारताच्या कलेंत वैशिष्ट्यपूर्ण प्रगति घडवून आणावयाची असेल तर ती भूतकाळावर आधारलेली असली पाहिजे, व तिनें भारतीयांच्या भावनेचें आविष्करण केलें पाहिजे." विख्यात इतिहासवेत्ता व्हिन्सेंट स्मिथ यानें काढलेले हे उद्गार परकीय आदर्शांचें अनुकरण करणाऱ्यांना योग्य मार्गदर्शन करणारे असून स्वतंत्र भारतातील कलोपासकांनीं त्यातील मर्म ध्यानीं घेतल्यास कलाक्षेत्रात भारत स्वतःचें खास स्थान निर्माण केल्याशिवाय राहणार नाहीं. *

---

* सन १९४९ मध्यें दरभंगा येथें भरलेल्या अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेच्या १४ व्या अधिवेशनात भौतिकविद्याविभागाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणाचा संक्षिप्त अनुवाद.

# प्राचीन मनुस्मृति

( श्री. अनंतशास्त्री फडके )

मनुस्मृति सर्व स्मृतिकारांना व निबंधकारांना अत्यंत मान्य आहे याबद्दल वाद नाहीं. या स्मृतीवर अनेक टीका आहेत. परंतु सर्व टीकेंत मान्य व मनुस्मृतीचा स्पष्ट अर्थ वर्णन करणारी कुल्लुकभट्टांनीं केलेली मन्वर्थमुक्तावली नावाची टीका प्रसिद्ध व सर्वत्र मुद्रित आहे. निबंधकारांनीं मनूचे म्हणून आपआपल्या ग्रन्थांत उद्धृत केलेले जवळजवळ ४०० श्लोक कुल्लुकभट्टकृत टीकेसहित प्रचलित असलेल्या मुद्रित मनुस्मृतींत मिळत नाहींत. हे श्लोक मनुस्मृतींतून नाहींसे कसे झाले हा एक गंभीर विचार करण्यासारखा विषय आहे. त्याचप्रमाणें लघु, ज्येष्ठ, वृद्ध, बृहत्, मध्यम इत्यादि विशेषणांनीं त्या त्या स्मृतिकाराचे म्हणून अनेक श्लोक उद्धृत केलेले आढळतात. हाही विषय विचारणीय आहे.

ज्या अर्थी मान्य निबंधकारांनीं मनूचे म्हणून श्लोक आपल्या ग्रन्थांत उद्धृत केलेले आहेत त्या अर्थी त्यांचेपाशीं असलेल्या मनुस्मृतींत ते श्लोक असावेत असें निश्चित वाटतें; व कुल्लुकभट्टांनीं टीका केलेल्या मनुस्मृतीपेक्षां प्राचीन स्मृति कांहीं निराळी असावी असें मनांत येतें. ती कशी असावी याबद्दल विचार करतांना पुराणांत आलेल्या धर्मप्रतिपादक वचनाकडे सहज लक्ष्य जातें. पुराणांत जो जो धर्मप्रतिपादक भाग आलेला आहे तो तो कोणत्यांना कोणत्या तरी स्मृतीवरून, धर्मसूत्रावरून अथवा ब्राह्मणग्रन्थांतून घेतलेला आहे. कोठें कोठें तर त्या त्या स्मृतिकारांचीं नांवेंहि मिळतात. प्रकृत मनुस्मृतीबद्दल विचार करितां भविष्यपुराणाच्या ब्राह्मपर्वांतील श्लोकांचें अर्थशः पदशः साम्य तर आढळतेंच. क्वचित् अधिक संख्येनें मनुस्मृतीवरूनच ते श्लोक घेतलेले आहेत असा निश्चय होतो तसेंच कांहीं कांहीं स्थलांत भिन्नभिन्न पाठभेद व कांहीं कांहीं ठिकाणीं श्लोकानुक्रमभेद आढळतो. प्रचलित असलेली मनुस्मृति व कुल्लुकभट्टकृत टीका यांतील श्लोकानुक्रमांत विसंगति वाटते. ब्राह्मपर्व व प्रचलित मनुस्मृति या दोहोंचें थोडेसें तुलनात्मक आलोचन केलें असतां ही गोष्ट स्पष्ट होईल.

*आलोचन करण्यापूर्वी प्रचलित भविष्यपुराण व तदन्तर्गत ब्राह्मपर्व या*बद्दल येणाऱ्या शंकांचा विचार करणें योग्य होईल. " भविष्यपुराण मूळ स्वरूपांत उपलब्ध नाहीं, प्रत्येक वेळीं त्यांत भर पडत गेली आहे, अर्थात् तें पुराण प्रमाण धरण्यासारखें नाहीं," इत्यादि या पुराणाबद्दलचे कांहीं आक्षेप जरी थोड्या

ग्रंथानें तेर असले तरी सर्वच भविष्यपुराण अप्रमाण आहे असें म्हणतां याव-यार्चे नाहीं. कारण भविष्यपुराणाचा कांहीं भाग, निदान ब्राह्मपर्व तरी, अत्यंत प्राचीन आहे यांत शंका नाहीं.

ब्राह्मपर्वात ब्रह्मदेवाच्या पूजनाबद्दल व मन्दिर-निर्माण प्रकाराबद्दल बरेंच वर्णन मिळतें. त्याचप्रमाणें कार्तिक कृष्ण प्रतिपदेला वर्षारंभ सांगितला आहे. या दोन्हीहि गोष्टी अनेक शतकांपूर्वी व्यवहारांतून नाहींशा झाल्या असें विद्वानांचें मत आहे.

बाराव्या शतकांत झालेल्या अपरार्कानें याज्ञवल्क्यस्मृतीच्या टीकेंत भविष्यपुराणाच्या ब्राह्मपर्वांतील वचनें 'तथा च भविष्यत्पुराणात्' असें म्हणून उध्दृत केलीं आहेत.

अष्टादश पुराणानि रामस्य चरितं तथा ।

... ... ... ... ... ... ... ...

जयेति नाम चैतेषां प्रवदन्ति मनीषिणः ॥ ४. ८७-९७

श्रीशंकराचार्यांनीं भविष्यपुराणांतील उतारे घेतले आहेत. नारदपुराणांत भविष्यपुराणाची विषयसूची दिलेली आहे. तिच्यापैकीं ब्राह्मपर्वाची विषयसूची प्रचलित विषयसूचीशीं बरीच जुळते. यावरून प्रचलित ब्राह्मपर्व नारदपुराणाच्या संकलनापूर्वी जसें होतें तसेंच आजहि आहे असें दिसतें. नारदपुराणाचा समय बहुतेक विद्वानांनीं पांचवें शतक ठरविला आहे. यावरून प्रचलित ब्राह्मपर्व पुष्कळ प्राचीन आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मपुराणाचा तिसरा व चौथा असे दोन अध्याय मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायाशीं ताडून पाहिले असतां त्यांतील बहुतेक श्लोक मनुस्मृतींतून घेतलेले आहेत असें वाटतें. क्वचित् कोठें मनूच्या नांवाचा उल्लेख केलेला आहे, जसें—

मनुना च तथा प्रोक्तं नाम्नो लक्षणमुत्तमम् । अध्याय ३

कोठें कोठें 'मनु' शब्दाबद्दल 'प्रभु' असा पाठ आढळतो, कारण भविष्यपुराण ब्रह्मदेवानें मनूला सांगितलें आहे. तेच श्लोक प्रचलित मनुस्मृतींत मनु अशा पदानें युक्त आढळतात. कारण उघडच आहे. मनूनें ही स्मृति भृगूला सांगितली आहे.

प्रचलित मनुस्मृतींत प्रथम अध्यायाचे ६३ श्लोकात मन्वन्तर काळाबद्दल सूचक शब्दानें काल मुचवून शेवटीं उपसंहारांत ब्रह्मदेवाच्या दिवसाचें म्हणजे कल्पाचें वर्णन केलें आहे (अ. १ श्लो. ६८). परंतु प्रारंभीं कल्पाच्या

वर्णनाबद्दल कांहींच उल्लेख नाहीं; तो असणें आवश्यक वाटतें. परंतु ब्राह्म पर्वात याच ठिकाणीं तसा स्पष्ट उल्लेख केलेला आहे, व तो अत्यंत उचित आहे असें वाटतें.

कल्पादौ सृजते तात अन्ते कल्पस्य संहरेत् ।
दिनं तस्येह यत्तात तत्कल्पान्तमिति कथ्यते ॥
कालसंख्यां ततस्तस्य कल्पस्य शृणु भारत ।
निमेषा दश ... ... ... ॥ २.४७

यावरून प्राचीन मनुस्मृतींत हीं वचनें असावींत असें वाटतें. प्रचलित मनुस्मृतींत ' स्वयमेव ब्राह्मणो भुङ्क्ते ' ( अ. १.१०१ ) या श्लोकानंतर पुढें १११ श्लोकापासून मनुस्मृतीच्या विषयांची सूची दिली आहे. ब्राह्मपर्वात 'स्वयमेव ब्राह्मणो भुङ्क्ते ' यानंतर मनुस्मृतीचा ( २.२६ ) उचित श्लोक " वैदिकैः कर्मभिः पुण्यै " देऊन प्रचलित मनुस्मृतीप्रमाणेंच पुढील वर्णन आहे. मध्यें विषयसूची नाहीं. त्यावरून कदाचित् विषयसूची प्रक्षिप्त असणें शक्य आहे. त्याचप्रमाणें प्रचलित मनुस्मृतींत तृतीय अध्यायाचे द्वितीय श्लोकापासून चवेचाळीस श्लोकापर्यंत विवाहसंबंधीं वर्णन केलें आहे, मध्येंच ४५ पासून ५० श्लोकापर्यंत सहा श्लोक गर्भाधानाचे आले आहेत व पुढें ५१ श्लोकापासून पुनः विवाहप्रकरणाचेंच वर्णन आहे. मध्येंच हे सहा श्लोक असंगत वाटतात. ब्राह्मपर्वात विवाहप्रकरणाचे संपूर्ण श्लोक मनुस्मृतीप्रमाणेंच आहेत. परंतु मध्येंच असंगत असणारे ६ श्लोक नाहींत, अर्थात् ते प्राचीन मनुस्मृतींत नव्हते. हे तृतीय अध्यायाचे अकरावे श्लोकानंतर अथवा ब्राह्म पर्वाप्रमाणें प्रचलित मनुस्मृतीचे तृतीय अध्यायाचे सदुसष्ट श्लोकापूर्वी असावेत. त्याचप्रमाणें तृतीय अध्यायात ५४ व्या श्लोकाचा उत्तरार्ध ( अर्हणं तत्कुमारीणामानृशंस्यं च केवलम् ) व त्यावरील टीका असंगतशी वाटते. ब्राह्मपर्वात ७ व्या अध्यायांत आलेल्या या श्लोकांत हा अर्धभाग नाहीं.

लहान लहान पाठभेद तर पुष्कळच आहेत, परंतु कांहीं ठिकाणचे पाठभेद गंभीर विचार करावयास लावणारे आहेत. जसें, प्रचलित मनुस्मृतींत

शूद्रावेदी पतत्यत्रेरुतथ्यतनयस्य च ।
शौनकस्य सुतोत्पत्त्या तदपत्यतया भृगोः ॥ ३. १६

असा पाठ आहे. परंतु ब्राह्मपर्वात सप्तमाध्यायांत---

शूद्रामारोप्य वेदीं तु पतितोऽत्रिर्बभूव ह ।
उतथ्यः पुत्रजननात् पतितत्वमवाप्तवान् ॥

शूद्रस्य पुत्रमासाद्य शौनकः शूद्रतां गतः ।
भृग्वादयोऽप्येवमेव पतितत्वमवाप्नुयुः ॥ १०-११

असा पाठ आहे. निबंधकारांनी मनूचे म्हणून उद्धृत केलेले श्लोक एकत्र करून मुद्रित केलेल्या विभागांत मनूचे कांहीं श्लोक आढळत नाहींत. जसें:—

शिखा ज्ञानमयी यस्य पवित्रं च तपोमयम् ।
ब्राह्मण्यं पुष्कलं तस्य मनुः स्वायंभुवोऽब्रवीत् ॥ ४४. २१

असा श्लोक ब्रह्मपर्वांत आहे. असो. धर्मशास्त्राचा अभ्यास करणाऱ्यांना पुराणांत आलेला धर्मशास्त्रभाग अवश्य अध्ययन करण्यासारखा आहे. सर्व पुराणांत उपलब्ध होणाऱ्या धर्मशास्त्रीय वचनांच्या विवेचनानें प्रत्येक स्मृतीचें मूलस्वरूप व त्या स्मृतीनें प्रतिपादन केलेली व्यवस्था ज्या प्रांतांत चालू आहे, तो देश त्या पुराणाचा ठरवितां येईल किंवा कसें इत्यादि अनेक विचार करितां येण्यासारखे आहेत. या व दुसऱ्या विषयासंबंधीं पुष्कळ संकलन केलेलें आहे. केवळ विद्वानांच्यापुढें विचारार्थ हा विषय मांडला आहे.

---

# पाणिनीय दर्शन

# व

# शब्दप्रक्रिया

( श्री. लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर )

भाषेचें व्याकरण जितकें शास्त्रशुद्ध, सुटसुटीत, असंदिग्ध, संकररहित व व्यापक असेल तितक्या प्रमाणांत ती भाषा सुद्धां त्या त्या गुणांनीं युक्त, दोषरहित व प्रौढ समजली जावे. संस्कृत सारस्वताला अनन्यसाधारण स्थान प्राप्त करून देण्यांत व्याकरणशास्त्राचा फार मोठा वाटा आहे. असंदिग्ध, संकररहित व व्यापक असें व्याकरण संस्कृत भाषेखेरीज कोणत्याही भाषेला लाभलेलें नाहीं असें म्हटल्यास तें अतिशयोक्त होणार नाहीं. संस्कृत भाषेचीं व्याकरणें इन्द्र, चन्द्र, काशकृत्स्न, आपिशलि, शाकटायन, पाणिनि, अमरसिंह, जैनेन्द्र या विद्वानांनीं केलेलीं प्रसिद्ध आहेत. यांमध्यें पाणिनीचेंच व्याकरण सर्वश्रेष्ठ ठरून त्याला "वेदांगामध्यें मुख" हें स्थान मिळालें व "वृद्धिरादैच्" हें पाणिनीय व्याकरणाचें पहिलें सूत्र इतर वेदवेदांगाच्या आद्यप्रतीकाचे बरोबर प्रशस्यशात पढलें जाऊं लागलें. इतकी या व्याकरणाची श्रेष्ठता पूर्वकालीं पराकाष्ठेला पोहोंचली. सुमारें गेल्या तीन हजार वर्षांच्या काळांत पाणिनीचेंच प्रामाण्य मान्य करून त्याचीच परंपरा समृद्ध करणारे शेंकडों नवनवीन ग्रंथ निर्माण झाले. संग्रह, वृत्ति, काशिका, प्रक्रिया, कौमुदी, वगैरे एकामागें एक बाजूला पडून दुसरे उदयास आले. स्वतः भाष्यकारांनीं पुष्कळ सूत्राचें खंडन करूनही पाणिनीचेंच प्रामाण्य व सर्वश्रेष्ठत्व मान्य केलें आहे. ते म्हणतातः— "प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणिः शुचावकाशे प्राङ्मुख उपविश्य महता प्रयत्नेन सूत्राणि प्रणयति स्म। तत्राशक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुं किं पुनरियता सूत्रेण" म. भा. १।१।१. तसेंच "सामर्थ्ययोगान्नहि किंचिदस्मिन् पश्यामि शास्त्रे यदनर्थकं स्यात्" म. भा. १६।१।७८. म्हणूनच महाभाष्य ही दशा जरी व्याकरणभाष्यालाच असली, किंबहुना शास्त्रप्रक्रियेच्या बाबतींत इतर शास्त्राप्रमाणें भाष्यकारापेक्षां सूत्रकाराचें प्रामाण्य प्रबल न मानता "यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्" या वैयाकरण सिद्धान्ताला अनुसरून भाष्यकारमताचेंच प्रामाण्य मानलें गेलें तरी ब्रह्मयज्ञांत स्थान मिळण्याचें भाग्य 'अथ शब्दानुशासनम्' या महाभाष्याच्या आरंभग्रंथाच्या वाट्यास न येतां तें 'वृद्धिरादैच्' या सूत्रालाच मिळालें.

प्रथम व्याकरण हें शास्त्र असून दर्शन नाहीं असा बहुतांशीं समज आहे. म्हणूनच 'षड्दर्शनें' असेंच म्हणण्याची वहिवाट आहे, व त्यांत व्याकरणाचा समावेश केला जात नाहीं. 'शासु अनुशिष्टौ' या धातूपासून शास्त्र शब्द सिद्ध केला असल्यामुळें ज्यांत 'अनुशासन' म्हणजे विधिनिषेध सांगितलेले असतात तें 'शास्त्र' व दर्शन म्हणजे पाहणें किंवा दाखविणें हें ज्यांत असतें तें 'दर्शन' म्हणजे तत्त्वज्ञान असा दोहोंमध्यें फरक आहे. एवढ्यावरून व्याकरणांत दार्शनिक भाग नाहींच ही समजूत मात्र चुकीची आहे. या शास्त्रांत दार्शनिक भाग अधिक नसल्यामुळें षड्दर्शनांत याची गणना नाहीं हें निराळें. श्रीविद्यारण्यांनीं 'सर्वदर्शनसंग्रह' नांवाच्या आपल्या ग्रंथांत पाणिनिदर्शनाचा समावेश केला आहे. व्याकरणशास्त्राचीं दार्शनिक मतें वेदान्तमताशीं बरींच जुळतीं आहेत. उदा. वैयाकरण वेदान्त्यांप्रमाणें विवर्तवादी आहेत. याला प्रमाण भर्तृहरीचें पुढील वाक्य आहे:—

अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम् ।
विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ॥ वाक्य० १-१

यापुढें सुमारें १०–१५ श्लोकांत जगाचें आदिकारण असें जें स्फोटात्मक अक्षरब्रह्म त्याचें वेदान्तप्रतिपादित शुद्ध ब्रह्माशीं एकरूपतेनें इतकें तंतोतंत प्रतिपादन केलें आहे कीं त्यामुळें केवळ शब्दभेदाखेरीज दुसरा कांहीं भेद आहे असें वाटत नाहीं. श्री भट्टोजी दीक्षितांनीं तर आपल्या वैयाकरणसिद्धान्तकारिकांचें अन्त्य मङ्गलच या अक्षरब्रह्माला नमस्कार करून केलें आहे:—

इत्थं निष्कृष्यमाणं यच्छब्दतत्त्वं निरञ्जनम् ।
ब्रह्मैवेत्यक्षरं प्राहुस्तस्मै पूर्णात्मने नमः ॥ ७२ ॥

यावरून हे पण्डित आपापल्या शास्त्रीय तत्त्वाशीं किती समरस झाले होते व व्याकरणाचे दार्शनिक सिद्धांत किती स्वच्छ व निर्दोषपणें मांडीत असत हें दिसून येतें.

आपाततः शब्दसिद्धि हेंच काय तें व्याकरण असें वाटतें. परंतु वरील दार्शनिक पद्धतीनें पाहिलें असता शब्दसिद्धीला तादृश महत्त्व नाहीं. मूळ धातु

---

१. प्रवृत्तिर्वा निवृत्तिर्वा नित्येन कृतकेन वा ।
पुंसां येनोपदिश्येत तच्छास्त्रमभिधीयते ।

२. आरम्भवादः कणभक्षपक्षः संघातवादस्तु भदन्तपक्षः ।
सांख्यादिपक्षः परिणामवादो वेदान्तपक्षस्तु विवर्तवादः ॥

'रम्' असा समजून त्यापासून 'राम' हें रूप बनविण्यासाठीं त्यास उपधावृद्धि[१] केली काय किंवा 'राम्' असा धातू कल्पून 'रमते' इत्यादि रूपांची सिद्धि करण्याकरिता त्याच्या उपधेला ह्रस्वाची कल्पना केली काय, दोनही कल्पना-मात्र असल्यामुळें दोहोंत मोठासा फरक आहे असें नाहीं. फक्त लाघवाचा काय तो प्रश्न. एवढ्या विस्तीर्ण संस्कृत भाषेचें व्याकरण लिहावयाचें तें थोड-क्यात–अल्पाक्षर सूत्ररूपात–जो लिहील त्याचें खरें महत्त्व.

अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् ।
अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥

लाघवाचे बाबतींत महाभाष्यकारांनीं 'रक्षोहागमलघ्वसंदेहाः प्रयोजनम्' 'न चान्तरेण व्याकरणं लघुना उपायेन शब्दाः शक्या ज्ञातुम्' असें म्हटलें आहे. म्हणूनच शृगग्राहिकेनें हा शब्द शुद्ध व हा अशुद्ध अशा प्रतिपदपाठानें व्याकरण-ज्ञान करून देणें अशक्य आहे, हें दाखवून देणेकरितां 'एवं हि श्रूयते' असें म्हणून पुढील श्रुति उद्धृत केली आहे —

"बृहस्पतिरिन्द्राय दिव्यं वर्षसहस्रं प्रतिपदोक्तानां शब्दानां शब्दपारायणं प्रोवाच नान्तं जगाम।"

या लाघवाबद्दल वैयाकरणांना असलेल्या विशिष्ट अभिमानाची द्योतक एक परिभाषा 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः' अशी प्रसिद्ध आहे. याचें तात्पर्य इतकेंच कीं ज्या लाघवगौरवविषयीं ऊहापोह केला असता न्यूनाधिक अर्थनिष्पत्ति होणें शक्य असेल असें लाघव अर्धमात्रेइतपतही या व्याकरणात मिळणार नाहीं ही वैयाकरणाची एक प्रतिज्ञा आहे. ही प्रतिज्ञा असूनसुद्धा 'वा विभाषा', 'अन्यतरस्यां' इत्यादि प्रयोगांत लाघव गौरव प्रसिद्ध आहे. यावरून अर्थनिष्पत्तिरहित शुष्क घासाघीस करण्यासाठीं हें वचन नाहीं हें लक्षात येईल. यासाठींच 'पर्यायशब्दानां लाघवगौरवचर्चा नाद्रियते'[२] अशी परिभाषा मानिली आहे.

अशा प्रकारें अर्धमात्रेचेंसुद्धा लाघव दाखवितां येणार नाहीं इतक्या दक्षतेनें, कुशाग्र बुद्धिमत्तेनें, ईश्वरी प्रसादानें जरी भगवान् पाणिनीनें व्याकरण लिहिलें तरी सुमारें चार हजार (३९८३) सूत्रें लिहावीं लागलीं. इतकी सूत्रसंख्या इतर कोणत्याही शास्त्राची नाहीं नुसतें संख्येपुरतेंच वैशिष्ट्य नाहीं, तर या शास्त्राच्या घटनानियमानुसार सूत्रांचें स्थलांतरसुद्धा खपणार नाहीं. म्हणजे

१. उपान्त्य वर्ण
२. विप्रतिषेधे परं कार्यम् ।

जें सूत्र ज्या अध्यायात ज्या पादांत ज्या क्रमांकानें लिहिलें आहे त्यांत थोडा-मुद्दां फरक किंवा मार्गेपुढें करून चालणार नाहीं. तसें केल्यानें लागलीच शास्त्र-प्रक्रियेंत दोष उत्पन्न होऊन शब्दसिद्धि होणार नाहीं इतकी तंतोतंत सुव्यवस्थित निर्दोष रचना इतर कोणत्याही व्याकरणांत किंबहुना इतर शास्त्रांतहि दिसून येणार नाहीं, असें म्हटलें तरी फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं.

पाणिनीच्या सूत्रांतून सर्वत्र बहुधा गुण, वृद्धि, लोप, आगम इत्यादि शब्दप्रक्रियाच दिसून येते. अर्थप्रक्रिया कारक, लकारार्थ वगैरे प्रकरणांत व 'आतयाल्पयाप्याम्' इत्यादि कांहीं सूत्रांत शब्दप्रक्रियेच्या अनुरोधानें विस्कळित आहे. ह्याच प्रकारें सूत्रानुसारित्वामुळे महाभाष्यांतही झाला आहे. अर्थप्रक्रियेस स्वतंत्रपणें प्रकरणवार वाहून घेतलेला प्रमाणभूत आद्य ग्रंथ फक्त एक वाक्यपदी-यच. ह्याटीचा सम्प्रदाय कसा आहे हें कळण्यास मार्ग नाहीं मन्वादिस्मृतींतून विस्कळीत असलेलें धर्मशास्त्र प्रकरणवार लोकांना उपलब्ध करून देण्यासाठीं जसे हेमाद्रि, निर्णयसिन्धु वगैरे निबन्धग्रंथ निर्माण झाले त्याप्रमाणें व्याकरण-शास्त्रांत प्रकरणवार अर्थप्रक्रियेला वाहून घेतलेले स्वतंत्र ग्रंथ म्हणजे भट्टोजी दीक्षितांच्या वैयाकरणसिद्धांतकारिका, त्यांचें व्याख्यानभूत वै. भूषण, व वै. भूषणसार आणि नागोजीभट्टांची गुरुमञ्जूषा, लघुमञ्जूषा व परमलघुमञ्जूषा हे होत. यांत शब्दसिद्धिप्रक्रिया गौण असल्यामुळें तिचा विचार केलेला नाहीं, इतकेंच नाहीं तर शब्दसिद्धि ही एक प्रकारें उपलालनच. जसें:—

> शास्त्रेषु प्रक्रियाभेदैरविद्यैवोपवर्ण्यते ।
> उपाया॰ शिक्षमाणानां बालानामुपलालना॰ ।। वाक्य० २.२३५
> असत्ये वर्त्मनि स्थित्वा ततः सत्यं समीहते । वाक्य० २.२४

यावरून शब्दसिद्धिप्रक्रिया गौण व खोटी आहे असेंच पाणिनीय पर-परेनें मानलें आहे हें स्पष्ट होतें. खरें व्याकरणशास्त्र म्हणजे शब्दब्रह्माचें ज्ञान हेंच होय, हें पुढील हरिकारिकावरून लक्षांत येईल:—

> तद्द्वारमपवर्गस्य वाङ्मलानां चिकित्सितम् ।
> पवित्रं सर्वविद्यानामधिविद्यं प्रकाशते ।।
> इदमाद्यं पदस्थानं सिद्धिसोपानपर्वणाम् ।
> इयं सा मोक्षमाणानामजिह्मा राजपद्धति॰ ।।

---

१ सूत्रार्थो वर्ण्यते यत्र वाक्यैः सूत्रानुसारिभि॰ ।
स्वपदानि च वर्ण्यन्ते भाष्यं भाष्यविदो विदुः ।।

२ उपलालना —प्रतारणा इति ल. म. टीका कुञ्जिका.

'तें शब्दब्रह्म म्हणजेच स्फोट. या स्फोटाचें लक्षण भट्टोजी दीक्षितांनी वै. सि. कारिकामध्ये "अनेकव्यक्त्यभिव्यङ्ग्या जातिः स्फोट इति स्मृता" । असें केलें आहे. हा स्फोट नावाचा न दिसणारा, दृष्टदिशी अनुभव येत नसल्यामुळें सामान्य बुद्धीला आकलन करण्यास फार कठीण असा निराळा पदार्थ मानण्याचें कारण शब्दापासून अर्थबोध होतो याची उपपत्ति होत नाहीं हें होय. तें असें कीं—आधीं शब्द म्हणजे काय ? तर वर्णसमुदाय. वर्ण म्हणजे मुखानें उच्चारिलेले व कानांनीं ऐकिले जाणारे ध्वनि. लिहिलेली हीं मुखरी चिन्हें रेषा होत व ते निरनिराळ्या लिपींतून निरनिराळ्या प्रकारांनीं लिहिले जातात. म्हणून एकच गकार भिन्नभिन्न लिपींतून निरनिराळ्या तऱ्हांनीं लिहिल्यामुळें अनेक प्रकारचा मानण्याचा प्रसंग येईल. याकरितां लिप्यात्मक हे वर्ण नव्हेत असें मानणें जरूर आहे. मुळाक्षरांना वर्णमाला हें नांव द्योत्य-द्योतकांचा अभेद मानून दिलें गेलें आहे. ते ध्वन्यात्मक वर्ण "उच्चरितप्रध्वस्त" म्हणजे उच्चारणाच्या अव्यवहितोत्तरकालीं नाश पावणारे असल्यामुळें यांचा समुदाय होणें शक्य नाहीं.

याप्रमाणें शब्दालाच जर ठिकाणा नाहीं तर ' सति कुड्ये चित्रीकरणम्' या न्यायानें त्या शब्दापासून होणारा अर्थबोध कसा उत्पन्न होणार ? उपपत्ति नाहीं म्हणून शब्दही नाहीं व अर्थही नाहीं असें म्हणावें तर भाषेवाचून जगांतील कोणताही व्यवहार शक्य नाहीं हें सर्वानुभूत आहे. ' नहि दृष्टे अनुपपन्नं नाम'। म्हणूनच महाभाष्यकारांनीं ' अथ गौरित्यत्र कः शब्दः ' असा प्रश्न उपस्थित केला आहे. याचें तात्पर्य असें आहे कीं—येथें गकार औकार व विसर्ग असे 'गौः' या शब्दाचे तीन अवयव दिसून येतात. यांतील शब्द कोणाला म्हणावयाचें ? शब्दत्व हा धर्म प्रत्येकावर आहे कीं तिहींवर मिळून म्हणजे समुदायावर आहे ? यैकीं प्रत्येक वर्णावर शब्दत्व ( अर्थबोधकत्वविशिष्ट ) असलें असें म्हटलें तर बाकीचे वर्ण उच्चारण्याची गरज राहणार नाहीं. समुदाय तर वरील युक्तीनें संभवतच नाहीं. तेव्हा येथें अर्थबोधक कोण ? समुदाय तर एकापरी क्षणध्वंसी वर्णांचाच काय, पण पाषाणादि सिद्धपदार्थांचाही संभवत नाहीं, हें लघुमञ्जूषेतील पुढील उताऱ्यावरून सिद्ध होत आहे.—" तदतिरिक्तोऽवयवी तु नोपलभ्यते ग्रावसमुदायस्थल इव, किंच तस्यातिरिक्तत्वे रूपगुरुत्वादेर्द्वैगुण्यस्योपलम्भापत्तिः." (ल. म. पृ. ३७१ ) शाबरभाष्यातहि ' असत्यप्यर्थान्तरे एवजातीयको भवति प्रत्ययः पंक्तिः यूथं वनमिति यथा ' ( शा. भा. १।१।५ ) या प्रकरणांत हीच अनुपपत्ति प्रस्तुत केली आहे.

---

१. शाबरभाष्य १।१।५

महाभाष्यांत प्रकृत ‘ गौरित्यत्र ’ या प्रश्नाचें उत्तर देतांना ‘ किं यत्तत्सास्नालाङ्गूलककुदखुरविषाण्यर्थरूपं स शब्दः ? नेत्याह ’ इत्यादि भाष्यानें द्रव्य, गुण, क्रिया, जाति या चारांच्या शब्दत्वाचा निरास केला आहे. परंतु हें संभवतें कसें ? शब्द व द्रव्यादि पदार्थ हे एकरूप असणार कसे ? ही शंका लघुमञ्जूषेंत पुढीलप्रमाणें मांडिली आहे—“शब्दार्थयोरविभागादेव परपशायाम् ‘ अथ गौरित्यत्र कः शब्दः ’ इति प्रश्नः । किंच तत्प्रपट्टके जात्यादीनां शब्दत्वमाशङ्कितं शाब्दिकशब्दतत्त्वाशानात् । न चैवमपि गुणादीनां गोशब्दत्वाशङ्का कथम् ? तेन शब्देन तेषां तादात्म्याभावादिति वाच्यम् । निरन्तरःवद्युपावृतसिद्धत्ववदवयवविशेषानुगतसामान्यविशेषरूपगुणसमूहस्यैव द्रव्यत्वात् । क्रियामिति सूत्रे द्रव्ये च भवतः कः सप्रत्ययः ? गुणसमुदायो द्रव्यम् , इति भाष्यात् ।” (ल. म. ३६५)

याप्रमाणें शब्द व अर्थ यांच्या भेदाचें ज्ञान न झाल्यामुळें द्रव्यादिकांबद्दल हे ‘शब्द’ होत किंवा नाहीं अशी शंका उत्पन्न झाली व ती उपपन्न झाली आणि द्रव्यादिकांवर ‘ शब्दत्वभिन्न व्याप्यव्यापकभावानापन्न ’ अशी द्रव्यत्वादि जाति असल्यामुळें ते ‘शब्द’ होऊं शकत नाहींत म्हणून त्यांचा निरास केला. व नंतर ‘ येनोच्चारितेन सास्नालाङ्गूलककुदखुरविषाणिनां सम्प्रत्ययो भवति स शब्दः ’ असें उत्तर देऊन स्फोटात्मक शब्दापासून अर्थबोध होतो व तो शक्य आहे. कारण ‘ध्वनि’ हे क्षणध्वंसि असल्यामुळें त्यांचा समुदाय संभवत नव्हता. ध्वनीनें अभिव्यक्त होणाऱ्या स्फोटरूपी शब्दामध्यें ही अनुपपत्ती येत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे “ध्वन्यात्मक शब्दाची जी अर्थबोधक शक्ति तोच स्फोट” होय. शक्ति ही मनुष्यादि सर्व पदार्थांमध्यें अदृष्ट व कार्यानुमेयच असल्यामुळें तिच्या बाबतींत कांहीं अनुपपत्ति येण्याचें कारण नाहीं. अशा तऱ्हेनें शब्दापासून अर्थबोधाचा असंभव घालवून तो सयुक्तिक ठरविण्यासाठीं स्फोट नांवाचा अदृष्ट, अननुभूत पदार्थ मानणें भाग पडतें.

ही अनुपपत्ति घालविण्यासाठीं किंबहुना स्फोटाचें खण्डन करण्यासाठीं शबरस्वामींनीं *जैमिनिकृत मीमांसासूत्रांवर लिहिलेल्या आपल्या भाष्यांत* ‘अथ गौरित्यत्र कः शब्दः ’ असाच प्रश्न उपस्थित करून ‘ गकारौकारविसर्जनीया इति भगवानुपवर्षः ’ असा ध्वन्यात्मक शब्द मानणाऱ्या भगवान् उपवर्षाचा आदरपूर्वक उल्लेख करून त्याचे समर्थनार्थ ‘श्रोत्रग्राह्यो गुणः शब्दः ’ या अर्थानें ‘श्रोत्रग्रहणे ह्यर्थे लोके शब्दशब्दः प्रसिद्धः ’ ( शा. भा. १।१।५ )

१. असें म्हणण्याचें कारण शक्ति ही संस्कारप्रमाणें यत्किंचिन्निष्ठ असते हें होय.

शब्दशक्ति निर्णयाचे बाबतींत लोकव्यवहार हें मुख्य प्रमाण आहे असें प्रतिपादन करणारें वाक्य लिहिलें आहे. नंतर वरीलप्रमाणेंच 'यद्येवमर्थप्रत्ययो नोपपद्यते' अशी अर्थबोधानुपपत्तीची शंका घेऊन शेवटीं वैयाकरणांप्रमाणें सर्ववर्णातिरिक्त स्वतंत्र शक्ति, किंवा हृदयावच्छिन्न मध्यमा वाणीचा मूलभूत जो नाद ज्याला पराबाणी म्हणतात तो स्फोट अर्थबोधक नसून 'पूर्वपूर्ववर्णजनितसंस्कारसहितोऽन्त्यो वर्णः प्रत्यायकः इत्यदोषः' असें उत्तर दिलें आहे. या पक्षांतही अदृष्ट अननुभूत असा संस्कार मानावा लागतोच कीं नाहीं? मग स्फोटापेक्षा तुम्हीं विशेष लाघव तें काय केलें? जसें यज्ञादि कर्मापासून–तेंही उत्पन्नप्रध्वस्त म्हणजे उत्पत्त्यव्यवहितोत्तरकालीं नाश पावणारें असल्यामुळें–स्वर्गादिफलप्राप्तीची उपपत्ती होत नसल्यामुळे मध्यें अपूर्व नांवाच्या पदार्थाची कल्पना करावी लागते त्याप्रमाणें. या अपूर्वासंबंधीं भक्तिमार्गी पुष्पदंतानें फार सुन्दर कल्पना केली आहे. ती अशी—

> क्रतौ सुप्ते जाग्रत्त्वमसि फलयोगे क्रतुमतां
> क्व कर्म प्रध्वस्तं फलति पुरुषाराधनमृते ।
> अतस्त्वां सम्प्रेक्ष्य क्रतुषु फलदानप्रतिभुवं
> श्रुतौ श्रद्धां बद्ध्वा दृढपरिकरः कर्मसु जनः ॥ शि. म. २०

अर्थ—यज्ञकर्म उत्तरक्षणीं नाश पावल्यावर यज्ञाचें फल देण्याला, हे परमेश्वरा, तू जागरूक आहेस. कारण उत्पत्त्युत्तरक्षणीं नाश पावणारें कर्म परमेश्वराराधनेवांचून काय फळ देणार? म्हणून यज्ञफलाचे बाबतींत, हे परमेश्वरा, तू जामीन आहेस हें पाहून यजमान लोक वेदावर श्रद्धा ठेवून यज्ञादिकर्में करण्यास सज्ज असतात.

याप्रमाणें स्फोटाच्या बाबत सदर शंका शबरस्वामीनींही 'ननु संस्कारकल्पनायामप्यदृष्टकल्पना' या भाष्यानें करून 'शब्दकल्पनायां सा च शब्दकल्पना च' असें उत्तर दिलें आहे; व शेवटीं 'तस्मादक्षराण्येव पदम्' असा आपला सिद्धांत सांगून स्फोटाचें आपल्या मतें खण्डन केलें. पण खरोखर खण्डन झालें काय, हें तटस्थ दृष्टीनें पाहिल्यास शब्दभेदाखेरीज अधिक फरक यांत कांहीं दिसून येत नाहीं. कारण पहिल्या वर्णाचा संस्कार नंतर उच्चारिल्या जाणाऱ्या वर्णावर कसा होणार? कारण तेव्हां तो नसतोच मुळीं. संस्कार्य विद्यमान असेल तर संस्कार घडणार. बरें, पूर्ववर्ण नष्ट होतांना संस्कार उत्पन्न करून नाश पावतो असें म्हणावें तर तो कोणावर संस्कार उत्पन्न करणार? कारण त्यावेळीं उत्तरवर्ण नाहीं. संस्कार हा पदार्थगुण असल्यामुळें द्रव्याच्या

आश्रयावांचून त्याची उपलब्धीच होत नसल्यामुळें तो अधांतरीं राहूंच शकत नाहीं. म्हणून हा संस्कारपक्षच अनुपपन्न आहे. फक्त वैयाकरणांना पदगत अनेक वर्णांपेरीज निराळा स्फोट नांवाचा पदार्थ (स्फुटत्यर्थोऽस्मादिति स्फोटः) वाचक मानावा लागतो व मीमांसकांना तो स्वतंत्र मानावा लागत नसून पहिल्या वर्णाचा संस्कार दुसऱ्यावर, त्या दोहोंचा मिळून तिसऱ्यावर या क्रमानें पूर्वीच्या सर्व वर्णांचा संस्कार शेवटच्या वर्णावर होऊन त्याला अर्थवाचकत्व संभवतें. म्हणून क्षणध्वंसी असूनसुद्धां अन्त्यवर्णाला वाचकत्वाची उपपत्ति करितां येते. असें आपाततः मीमांसकपक्षाला लाघव दिसून येतें.

वस्तुतः सर्व वर्णांचा मिळून एक वाचक शक्तिरूपी अखण्ड स्फोट मानण्यापेक्षां प्रत्येक वर्णाचा स्वतंत्र संस्कार व तोहि मीठादिद्रव्यगत संस्काराप्रमाणें नव्हे तर यज्ञादिक्रियाजन्य अपूर्व ज्याप्रमाणें यथासंभव उत्तरकालीं प्राप्त होणाऱ्या स्वर्गादिफलाशीं उत्पादकत्वानें संबंध पावतें, त्याप्रमाणें आत्मविनाशोत्तरकालीं उत्पन्न होणाऱ्या वर्णान्तरावर घडणारा संस्कार मानणें हेंच खरें गौरव आहे. संस्कार हा गुण असल्यामुळें द्रव्याश्रयावांचून राहूं शकत नाहीं हेंहि येथें विसरतां कामा नये. 'स्फोट' हा स्वतंत्र पदार्थ असल्यामुळें त्याबाबत मीमांसकांच्या अपूर्वाप्रमाणें कोणतीहि अनुपपत्ति येत नाहीं; म्हणूनच मीमांसकांनीं अपूर्वाचें काम संस्कारावरच भागविलें नाहीं; नाहींपेक्षां विद्यमान संस्कारपदार्थ सोडून देऊन 'अपूर्व' नांवाचा अपूर्व पदार्थ मानण्याचें मीमांसकांना तरी काय कारण होतें ? या पक्षाला एवढ्यानेंहि भागत नसून या संस्कारोत्पत्तीमध्यें पौर्वापर्यव्यतिक्रम सुद्धां होऊन चालत नाहीं. तसें झालें तर 'सरः' 'रसः' 'नदी' 'दीन' इत्यादि शब्दांपासून होणाऱ्या अर्थबोधांत संकर उत्पन्न होईल. तेव्हां उच्चारणक्रमानेंच संस्कार उत्पन्न होतो हेंहि अधिक दृष्ट व अननुभूत असें मीमांसकांना मानावें लागणार. याकरितां स्फोट मानणें जास्त सयुक्तिक असें वैयाकरणांचें म्हणणें.

श्रीशंकराचार्यांनीं शारीरकभाष्यांत देवताधिकरणामध्यें (१।३।८।२८) 'तस्मान्नित्याच्छब्दात् स्फोटरूपात् अभिधायकात् क्रियाकारकफललक्षणं जगत् अभिधेयभूतं प्रभवति' असा स्फोटपक्षाचा उपसंहार करून 'वर्णा एव तु शब्दः इति भगवानुपवर्षः' इत्यादि उपवर्षाचा वर्णवादिपक्ष नंतर मांडून शेवटीं 'वर्णवादिनो लघीयसी कल्पना स्फोटवादिनस्तु दृष्टहानिरदृष्टकल्पना च' असें आपलें मत मीमांसकांना अनुकूल असें दिलें आहे. पण गुण द्रव्याश्रयावांचून राहत नाहीं. यामुळें संस्कारपक्षाच्या अनुपपत्तींचा कांहीं कोणींच विचार केला नाहीं. यासाठीं हे सर्व संस्कार आत्म्यावर मानावेत—याचकरितां शा.

भाष्यांत ' पूर्वपूर्ववर्णानुभवजन्य ' असा अनुभव शब्द घातला आहे–तर मग एका अन्त्यवर्णासच वाचकत्व कां ? सर्वांचे संस्कार जर आरम्यावर राहतात तर अनुपपत्तीच नाहीं. मग स्फोटाचीहि जरूर नाहीं व अन्त्य वर्णासहि वाचकत्व नको. एकदरींत अनुपपत्ति सर्वांपुढें सारखीच उपस्थित झाली आहे. तिच्या निराकरणाचे उपायांत लाघवगौरवाच्या दृष्टीनें तारतम्यमूलक भेद दिसून येतो, इतकेंच काय तें.

उपेयप्रतिपत्त्यर्था उपाया अव्यवस्थिताः ।

असें भर्तृहरीनेंहि वाक्यपदीयांत म्हटलें आहे. यावरूनहि कोणाच्याहि प्रामाण्यांत कमीअधिकपणा मानण्याचें कारण नाहीं. सर्वच शास्त्रकार आचार्य परमप्रमाणभूत आहेत यांत शंका नाहीं.

याप्रमाणें तत्त्वज्ञानाचे बाबतींत वैयाकरणांचा इतर शास्त्रांशीं मतभेदाचा प्रश्न झाला. शब्दाच्या नित्यत्वाविषयीं वैयाकरण व मीमांसक एकमत असून नैयायिक हे शब्द अनित्य मानितात. नित्य मानण्यास मुख्य गमक 'सोऽयं गकारः' ही प्रत्यभिज्ञा म्हणजे तोच हा ही ओळख पटणें हें होय. नैयायिक या प्रत्यभिज्ञेची उपपत्ति ही सादृश्यमूलक सुद्धां संभवते अशी लावितात. जसें 'त इमे शालयः यान्सौराष्ट्रे अभुञ्ज्महि' तेच हे तांदुळ जे आम्ही सौराष्ट्र देशात खाले.

शब्दांचा व अर्थाचा संबन्धही वैयाकरण व मीमांसक यांचे मतें नित्य आहे. याला 'सिद्धे शब्दार्थसम्बन्धे' हें वररुचीचें पहिलें वार्तिक व 'औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन सम्बन्धस्तस्य ज्ञानमुपदेशोऽव्यतिरेकश्चार्थेऽनुपलब्धे तत्प्रमाणं बादरायणस्यानपेक्षत्वात्' जै. सू. १।१।५ हें जैमिनीचें सूत्र प्रमाण आहे.

अर्थप्रक्रियेपैकीं लकाराचा अर्थ वैयाकरणांच्या मतें कर्ता व मीमांसकांच्या मतें कृति. लक्षणा हा पदार्थच मुळीं मानण्याचें कारण नाहीं, हें वैयाकरण मत परमलघुमञ्जूषेंत ' ननु लक्षणा कः पदार्थ इति चेदत्र तार्किकाः ' असें म्हणून पुढें नैयायिक मतें लक्षणेचें सम्पूर्ण स्वरूप, प्रयोजन, बीज, गौणी, शुद्धा, जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा, तात्स्थ्य, ताद्धर्म्य, तत्सामीप्य, तत्साहचर्य, तादर्थ्य, या निमित्तामुळें होणारे भेद इत्यादि लक्षणेचें सांगोपाङ्ग विवेचन करून शेवटीं 'तन्न, सति तात्पर्ये सर्वे सर्वार्थवाचका इति भाष्याल्लक्षणाया अभावात् । वृत्तिद्वयावच्छेदकद्वयकल्पने गौरवात् जघन्यवृत्तिकल्पनाया अन्याय्यत्वाच्च' असें

---

१ लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः पा. सू. ३।४।६९।२
लकाराणां कृतौ शक्तिर्लाघवान्न तु कर्तरि ।

३. कै. राजवाडे व मी नेवासें येथील मोहिनीराजाच्या वहव्यांचे कांहीं जुने कागद प्रकाशित केले आहेत. त्यांतील चार लेखांत या देवतेचे अनुक्रमें (१) म्हाळसादेवी, (२, ३) श्रीमहाल्सा देवी व (४) श्रीम्हालसा-देवी असे निर्देश आले असून त्या लेखांचीं सालें (१) श. १५४८ (२, ३) श. १५८४ व (४) श. १६२० अशीं आहेत.[२] महानुभावी वाङ्मयापैकीं शकाच्या १३।१४ व्या शतकांत झालेल्या लीळाचरित्र ग्रंथांत व तदनंतर झालेल्या स्थानपोथींत नेवाशाच्या या देवतेचा निर्देश 'म्हाळसा' असा केला आहे.[३] याचा अर्थ असा कीं, श. १३०० ते १६२० च्या दरम्यान या देवतेस महालसा, म्हाळसा किंवा महालसा या नागर नांवानें संबोधीत. अर्थात् तिचें 'महालया' हें नांव श. १६२० नंतरचें व बहुधा गांवढें किंवा कृत्रिम असावें. पत्रें तत्कालीन असल्यानें त्यांतील प्रयोगा-विषयीं शंका घेण्यास जागा नाहीं. मी शेंकडों देवदेवतांचीं नांवें जुन्या ग्रंथांत वाचिलीं आहेत. पण 'महालया' हें नांव कांहीं कोठें माझ्या आढळांत आलें नाहीं.

४. आतां 'महालसा' हें नांव कोणत्या ज्ञानेश्वरींत सांपडतें हें पाहिल्यास राजवाडे आणि माडगांवकरांस सांपडलेली अप्रकाशित या दोनच प्रती अशा आहेत कीं, यांत 'महालसा' असें रूप आलें असून बाकी बहुतेक प्रतींत 'महालया' असें रूप आलें आहे. याचा अर्थ मी असा करतों कीं, राजवाडे व माडगांवकर प्रती श. १३००–१६०० च्या दरम्यानच्या असून बाकीच्या बहुतेक प्रती श. १६०० च्या आगेमागें बनलेल्या आहेत. डॉ. रा. श. दवे यांच्या प्रतींत महालया पाठ असल्यानें तीहि श. १२७२ ची असणें सुतराम् अशक्य आहे. पोथ्यांवर लेखनकाल घातला असला तरी अशी प्रत्येक पोथी लेखनकालीं लिहिली गेली असेलच असें समजण्याचें कारण नाहीं. कित्येकदां प्रतिकार आदर्श पोथी सावत उतरतो तेव्हां कालनिर्देशहि उतरून घेतो. यामुळें नव्या पोथींतहि जुना कालनिर्देश आढळूं शकतो.

---

२. राजवाडे खंड २२, *शिवकालीन घराणीं* ले. ३६४, ३६५, ३६७, शिवचरित्रसाहित्य खंड ४, ले. ७०२.

३. लीळाचरित्र उत्तरार्ध पृ. ११६, स्थानपोथी पृ. ६६.

५. 'म्हाळसा' या नांवावरून येथें आणखी एक मुद्दा सुचतो तो असाः—लीळाचरित्रांत[४] वालसेंग (औरंगाबाद) व नेवासें (अहमदनगर) अशा दोन ठिकाणीं आणि स्थानपोथींत याशिवाय भोगावती किंवा पैठण (औरंगाबाद) व नांदुरा (बीड) अशा आणखी दोन ठिकाणीं म्हाळसेचीं देवस्थानें असल्याचें नमूद आहे. पैकीं नेवाशास म्हाळसेचें देवस्थान असल्याचा पुरावा ज्ञानेश्वरींतच (श. १२१२) मिळाला आहे. तेव्हां म्हाळसा हें दैवत निदान श. १२१२ इतकें जुनें ठरलें.

६. खंडोबास म्हाळसा व बाणा अशा दोन बायका कल्पिल्या असून त्यांपैकीं म्हाळसा मोठी आहे. खंडोबा वयानें म्हाळसेहून मोठा होता कीं लहान ? मला वाटतें तो मोठा असावा. म्हाळसा जर श. १२१२ मध्यें खात्रीनें अस्तित्वांत होती तर खंडोबा तिच्या पूर्वीच अस्तित्वांत असणार. पण किती पूर्वी ? अर्थात् त्याचा शोध घेतला पाहिजे.



४. पूर्वार्ध खं. २, पृ. ६९, उत्तरार्ध पृ. ११६; स्थानपोथी पृ. ४४, ६६, १६, ५१.

विषें खण्डन करून ' गंगायां घोषः ' इत्यादि उदाहरणांतील दोषहि यानंतर दाखविले आहेत, यावरून सिद्ध होतें. त्याचप्रमाणें योग्यता आकांक्षा सन्निधि हे वाक्यार्थाचें ज्ञान होण्यास कारण आहेत हें नैयायिकांप्रमाणें वैयाकरण मानीत नाहींत. त्यांचे मतें ' अत्यन्तासत्यपि ह्यर्थे शब्दो ज्ञानं करोति हि ' असें शब्दाचें अलौकिक सामर्थ्य आहे. या बाबतींत वैयाकरणांचे इतर शास्त्रांशीं मतभेद आहेत. ते सर्व विशद करीत बसण्याचा हा प्रसंग नाहीं.

यावरून स्पष्ट होतें कीं केवळ "शब्दप्रक्रिया" म्हणजे व्याकरणशास्त्र नव्हे. पाणिनीय व्याकरणाचें तर हें सारसर्वस्व नव्हे. ' दार्शनिक ' म्हणजे तत्त्वज्ञानात्मक भाग हेंहि पाणिनीय व्याकरणाचें महत्त्वाचें अंग आहे; व हेंच पाणिनीय व्याकरणाचें वैशिष्ट्य होय. शब्दलाघवासंबंधींहि पाणिनीय परंपरा अत्यंत जागरूक आहे हें वर थोडक्यांत दाखविलेंच आहे. परंतु तें पाणिनीय परंपरेचें असाधारण वैशिष्ट्य नव्हे. क्वचित् प्रसंगीं हें शब्दलाघव इतर वैयाकरणांनाहि चांगलें साधलें असेल. परंतु महाभाष्यकार पतंजलीपासून शेखरकार नागोजी भट्ट काळे यांच्यापर्यंत जवळ जवळ दोन हजार वर्षें अखण्ड चालू असलेल्या "स्फोटाचें" 'दर्शन' मात्र इतर वैयाकरणांना झालेलें नाहीं. याकरितांच केवळ पाणिनीय व्याकरणाला सर्वदर्शनसंग्रहांत ' दर्शन ' म्हणून स्थान मिळालें असून तें अत्यंत योग्य होय, हें सांगण्याचा मी येथें थोडक्यांत प्रयत्न केला आहे.

असो. विद्यानिधि चित्रावशास्त्री यांच्या षष्ट्यब्दपूर्तिसंबंधानें ही व्याकरणसेवा करण्याची संधि मिळाली हा एक स्पृहणीय सुयोगच होय. अशा प्रसंगीं श्री. चित्रावशास्त्री यांना दीर्घायुष्यचिंतन व ही संधि देण्याऱ्या सत्कारसमितीचे आभार मानणें या दोन्ही गोष्टी "अकरणे प्रत्यवायजनक" असें मी समजतों. म्हणून श्री. चित्रावशास्त्री यास दीर्घायुष्य चिंतून व समितीचे आभार मानून हा लेख पुरा करतों. इति शम्.

# ज्ञानेश्वरी आणि म्हाळसा

(श्री. ग. ह. खरे)

१. कोणत्याहि ज्ञानेश्वरीप्रतीचा जुनेपणा ठरवितांना तीस लिपी, भाषा, कालनिर्देश इत्यादि अनेक कसोट्या लावाव्या लागतात. ज्ञानेश्वरींत आलेली विशेषनामें हीहि अशीच एक कसोटी होऊं शकेल. महाभारतांत आलेल्या रोमा नगरीच्या निर्देशावरून तो उल्लेख असलेला भाग केव्हां रचला गेला हें अदमासानें सांगतां येतें.[१] तद्वत् ज्ञानेश्वरींत आलेल्या एका देवतेच्या निर्देशाच्या विशिष्ट नामरूपावरून ज्ञानेश्वरीची तें रूप असलेली प्रत केव्हां तयार झाली असेल याचा अदमास बांधतां येतो असें मला वाटतें. यासाठीं त्या देवतेच्या नामरूपाचा येथें विचार करावयाचा आहे.

२. सध्या ज्ञानेश्वरांच्या नेवाशास मोहिनीराज या देवतेचें एक मंदिर आहे. आज जरी या देवतेस मोहिनीराज म्हणत असले तरी तिची मूर्ति स्त्रीरूप असून ज्ञानेश्वरीच्या सांप्रदायिक प्रतींमध्यें या देवतेचा 'महालया' असा निर्देश केलेला आहे. उदाहरणार्थ ह. भ. प. सोनोपंत दांडेकर यांनीं संपादिलेल्या व नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ज्ञानेश्वरींत अठराव्या अध्यायाच्या अंतीं ओंवी आहे ती अशी:—

त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवसूत्र । श्रीमहालया असे ॥

येथें 'महालया' शब्दाचा अर्थ काय करावयाचा बरें ? मला तो शब्द निरर्थक वाटतो. त्याचा नीट अर्थ मला तरी लावतां येत नाहीं व इतरांनाहि लावतां आला नाहीं. माझी तर खात्री आहे कीं, मूळ पाठ पुढें चर्चिल्याप्रमाणें 'महालसा' असाच होता. पण कोणा तरी अक्षरशत्रूनें वाचतांना चूक करून 'सा' ऐवजीं 'या' वाचिलें. आणि हीच प्रत फार लोकांच्या हातीं पडल्यानें 'महालया' या अपपाठाचा प्रसार झाला.

---

१. महाभारत सशोधित आवृत्ति सभापर्व अ. २८ श्लोक ४९.

३. कै. राजवाडे व मी नेवासें येथील मोहिनीराजाच्या वहीचे काहीं जुने कागद प्रकाशित केले आहेत. त्यांतील चार लेखांत या देवतेचे अनुक्रमें ( १ ) म्हाळसादेवी, ( २, ३ ) श्रीमहालसा देवी व ( ४ ) श्रीम्हालसा-देवी असे निर्देश आले असून त्या लेखांचीं सालें ( १ ) श. १५४८ ( २, ३ ) श. १५८४ व ( ४ ) श. १६२० अशीं आहेत.[२] महानुभावी वाङ्मयापैकीं शकाच्या १३।१४ व्या शतकांत झालेल्या लीळाचरित्र ग्रंथांत व तदनंतर झालेल्या स्थानपोथींत नेवाशाच्या या देवतेचा निर्देश 'म्हाळसा' असा केला आहे.[३] याचा अर्थ असा कीं, श. १३०० ते १६२० च्या दरम्यान या देवतेस महालसा, म्हाळसा किंवा मदालसा या नावानें संबोधीत. अर्थात् तिचें 'महालया' हें नांव श. १६२० नंतरचें व बहुधा गांवढें किंवा कृत्रिम असावें. पत्रें तत्कालीन असल्यानें त्यांतील प्रयोगा-विषयीं शंका घेण्यास जागा नाहीं. मी शेंकडों देवदेवतांचीं नांवें जुन्या ग्रंथांत वाचिलीं आहेत. पण 'महालया' हें नांव काहीं कोठें माझ्या आढळांत आलें नाहीं.

४. आतां 'महालसा' हें नांव कोणत्या ज्ञानेश्वरींत सांपडतें हें पाहिल्यास राजवाडे आणि माडगांवकरांस सांपडलेली अप्रकाशित या दोनच प्रती अशा आहेत कीं, यांत 'महालसा' असें रूप आलें असून बाकी बहुतेक प्रतींत 'महालया' असें रूप आलें आहे. याचा अर्थ मी असा करतों कीं, राजवाडे व माडगांवकर प्रती श. १३००–१६०० च्या दरम्यानच्या असून बाकीच्या बहुतेक प्रती श. १६०० च्या आगेमागें बनलेल्या आहेत. डॉ. रा. ग. हर्षे यांच्या प्रतींत महालया पाठ असल्यानें तीहि श. १२७२ ची असणें सुतराम् अशक्य आहे. पोथ्यांवर लेखनकाल घातला असला तरी अशी प्रत्येक पोथी लेखनकालीं लिहिली गेली असेलच असें समजण्याचें कारण नाहीं. कित्येकदां प्रतिकार आदर्श पोथी वाचत उतरतो तेव्हां कालनिर्देशहि उतरून घेतो. यामुळें नव्या पोथींतहि जुना कालनिर्देश आढळू शकतो.

---

२. राजवाडे खंड २२, शिवकालीन मराठी ले. २६५, २६६, ३६७, शिवचरित्रसाहित्य खंड ४, ले. ७०२.

३. लीळाचरित्र उत्तरार्ध पृ. ११६, स्थानपोथी पृ. ६६.

५. 'म्हाळसा' या नांवावरून येथें आणली एक मुद्दा सुचतो तो असाः—लीळाचारित्रांत[४] वाळुंज (औरंगाबाद) व नेवासें (अहमदनगर) अशा दोन ठिकाणीं आणि स्थानपोथींत याशिवाय भोगावती किंवा पैठण (औरंगाबाद) व नांदुरा (बीड) अशा आणखी दोन ठिकाणीं म्हाळसेचीं देवस्थानें असल्याचें नमूद आहे. पैकीं नेवाशास म्हाळसेचें देवस्थान असल्याचा पुरावा ज्ञानेश्वरींतच (श. १२१२) मिळाला आहे. तेव्हां म्हाळसा हें दैवत निदान श. १२१२ इतकें जुनें ठरलें.

६. खंडोबास म्हाळसा व बाणा अशा दोन बायका कल्पिल्या असून त्यांपैकीं म्हाळसा मोठी आहे. खंडोबा वयानें म्हाळसेहून मोठा होता कीं लहान? मला वाटतें तो मोठा असावा. म्हाळसा जर श. १२१२ मध्यें खात्रीनें अस्तित्वांत होती तर खंडोबा तिच्या पूर्वींच अस्तित्वांत असणार. पण किती पूर्वीं? अर्थात् त्याचा शोध घेतला पाहिजे.

---

४. पूर्वार्ध खं. २, पृ. ६१, उत्तरार्ध पृ. ११६; स्थानपोथी पृ. ४४, ६६, १६, ५१.

# छंदोभंग टाळण्याचे श्रीमद्भागवतांत योजिलेले कांहीं उपाय

(श्री. य. ग. फफे)

पद्यरचना करीत असतां मध्येंच एकादी मात्रा न्यूनाधिक होऊं लागते आणि तो दोष काढून टाकण्यासाठीं योग्य शब्दांची निवड करण्यांत वेळ मोडणें तर तेव्हां प्रतिभाशाली कवीस शक्य नसतें; त्याला स्फुरेल तो शब्द योजून पुढें जावें लागतें. अशा वेळीं छंदोभंग राहू द्यावा, कीं एकाद्या शब्दाचें रूप थोडें विकृत करावें लागलें तरी करून छंदोभंग टाळून पद्याची चाल सुळ-खून घ्यावी असा प्रश्न उद्भवतो. याचें उत्तर

अपि माषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत् ॥

असें देण्यांत आलें आहे, आणि तेंच युक्त आहे. पद्य म्हटलें म्हणजे तें विशिष्ट चालीवर म्हणतां यावेंच लागतें. त्यांत छंदोभंग राहिल्यास तें कसें साधेल? तेव्हां पद्याची चाल न बिघडावी म्हणून कांहींतरी करून छंदोभंग टाळणें अव-श्यच असतें. त्यासाठीं प्रसंगीं व्याकरणाचे नियमहि धाब्यावर बसविण्यास प्रतिभाशाली कवि कचरत नाहींत. याचें प्रत्यंतर श्रीमद्भागवतावरून दिसून येतें. संस्कृत पौराणिक वाङ्मयांतील श्रीमद्भागवत हा एक अत्यंत सुरस काव्यमय ग्रंथ आहे. चातुर्मास्यांत गांवोगांवीं जीं पुराणें चालतात तीं मुख्यत्वें श्रीमद्भागवतावरच चालतात. अशा या उच्च प्रतीच्या काव्यग्रंथांत छंदोभंग टाळण्यासाठीं कोणते उपाय अवलंबिले आहेत हें पाहणें मोठें कुतूहलाचें होईल यांत शंका नाहीं.

ज्यांत विविध लगक्रम चालू शकतो अशा पद्यप्रकारांत म्हणजे जातींत छंदोभंगाची नड सहसा उपस्थित होत नाहीं. पण ज्यांत अक्षरसंख्येबरोबरच अक्ष-रांचा लघुगुरुक्रमहि निश्चित एकरूप असावा लागतो, अशा पद्यप्रकारांत म्हणजे वृत्तांत स्वाभाविकपणेंच छंदोभंगाची अडचण अधिक प्रमाणांत उत्पन्न होण्याचा संभव असतो. श्रीमद्भागवत हा ग्रंथ वृत्तबद्ध असल्यामुळें त्यांत असे प्रसंग बरेच आढळतात. या ग्रंथाचें मुख्य वृत्त अनुष्टुम् हें आहे. त्याचे खालोखाल त्यांत इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, वातोर्मि, शालिनी इत्यादि अकरा अक्षरी आणि इंद्रवंशा-वंशस्थादि बारा अक्षरी वृत्तांच्या मिश्रणानें झालेली उपजातिरूप रचना आढ-ळते. तिसरा क्रमांक वसंततिलकेचा लागतो. यांशिवाय प्रहर्षिणी, रुचिरा,

स्रग्विणी, भुजगप्रयात, मालिनी, कनकप्रभा, शिखरिणी, मदाक्रान्ता, द्रुतविलंबित, पुष्पिताग्रा इत्यादि अनेक वृत्तांची योजना मधूनमधून रुचिवैचित्र्यार्थ केलेली आढळते. यापैकीं अनुष्टुभात अक्षरसंख्या नियमित असावी लागत असली तरी गणांचे प्रकार विविध चालत असल्यामुळें भागवतातील अनुष्टुभात सांङ्गिकच रचनेच्या अडचणी उद्‌भवल्याचे प्रसंग फारच थोडे आढळतात. भागवतातील उपजातिवृत्तात अकरा, बारा व क्वचित् दहा अक्षरी वृत्तांचें मिश्रण तर असतेंच, शिवाय त्यात चार चरण चार भिन्नवृत्तांचेहि असतात, इतकेंच नव्हे तर ज्या लगक्रमाचीं अकरा-बारा अक्षरी वृत्तें प्रचारात नाहींत अशा लगक्रमानेहि पुष्कळ चरण त्यांत असतात. अशा प्रकारें या प्रथांतील उपजाति अत्यंत स्वैर असून त्या स्वैरतेनेंच छंदोभंगाचे प्रसंग प्रायः टळले आहेत. वसंततिलकावृत्तांत उपजाति करण्याची सोय नसल्यामुळें किंवा कवीनें तशी स्वैरता न स्वीकारल्यामुळें या ग्रंथांतील वसंततिलकावृत्तांमध्यें छंदोभंगाचे प्रसंग सहज दृष्टींत भरतील इतके ठळक व पुष्कळ आले असून कवीनें विविध उपाय योजून तेथील छंदोभंग टाळला आहे. म्हणून प्रथम वसंततिलकांतीलच अशा स्थलांचें अवलोकन करूं. विस्तारभयास्तव श्लोकाच्या अर्थाकडे न वळतां व संपूर्ण श्लोकहि न देतां छंदोभंगाचें स्थळ दिसण्यापुरता एकादा चरण येथें उद्धृत केला आहे. त्यापुढील अंक अनुक्रमें स्कंध, अध्याय व श्लोक यांचे आहेत. त्यांवरून जिज्ञासूंना हीं स्थळें मूळाशीं ताडून पाहतां येतील.

१. ( १ ) सत्रे ममास भगवान् हयशीरपाऽथो ॥ २-७-११

हयशीर्षा हा शुद्ध शब्द. तो योजिल्यास वसंततिलकेंत एक अक्षर कमी पडतें, चरणात चौदा अक्षरें हवींत तीं तेराच भरतात म्हणून हयशीर्षा या शब्दांतील रेफापुढें अकार अधिक घालून हयशीरपा असें विकृतरूप करून येथें छंदोभंग टाळला आहे. रेफ व त्यापुढील ऊष्म व्यंजन यामध्यें स्वर घालून त्या स्वरानें तीं संयुक्त व्यंजनें विभक्त करणें यास स्वरभक्ति असें म्हणतात. हा प्रकार छंदोभंग टाळण्यासाठींच मूळ योजण्यात आला असणार हें स्पष्ट आहे. कवींनीं अडचणीस्तव योजलेल्या असल्या मूळच्या विकृत रूपाना पुढें रूढीनें मान्यताहि मिळू लागीते. श्रीमद्‌भागवतांत स्वरभक्तीचीं उदाहरणें विशेषतः वसंततिलकांमध्यें पुष्कळ आढळतात. पहा —

( २ ) वक्ष स्थलस्परशरुग्णमहेंद्रवाह—॥ २ ७-२५

स्पर्श याचें स्परश असें विकृत रूप करून वृत्त जुळवून घेतलें.

( ३ ) ध्याने स्म नो दरशितं व उपासकानाम् ॥ ३-९-४

( ४ ) शीतोष्णवातवर्षैरिवरेतराभ्च ॥ ३-९-८
वर्षैः याचे ठायीं वरषैः असें विकृत रूप योजिलें.

( ५ ) धर्मोऽर्पितः करिहिचित् भ्रियते न यत्र ॥ ३-९-१३
कर्हिचित् हा शुद्ध शब्द; त्याचें करिहिचित् केलें.

( ६ ) अतर्जलेऽहिकशिपुस्परशानुकूलाम् ॥ ३-९-२०
स्पर्श याचें स्परश करून छंदोभग टाळला.

( ७ ) पौरुनं वपुर्दरशयानमनन्यसिद्धैः ॥ ३-१५-४५
छंदोभंग टाळण्यासाठीं दर्शयान याचें दरशयान केलें.

( ८ ) गोता वृषः स्वरहणेन उपप्लवेन ॥ ३-१६-२३
स्वर्हणेन याचें स्वरहणेन असें विकृत रूप योजिलें.

( ९ ) येनैव मे करशितोऽतिरिरंसयात्मा ॥ ३-२३-११
कर्शितो याचें करशितो केलें.

(१०) मुक्ताश्रयं यरहि निर्विषय विरक्तम् ॥ ३-२८-३५
यर्हि याचें विकृतरूप यरहि.

(११) अर्वाक्पततमरहत्तमनिंदयाऽपात् ॥ ४-७-१५
अर्हत् याची विकृति अरहत्.

(१२) इच्छंति यत्स्परशजं निरयेऽपि नृणाम् ॥ ४-९-९
स्पर्शजं ... स्परशजं

(१३ ) षड्वर्गनंत्रमसुखेन तितीरयंति ॥ ४-२२-४०
तितीर्षन्ति याचें विकृत रूप तितीरषन्ति.

(१४) ते मे न दंडमरहंत्यथ यद्यमीषाम ॥ ६-३-२६
अर्हन्ति ... अरहन्ति

(१५) भूमंडलं सरपपायति यस्य मूर्ध्नि ॥ ६-१६-४८
सर्पपायति ... सरपपायति

(१६) यस्मिन् यतो यरहि येन च यस्य यस्मात् ॥ ७-९-२०
यर्हि ... यरहि

(१७) कामातुरं हरपशोकभयैषणान्तम् ॥ ७-९-३९
हर्ष ... हरष

(१८) तत्तेऽरहत्तम नमःस्तुतिकर्मपूजाः ॥ ७-९-५०
अर्हत्तम ... अरहत्तम

(१९) सिंधुः थिरस्यरहणं परिगृह्य रूपी ॥ ९-१०-१३
अर्हणं ... अरहण

(२०) यर्ह्यंगनादरशनीयकुमारलीला ॥ १०-८-२४
दर्शनीय ... दरशनीय

(२१) आकल्पमार्कमरहन् भगवन् नमस्ते ॥ १०-१४-४०
अर्हन् ... अरहन्

(२२) तन्मूर्धरत्ननिकर स्परशातिताम्र ॥ १०.१६-२६
स्पर्श ... स्परश

(२३) चूतप्रवालबरहस्तनकोत्पलाब्ज— ॥ १०-२१-८
बर्ह ... बरह

(२४) मद्रामकृष्णचरणस्परशप्रमोद: ॥ १०-२१-१८
स्पर्श ... स्परश

(२५) पुण्यानि तत्त्वररुहस्परशप्रमोदाः ॥ १०-३३-२२
स्पर्श ... स्परश

(२६) क्रुद्धो स्वमुष्टिभिरयःस्परशैरपिष्टाम् ॥ १०-७२-३८
स्पर्शैः ... स्परशैः

(२७) पुष्णाति यत् प्रियचिकीरषया वितन्वन् ॥ ११-९-२६
चिकीर्षया ... चिकीरषया

(२८) विंदेत से तरहि सर्वमनीषितार्थम् ॥ १२-८-४४
तर्हि ... तरहि

१०१ वरील सर्व उदाहरणें वसततिलका वृत्तांतील स्वरभक्तीचीं आहेत. याप्रमाणें भागवतात स्वरभक्तीची व इतरहि विकृतींचीं उदाहरणें मुख्यत्वें वसंततिलका वृत्तांत आढळत असलीं व त्यावरून भागवतकर्त्यास वसंततिलका वृत्त जमविणें इतर वृत्तांच्या मानानें थोडें अवघड गेलें आहे असेंहि म्हणतां येण्याजोगें असलें तयापि स्वरभक्तीचा आश्रय इतर वृत्तात करण्याचा प्रसंग त्यास मुळींच आला नाहीं असें मात्र नाहीं.

उदा०—आद्रियन् यरहि संधितवेणु. ॥ १०-३५-१०, हर्षयन् यरहि वेणुरवेण ॥ १०-३५-१२, नर्मदो यरहि कूजितवेणुः ॥ १०-३५-४, मानयन् मलयजस्परशेन ॥ १०-३५-२१ या चार स्वागतांमध्यें, तवाङ्घ्रिरेणुस्परशाधिकारः ॥ १०-१६-३६ या उपेन्द्रवज्रेंत, तस्यारषात्रं धनुपि प्रयुजतः ॥४-११-३ या इंद्रवज्रेंत, (आर्षात्र = आरषात्र). मुकुंदसदरशननिर्वृतेन्द्रिय. ॥१०-७१-२८

या रुचिरेंत, अरहणगुरुपेद रंधणीयो ॥ १-९-४१ या पुष्पिताग्रेंत, दशम अध्याय ८७ श्लोक २४, २८, ३० व ४० या चार अवितथवृत्तांत आणि वर्धमानो वयसयाचे एव एतदकारयम् ॥ १-६-५ या अनुष्टुभांतहि स्वरभक्तीचा आश्रय करून कवीनें छंदोभंग टाळला आहे.

२. छंदोभंग टाळण्यासाठीं रेफापुढें स्वर योजून वर दाखविल्याप्रमाणें जसें एक अक्षर वाढविलें जातें तसेंच एक अक्षर कमी करणें अवश्य असल्यास र-मधील स्वर गाळून म्हणजे र अक्षराचा रेफ करून तें साध्य केल्याचेंहि आढळतें. पहाः—यत्पारमहंस्यमृषयः पदमामनंति ॥ २-७-१०. येथें पारमहंस्य हा शुद्ध शब्द योजिल्यास छंदोभंग होतो. पण पारमहंस्य याचे ठायीं पार्महंस्य असें उच्चारिल्यास तो छंदोभंग टळून वसंततिलका जमते. मराठींतील निभृत प्रकारासारखाच हा प्रकार होय.

३. रेफामुळें मागील -हस्व स्वरास गुरुत्व येत असलें आणि तें छंदोभंग करणारें असलें तर रेफ व पुढील अक्षर यांमिळून होणाऱ्या जोडाक्षराचा उच्चार मराठींतल्या कुऱ्हाड, बऱ्हाड या शब्दांतल्यासारखा हलका करून मागील लघुच येणारें गुरुत्व टाळण्यांत येतें. पहाः—आज्यं दधि त्वमिपु चातुऱ्होत्रम् ॥ ३-१३-३५ ही इंद्रवज्रा आहे. हींतील नववें अक्षर तु हें छंदानुरोधानें लघुच हवें आहे. चातुर्होत्रम् असा शुद्ध ठसठशीत उच्चार केल्यास 'तु'-वर आघात येऊन तो गुरु होणार व छंदोभंग करणार. छंदोभंग न होण्यास येथें चातुऱ्होत्रम् असा मराठींतल्यासारखा हलका उच्चार करावा लागतो. अशींच पुढील उदाहरणें पहाः—

मां चारुशृंग्यऱ्हसिनेवुमनुव्रतं ते ॥ ५-२-१७ ही वसंततिलका आहे. हींतील पांचवें अक्षर ग्य हें वृत्तासाठीं लघुच हवें आहे. शृंग्यर्हसि असा शुद्ध संस्कृत उच्चार केल्यास 'ग्य' गुरु होऊन छदोभंग होतो, तो टाळण्यासाठीं येथें रेफ व पुढील ह मिळून 'ऱ्ह' करून त्याचा मराठींतल्यासारखा हलका उच्चार करणें प्राप्त होतें.

मुक्तिं ददाति कऱ्हिचित् स्म न भक्तियोगम् ॥ ५-६-१७ येथें कर्हिचित् असा ठसठशीत उच्चार केल्यास क गुरु होऊन छदोभंग होतो. तो टाळण्यासाठीं 'कऱ्हिचित्' यांतील जोडाक्षराचा मराठींतल्यासारखा उच्चार करावा लागतो.

त्रुटिऱ्युगायते त्वामपश्यताम् ॥ १०-३१-१५ ही इंदिरा म्हणजेच शुद्ध कामदा आहे. हींतील दुसरें अक्षर टि हें लघुच हवें आहे. त्रुटिर्युगायते असा

शुद्ध संस्कृत उच्चार केल्यास टि गुरु होऊन छंदोभंग होणार. तो टाळण्यासाठीं त्रुटिन्युगायते असा हलका उच्चार करणें प्राप्त होतें.

४. पूर्व लघूस गुरुत्व न देणारे न्य आणि न्ह हे हलके उच्चार करिता येतात, पण रेफापुढें पकार किंवा ऋ स्वर आला असता असे हलके उच्चार करिता येत नाहींत म्हणून मागील ह्रस्वास गुरुत्व यावयास नको असेल तर अशा स्थळीं रेफ अनुच्चारितच ठेवावा लागतो. उदा०—' प्राचीनबर्हिऋभुरंग उत ध्रुवश्च '' ।। २-७-४३ यात ऋ वर रेफ हवा होता पण छंदोभंग टाळण्यासाठीं कवीनें त्याचा लोप केला असेंच कारण येथें टीकाकारानें दर्शविलें आहे. याच रीतीनें ' नाह परायु ऋषयो न मरीचिमुख्या ' यातील ऋवर वास्तविक रेफ हवा. तो छंदासाठीं कवीनें गाळला असें म्हणणें प्राप्त आहे. ' त उत पदाक्रमत्यविगणय्य शिरो निऋते ।। १०-८७-२७. निर्ऋते हा शुद्ध शब्द. पण या अवितथ छंदास ' नि ' लघुच हवी आहे म्हणून ऋ वरील रेफ वरील रीतीनेंच कवीनें गाळला असावा असें म्हणावें लागतें. कृतात्मगारुरर्पिणा भगवन् गृहीत ।। ७ ९-२८ आणि बालेन निष्कर्षयतान्वगुलूखल तत् ।। १०-१०-२७ या दोन उदाहरणातहि रेफामागील अक्षर छंदासाठीं लघुच हवें आहे, तें तसें उच्चारलें जाण्यास त्यापुढील संयुक्ताक्षराचा मराठींतल्यासारखा हलका उच्चार करतां येत नसल्यामुळें त्यांतील रेफ प्राय. अनुच्चारित ठेवणें प्राप्त होतें. भागवताच्या पोथ्यांत हे रेफ दिलेले आढळत असले तरी कवीनें वृत्तसुखार्थ ते गाळले असावे असेंच अनुमान होतें.

५. ऋकारयुक्त अक्षरें हीं जणू काय जोडाक्षरेंच आहेत असें मानून त्यांच्या मागील ह्रस्व स्वरास गुरुत्व दिल्याचींहि कित्येक उदाहरणें भागवतांत आढळतात. पहा —दृग्भिर्हृदि कृतमल परिरभ्य सर्वा ।। १०-८२-३९ हें वसंततिलका वृत्त आहे. यांतील चतुर्थ अक्षर ' दि ' हें गुरु हवें पुढील 'कृ'च्या योगेंच तें गुरु करून येथें छंदोभंग टाळावा लागतो.

देहभृतां देहकृदस्मृतिच्छिदम् ।। १०-८३ ३ या इंद्रवंशेच्या चरणांतील द्वितीयाक्षर ' ह ' यास पुढील ' भृ 'च्या योगें गुरुत्व येतें असें येथें मानावें लागतें.

स्वगृहे ननु जगाद भवानजो नौ ।। १० ८५-२० या वसंततिलकेंतील द्वितीयाक्षर ' ति ' हें ' गृ 'च्या योगेंच गुरु मानिलें आहे.

६. उरस्, सरस्, धनुस् यांसारख्या शब्दांतील अन्त्य सकार गाळून त्यांचीं उर, सर, धनु अशीं रूपें या ग्रंथांत क्वचित् वृत्त जमविण्यासाठीं योजिलेलीं आढळतात. उदा०—

जानूरुमध्योरशिरोधराणाः ॥ ५-१२-५ हा इंद्रवज्रेचा पाद आहे. यांत 'मध्य' या शब्दापुढें 'उरस्' याऐवजीं 'उर' असा शब्द छंदोभंग टाळण्यासाठीं योजिला आहे.

तस्मिन् निदुरुरेऽवात्सीत् भगवान् कपिलः किल ॥ ३-२५-५ यांत सरसि याऐवजीं सरे अशी सप्तमी छंदोभंग टाळण्यासाठींच योजिली आहे.

मौघ्यग्रलर्कशतधन्वनुरंतिदेव-॥ २-७-४४ येथें शतधनुस् हा शब्द वृत्तांत जमेना. तेव्हां त्यांतील सकार गाळून शतधनु असा शब्द कल्पून त्यापुढें अनु हा शब्द जोडला आहे. याप्रमाणें भागवतकार विकृतरूप स्वीकारतात पण छंदोभंग टाळतात हें स्पष्ट दिसून येतें.

७. वृत्तांतील अक्षरसंख्या नियमित राखण्यासाठींही क्वचित् विकृत रूप स्वीकारलेलें आढळतें. उदा०—दुग्धेमामोषधीर्विप्रास्तेनायं स उदारधीः ॥१-३-१४ येथें अदुग्ध हें क्रियापद कवीला योजावयाचें होतें. पण अनुष्टुभाचे चरणांत नऊ अक्षरें होऊं लागलीं तेव्हां कवीनें मुळींच अडून न राहतां अकार गाळून 'दुग्ध' असें विकृत क्रियापदरूप योजून मार्ग सुधारला. कवीची ही पद्धति ध्यानीं घेतली असतां "छंदांस्यनंतस्य शिरो गृणन्ति । दंष्ट्रा यमः स्नेहकला द्विजानि" ॥ २-१-३१ यांत द्विज हा शब्द नपुं० लिंगी कसा योजिला याचा उलगडा होतो. इंद्रवज्रेच्या चरणांत अकरा अक्षरें असतात. 'द्विजाः' योजिल्यानें एक अक्षर कमी पडूं लागलें तेव्हां कवीनें 'द्विजानि' असें नपुंसकलिंग योजून छंदोभंग टाळला हें उघड आहे. आतां या ग्रंथांतील उपदानवी हयशिरा पुलोमा कालका तथा ॥ ६-६-३२ आणि उपदानवीं हिरण्याक्षः क्रतुर्हयशिरां नृप ॥ ६-६-३३ येथें अनुष्टुभांत नऊ अक्षरी चरण कसे योजिले अशी शंका येणें स्वाभाविक आहे. पण येथें कवीचा निरुपाय झाला असावा असें वाटतें. उपदानवी, हयशिरा, पुलोमा व कालका हीं मुलींचीं चार नांवें अनुक्रम राखून अनुष्टुभांत बसवितां येणें अशक्य वाटतें. तसेंच उपदानवी व हिरण्याक्ष हीं वधूवरांचीं नांवें छंदोभंग न होऊं देतां परस्परांसंनिध अनुष्टुभांत बसविणेंहि अशक्यप्रायच होय. योडक्या अडचणीस्तव ओघानें आलेला अनुष्टुम् छंद सोडून अन्य वृत्ताचा आश्रय करण्याचें कवीच्या मनांत येणेंहि अस्वाभाविक वाटतें. तेव्हां कवीनें पुढें आले तसे शब्द योजून आपला मार्ग सुधारला आहे असें स्पष्ट दिसतें.

८. याशिवाय कवीनें 'तिर्यग्जना अपि किमू श्रुम धारणा ये' ॥ २-७-४६ यांतील किमूप्रमाणें न्हस्वाचें दीर्घ; 'औत्तानपादे भगवंस्तव शार्ङ्गधन्वा' ॥ ४-१०-३० यांत 'दे' चा उच्चार वृत्त जमण्यासाठीं तोकडा

एकमात्रात्मक करावा लागतो, याप्रकारें दीर्घाचें ह्रस्व; 'पीयूषमुत्तभितकर्णपुटैः पिबन्त्यः' ॥ १०-२१-१३ यांत उत्तंभित याचें उत्तभित केलें. याप्रकारें अनुस्वाराचा लोप इत्यादि आणखीहि कित्येक उपाय केवळ छंदोभंग टाळण्यासाठीं क्वचित् अवलंबिलेले आढळतात.

छंदोभंग टाळण्यासाठीं श्रीमद्भागवतांत योजिलेल्या विविध उपायांची कल्पना येण्यास हीं एवढीं उदाहरणें पुरेशीं आहेत असें म्हणावयास प्रत्यवाय वाटत नाहीं. व्याकरणदृष्ट्या असलीं स्थलें सदोष ठरणारीं असलीं तरी त्याची क्षति न धरितां कवीनें आपल्या काव्याचा ओघ अखंड राखिला असून त्यांत अनेकविध गुणसमुच्चय इतका खच्चून भरला आहे कीं, या ग्रंथाच्या योग्यतेस व लोकप्रियतेस अल्पहि वैगुण्य वरीलसारख्या स्थलांनीं आलेलें नाहीं हें कोणासहि मान्यच होईल.



# विद्यार्थ्यांच्या शिक्षणांत धर्माचें स्थान

( श्री. पां. श्री. आपटे )

पन्नास वर्षांपूर्वी विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमांत धर्माला स्थान असावें कीं नसावें यावर महाराष्ट्रांतील गणितशास्त्रज्ञ व फर्ग्युसन कॉलेजचे ख्यातनाम प्राचार्य रँग्लर परांजपे व केसरीकार लो. टिळक यांच्यामध्यें बराच वाद चालला होता. रँ. परांजपे यांनीं ईस्ट ॲंड वेस्ट या नांवाच्या इंग्रजी मासिकांत असा विषयावर एक लेख लिहिला होता. व त्यांत असें प्रतिपादिलें होतें कीं "विद्यालयांत किंवा महाविद्यालयांत धर्मशिक्षण देण्याची आवश्यकता नाहीं. नीतिशिक्षण दिलें म्हणजे पुरे. हल्लीं ज्याला धर्म म्हणून म्हणतात त्याच्या आचारांत पुष्कळ अनिष्ट गोष्टी शिरलेल्या आहेत व कांहीं गोष्टी हल्लींच्या विज्ञानशास्त्राच्या कसोटीस उतरत नाहींत. धर्मशिक्षणामुळें मुलें धर्मवेडीं होण्याचा संभव आहे. हें वेड एकदां राष्ट्रांत पसरलें म्हणजे आवरतां आवरतां पुरेवाट होईल व मग एकराष्ट्रीयत्वाची भावना पसरविण्यास अडचण होईल. म्हणून सामान्य नीतिशिक्षणावरच आपण भर द्यावा," अशा अर्थाचें विवेचन रँ. परांजप्यांनीं आपल्या लेखांत त्यावेळीं केलें होतें.

यावर लो. टिळकांनीं केसरींत कडकडून हल्ला चढविला व असें प्रतिपादिलें कीं, "नीतीला शेवटीं आधार धर्माचाच आहे. तेव्हां धर्मशिक्षणाची उपेक्षा करणें म्हणजे नीतिशिक्षणाचा आधारच काढून घेतल्यासारखें होणार आहे. म्हणून आपण शाळेंत अथवा महाविद्यालयांत धर्मशिक्षणाची उपेक्षा करतां कामा नये."

हा वाद कांहीं काळ चालून नंतर थंड पडला. यानंतर वंगभंगाच्या चळवळींतून १९०५ सालीं राष्ट्रीय शिक्षण देण्याची चळवळ ज्यावेळीं निघाली त्या वेळीं प्रो. विजापूरकरांनीं तळेगांवास स्थापन केलेल्या आपल्या समर्थ विद्यालयांत धर्मशिक्षणाचा अंतर्भाव केला. पुढें या संस्थेचें रूपांतर नवीन समर्थ विद्यालयांत झाल्यावर चालक व कांहीं शिक्षक आणि प्रो. विजापूरकर यांच्यामध्यें धर्मशिक्षण देण्याच्या पद्धतींत मतभेद होऊन कांहीं जणांनीं समर्थ विद्यालय सोडलें. १९२१ सालीं असहकारितेच्या आंदोलनांत राष्ट्रीय शिक्षणास पुनः चालना मिळाली. त्यावेळीं आमच्या राष्ट्रीय विद्यालयांत धर्मशिक्षण देण्याची कल्पना निघाली आणि टिळक विद्यापीठानें वे. शा. सं. दिवेकरशास्त्री यांच्याकडून धर्मशिक्षणाचीं दोन पुस्तकें तयार करवून घेतलीं. पण त्या पुस्त-

काचा प्रचार व्हावा तसा राष्ट्रीय विद्यालयांतसुद्धा झाला नाहीं. राष्ट्रीय शाळांतून प्रार्थना, कधीं कधीं गीतापाठ आणि कांहीं धर्मोत्सव होत असत. नमस्कार घालायला मुलांना लावीत असत. शिवाय दासबोधांतील कांहीं वेंचे, तुकारामाचे अभंग, कांहीं स्तोत्रें पाठ करवून घेतलीं जात असत. रामायण-महाभारतातील कथाहि सांगितल्या जात. पण त्या काळांत राष्ट्रीय शाळांचें सर्व लक्ष पायाशुद्ध धर्मशिक्षण देण्यापेक्षा स्वातंत्र्य-संपादनावर केंद्रित झालें होतें. आणि त्याचीच जोपासना विद्यालयात सुरू होती. सूर्यनमस्कार पुढेंपुढें मागें पडून जोडजोडी, लाठी, कवायत यावर भर देण्यात येऊं लागला. उत्सवातून धर्मचर्चेपेक्षा स्वातंत्र्यसंपादनास लागणाऱ्या राष्ट्रीय भावनेची वाढ होत गेली. गणेशोत्सवातील एका व्याख्यानात व्याख्यात्यांनीं रामदासाची सुप्रसिद्ध ओवी प्रवचनास घेतली होती —

आधीं हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।।

व्याख्यात्यांनीं 'आधीं हरिकथानिरूपण' या प्रथम चरणाचा नुसता उच्चार केला व दुसऱ्या चरणावर म्हणजे राजकारणावर आपली सर्व विवेचनशक्ति खर्च केली. एवंच काय, त्या काळीं आमच्या सर्व चळवळीचा भर स्वातंत्र्यप्राप्तीवर होता. त्यामुळें राष्ट्रीय शिक्षणात धर्मशिक्षणाचा अंतर्भाव होऊनहि त्याच्यावर भर दिला गेला नाहीं. अशी त्यावेळीं परिस्थिति होती. म. गांधींनीं मात्र या विषयाकडे यत्किंचितहि दुर्लक्ष केलें नाहीं व धर्मशिक्षणावर आपल्या आश्रमांत पुष्कळ भर दिला. प्रार्थना, गीता, यांच्या मार्गानें ते स्वराज्यसैनिकांस धर्मशिक्षण देत असत. प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं, मग तो प्रसंग तुरुंगांत जाण्यासाठीं प्रस्थान ठेवण्याचा असो किंवा कांहीं राजकीय कारणामुळें उपवास सुरू करण्याचा असो, त्या त्या वेळीं महात्माजी गीतापाठ व प्रार्थना केल्याशिवाय रहात नसत. आणि ही प्रार्थना एकांतांत बसून न करतां पुष्कळ वेळां सार्वजनिक जागेंत हजारों लोकांसमवेत करीत असत.

रघुपति राघव राजाराम । पतीत पावन सीताराम ।।
ईश्वर अल्ला तेरे नाम । सबको सन्मति दे भगवान ।।

हें भजन त्यांनीं प्रचारात आणलें. विलायतेंत गेल्यावरहि गांधींची सार्वजनिक प्रार्थना बंद पडत नव्हती. या प्रार्थनेस त्यांनीं तेरा व्रतांच्या आचरणाची जोड आपल्या आश्रमीय जीवनांत कटाक्षानें दिली. परंतु गमत अशी कीं, आम्ही मंडळींनीं गांधींच्या धार्मिक वृत्तीपेक्षा त्यांची राष्ट्रीय जळजळीत भावनाच अधिक उचलून धरली. त्यांच्या प्रार्थनेंत आम्हीं सामील होत होतों. अहिंसेचा पुरस्कार करीत होतों. परंतु आमचें सर्व लक्ष देश कसा स्वतंत्र करायचा यावर

केंद्रित झालें होतें. ज्या लोकांनीं गांधींच्या सत्य-अहिंसेचें आणि प्रार्थनेचें रहस्य बरोबर ओळखलें होतें आणि त्याप्रमाणें जे वागण्याचा प्रयत्न करीत होते अशी मंडळी, त्यांच्या अनुयायांत अगदींच थोडी होती. व अशा मंडळींना सर्वसामान्यपणें राष्ट्रीय वृत्तीची मडळी थोड्याशा आदरानें जरा दूरच ठेवीत असत. एवंच काय, गांधींच्या चळवळींत धर्मशिक्षणास मोठें स्थान असूनहि तें आमच्या देशाभिमानी तरुणांनीं करावें तितकें आत्मसात् केलें नाहीं. गांधींना हें दिसत होतें पण त्यांचा त्याला इलाज नव्हता असें त्यांच्या ' मेरा कौन सुनता है ! ' अशा उद्गारांवरून दिसून येत होतें.

आज स्वराज्य संपादन झालें आहे. सुराज्य कसें होईल याची चिंता सर्वांनाच लागली आहे. स्वातंत्र्य मिळाल्यावर काळा बाजार, लांचलुचपत, दरोडे, खून, इ. गोष्टींना चोहोंकडे ऊत आला आहे. यामुळें जनतेचें लक्ष पुनः नव्या पिढीच्या धर्मशिक्षणाकडे वळलें आहे. म्हणून या विषयाच्या चर्चेला आज महत्त्व आलें आहे.

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, आम्ही हिंदू लोक धर्माचारावर अधिक भर देतों आणि व्यवहाराकडे दुर्लक्ष करतों. परंतु प्राचीन ग्रंथ पाहिले म्हणजे अशी स्थिति नाहीं असें दिसून येतें. धर्मशिक्षणांत कर्मकांडाचा जो अंतर्भाव केलेला आहे तो पुरोहित वर्ग, धर्मशास्त्राचा अभ्यासी असा जो ब्राह्मणवर्ग त्यांच्याकरितां .प्रामुख्यानें सांगितलेला दिसतो. इतर वर्गांकरितां जे नित्याचे म्हणून धर्माचार सांगितले आहेत ते थोडे आहेत. आमच्या पुराणांतील राजे लोक कांहीं स्नानसंध्या वेदपठण यांत सारा दिवस घालवीत नव्हते. स्नानसंध्या, देवपूजा, या गोष्टी ते करीत. पण या सूर्योदयाच्या कालातच उरकल्या जात. श्रीरामदासांनीं मनुष्यानें सकाळपासून संध्याकाळपर्यंत कसें वागावें यावर दासबोधांत एक समास लिहिला आहे. त्यांत धर्मकर्म उरकून आपला व्यवहारधंदा पहावा असें म्हटलें आहे. असो. आपल्या ऋषींचा मोठा कटाक्ष जर कोणत्या गोष्टीवर असेल तर तो अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांची धर्मापासून फारकत करूं नये, यावर होता. म्हणून आमच्या मुलांच्या धर्मशिक्षणांत या गोष्टीवर शिक्षक व पालकांनीं भर द्यावयास पाहिजे. काम या शब्दांत भावना आणि इच्छा यांचा अंतर्भाव होतो. म्हणून आमच्या मुलांच्या आकांक्षा या धर्माला कशा धरून रहातील हें आपण बारकाईनें पाहिलें पाहिजे. समाजाच्या हिताविरुद्ध अशी कोणतीहि आकांक्षा मुलांनीं धरता कामा नये. आपले सर्व उद्योग, द्रव्यसाधन हें समाजहिताच्या विरुद्ध असतां कामा

नये, त्याचप्रमाणें आपल्या मुलांच्या भावनांनाहि अधिक अधिक उन्नत वळण कसें मिळेल हें शिक्षकांनी पाहिलें पाहिजे. स्वदेशाभिमानाची भावना वाढवली पाहिजे यांत बिलकूल संशय नाहीं. परंतु आपला देशाभिमान हा पाश्चात्यांच्या देशाभिमानाप्रमाणें दुसऱ्या देशांना उपद्रवी होतां कामा नये, हें मुख्य सूत्र लक्षांत ठेवून धर्मशिक्षणाची आंखणी आपल्याला करावयास हवी.

समाजाचें धारण पोषण ज्यायोगें होतें तो धर्म. धर्म हा ऐहिक व पारलौकिक कल्याण साधून देतो, असें आपल्या शास्त्रांत जें लिहिलें आहे तें आपल्याला पाठ आहे. परंतु हे विचार सत्यसृष्टींत आणतांना आपण त्याची हेळसांड केली आहे. इंग्रज राज्यकर्ते धर्मशिक्षणाबाबत उदासीन होते. त्यांनी आपल्याला धर्मशिक्षण तर राहोच पण सामान्य नीतिशिक्षणहि दिलें नाहीं. इंग्रजी शिक्षणांत तयार झालेल्या विद्वानांच्या हातीं शिक्षणसंस्था आल्या. ह्या संस्थांत मुलांच्या परीक्षा उत्तीर्ण कशा होतील याचीच काळजी वाहिली जात आहे. गृहस्थाश्रम स्वीकारल्यावर सर्व भर द्रव्यसाधनावर आम्ही देत आलों. मग तें द्रव्य आम्ही कसें मिळवतों याचा विचार केव्हांहि केला नाहीं व पुढच्या पिढीनें तो करावा अशीहि काळजी घेतली नाहीं. त्यामुळे आज समाजबंधनें शिथिल होऊन त्याचे घोर परिणाम आपण भोगीत आहोंत. तेव्हां धर्मशिक्षणाची आवश्यकता आहे यांत फारसा मतभेद होणार नाहीं. प्रश्न आता असा उत्पन्न होतो कीं तें कसें द्यावयाचें ? पाश्चात्य देशांतील सरकार आपल्या सरकारप्रमाणेंच तत्त्वत: नसलें तरी व्यवहारांत पुष्कळसें ऐहिक (Secular) असतें. परंतु तिकडे विद्यालयाबाहेर अशा अनेक संस्था आहेत कीं जेथें या शिक्षणाची जोपासना उत्तम होते. त्यांच्या चर्चमध्यें दर रविवारीं प्रार्थनेच्या वेळीं धर्मोपदेश केला जातो. संडे स्कूल्समध्यें धर्मशिक्षण दिलें जातें. शिवाय घरीं आईबाप मुलांना शिक्षण देतात तें वेगळेंच. त्यांच्याकरितां धर्मकथांचीं पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. त्यांतून सुंदर धर्मतत्त्वें ग्रथित केलेल्या गोष्टी सांगितल्या आहेत. त्या आईबाप आपल्या मुलांना निजतांना सांगतात.

आपण आतां पूर्वीच्या चांगल्या गोष्टींचा पुनश्च अंगिकार केला पाहिजे. सकाळीं लवकर उठणें, प्रातर्विधि आटोपून, स्नान केल्यावरच मुलांनी फलाहार करणें, ह्या गोष्टी आईबापांनीं मुलांना कटाक्षानें शिकविल्या पाहिजेत. आपली मुलें चुकून देखील खोटें बोलत नाहींत हें आईबापांनीं शाळेत पहावें, शाळेंत मास्तर किती पहाणार ? सत्यकथन करणाऱ्या मुलास चुकीबद्दल शिक्षा करू नये; म्हणजे मुलें शिक्षेच्या भीतीनें खोटें बोलणार नाहींत. मुलें हीं स्वभावतःच स्वार्थी असतात म्हणून त्यांच्यांत उदारता ही प्रथम तरी आचारानेंच उत्पन्न

करावी लागेल. खाद्यपदार्थ मुलांकडून सर्वांना वांटावे आणि नंतर मग त्यांना द्यावें. घरांतील नोकरचाकरांशीं मुलें उद्धटपणानें वागणार नाहींत, असें वळण मुलांना आईबापांनीं लावावें. घर आपलें आहे, त्यांतील प्रत्येक वस्तूला घरांतील सर्व माणसांनीं जपलें पाहिजे ही गोष्ट मुलांत जर बिंबली तर ते चांगले नागरिक बनण्यास अडचण पडणार नाहीं. वडीलधाऱ्यांविषयीं आदर, ईश्वरभक्ति आणि कांहीं शिष्टाचार हे घरींच शिकवावे म्हणजे शाळेंतील धर्मशिक्षण सुलभ जाईल. मुलांकडून मधूनमधून आपल्या पुराणांतील ध्येयवादी कथा वाचून घ्याव्या व त्यांचें रहस्य वयाप्रमाणें सांगत जावें. पण अडचण ही आहे कीं आमचे पुष्कळसे पालक असें शिक्षण देण्यास लायक आहेत काय? ते सत्यवादी शीलसंपन्न अल्प प्रमाणांतच आहेत. अशा स्थितींत मुलांना धर्मशिक्षण मिळणार कसें!

हल्लीं हिंदीचे, संस्कृतचे, मराठी साहित्याचे वर्ग लहानमोठ्या गांवांतून चालू आहेत. आपला अभ्यास संभाळून या वर्गांत मुलें मोठ्या हौसेनें जातात. तेव्हां धर्मशिक्षणाचा वर्ग जर आपण काढला व तो जर वर्ग आठवड्यांतून एकदां किंवा दोनदां ठेवला तर विद्यार्थी मिळण्यास अडचण पडणार नाहीं.

धर्मशिक्षण म्हणजे काय, नीतीचा पाया धर्म कसा आहे, तें विद्यालयांत कोणत्या पद्धतीनें द्यावें, तें सक्तीचें असावें काय, त्यांत तात्त्विक चर्चा, फक्त असावी कीं कांहीं आचारात्मक शिक्षण द्यावें या विषयाची चर्चा करून निर्णय घेण्याकरितां जर एकादी शिक्षणतज्ज्ञ आणि थोर समाजसेवक यांची परिषद बोलावली तर त्या चर्चेला इतके फांटे फुटतील, कीं त्यांतून कांहीं उपयुक्त असें निघणार नाहीं व मतामतांच्या गलबल्यांत परिषद विसर्जन पावेल. म्हणून असें कांहीं न करितां ज्यांना या विषयाची आस्था असेल व विवादापेक्षां प्रत्यक्ष कृतीवर जे जोर देणारे असतील अशा थोड्या लोकांनीं एकत्र येऊन धर्मशिक्षणाचा अभ्यासक्रम आंखावा व कार्यास खाजगी प्रयत्नानें एकदम आरंभ करून ह्या राष्ट्रीय कार्यास प्रथम चालना द्यावी. धर्मशिक्षणाची दिशा अशा वर्गांतून अनुभवानें निश्चित झाल्यावर सार्वजनिक शिक्षणसंस्थांच्या अभ्यासक्रमांत त्याचा अंतर्भाव सुलभतेनें होऊं शकेल.

# ऋग्वेदांतील मुद्गल व मुद्गलानी

(प्रा. व. ग राहूरकर)

ऋग्वेदांतील सूक्तद्रष्ट्या ऋषींचा वाशिक, सामाजिक व राजकीय इतिहास या दृष्टीनें ऋग्वेदसंहिता व परंपरा यांचा संशोधनात्मक अभ्यास करण्याचे प्रयत्न आजपर्यंत फारच थोडे झाले आहेत ऋग्वेदसंहिता ही प्रामुख्यानें ‘स्तोत्रसंग्रह’ स्वरूपाची आहे हें जरी खरें असलें तरी इतर धर्मग्रंथाहून तिची उपयुक्तता अधिक आहे कारण भारताच्या सांस्कृतिक इतिहासातील एक अत्यंत महत्त्वाचा कालखंड ऋग्वेदात चित्रित केला गेला आहे. वेदोत्तरकालीन परंपरेनें देखील ऋषिज्ञानास महत्त्व दिलें आहे[१] आधुनिक साहित्यसमीक्षणशास्त्रदृष्टयाहि प्रयकर्त्यांचें जीवन व तत्कालीन परिस्थिति यांचा अभ्यास हा त्याच्या वाङ्मयाचें यथायोग्य परिशीलन करण्यास अत्यंत आवश्यक आहे सामाजिक इतिहास या दृष्टीनेंहि ऋषींच्या चरित्राचा अभ्यास महत्त्वाचा आहे हें सांगावयास नकोच कारण ऋग्वेद हें वेदकालीन आर्यांचें अत्यंत प्राचीनतम असूनहि सुस्थिर्वीत असलेलें असें वाङ्मय आहे. त्यामुळें साहजिकच त्यात विविध संस्कृतींचे भिन्नभिन्नकालीन अवशेष सांठविले गेले आहेत त्यांतूनच भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचें सुसंगत चित्र आपणांस दिसू शकतें म्हणूनच सूक्तद्रष्ट्या ऋषींच्या चरित्रांचें संशोधन करणें, वेदोत्तरकालीन रामायण महाभारत व पुराणें इत्यादि ग्रंथातून मांच्यासर्वा आलेल्या माहितीची सांगड घालून दाखविणें आणि अशा रीतीनें भारताच्या सांस्कृतिक इतिहासाची सुसंगत पुनर्रचना करून दाखविणें हें अत्यंत आवश्यक आहे पुणें विद्यापीठाचे संस्कृतविभाग प्रमुख डॉ रा ना दांडेकर यांचें याबाबतीचें मत सुस्पष्ट आहे[२] तसेंच त्याच्या गौरवग्रंथासाठीं हा लेख लिहिण्याची

१. अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च।
योऽध्यापयेज्जपेद्वापि पापीयाञ्जायते तु सः ॥—वैदिक संशोधन मंडळाच्या सायणभाष्यसहित ऋग्वेदसंहितेचा पहिला भाग, पृष्ठ ३२.

२ भारतीय इतिहास परिषदेच्या मुंबई येथील दहाव्या अधिवेशनांतील प्राचीन इतिहास विभागाचें अध्यक्षीय भाषण.

संपे मला मिळाली त्या विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्रावांचेंहि[३] मत वरील विधानाला उपोद्धलकच आहे. अशा तऱ्हेच्या संशोधनांतून निघालेल्या माहितीच्या आधारें ऋग्वेदकाल हा प्रागैतिहासिक काल व वेदोत्तरकाल या कालशृंखलेंतील एक महत्त्वाचा दुवा आहे–तो निराधार कालखंड नव्हे–हेंहि आपोआपच सिद्ध होईल. याच दृष्टिकोनांतून ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील १०२ व्या सूक्ताचा व त्याचे द्रष्टे मुद्‌गल व मुद्‌गलानी या दाम्पत्याच्या चारित्र्याचा संशोधनात्मक अभ्यास या लेखांत करावयाचा आहे.

या सूक्तांत मुद्‌गल व मुद्‌गलानी यांच्यासंबंधीची एक कथा त्रुटित स्वरूपात सांगितली आहे; त्यामुळें कथेची संपूर्ण पार्श्वभूमि प्रथम समजून घेणें इष्ट आहे. वेदोत्तरकालीन टीकाकार व भाष्यकार उदा०—सर्वानुक्रमणीकार कात्यायन, बृहद्देवताकार शौनक, निरुक्तकार यास्क, त्याचप्रमाणें वेदभाष्यकार सायण, निरुक्तभाष्यकार दुर्ग व सर्वानुक्रमणीभाष्यकार षड्‌गुरुशिष्य यांचीं या कथेसंबंधींचीं मतें प्रथम पाहिलीं पाहिजेत.

कात्यायनाच्या मतें ही कथा पुढीलप्रमाणें आहेः—एकदां मुद्‌गलाचें सर्व गोधन चोरांनीं पळवून नेलें. फक्त एक म्हातारा बैल तेवढा शिल्लक ठेवला. तेव्हां त्यालाच गाडीला जुंपून व दुसऱ्या बैलाच्या जागीं एक लाकडी ठोकळा (द्रुघण) जोडून त्यानें चोरांचा पाठलाग केला. त्या लाकडी ओंडक्यानें मार्गदर्शनाचें काम केलें व मुद्‌गलानें चोरांपासून आपलें गोधन परत मिळविलें. यावर भाष्य करतांना षड्‌गुरुशिष्य म्हणतो कीं गाडी सुव्यवस्थित चालविण्याचें काम द्रुघणानें केलें, शौनकाच्या मतें[४] भार्म्यश्व मुद्‌गलानें रथाला एकीकडे बैल व एकीकडे ऐन्द्र द्रुघण जोडून युद्धामध्यें इन्द्र व सोम यांच्यावर विजय मिळविला. यास्क म्हणतो[५] कीं ऋषि भार्म्यश्व मुद्गल रथाला द्रुघण व बैल जोडून रणांगणा-

---

३. "भारतीयांनीं प्राणापलीकडे जपून ठेवलेलीं वेद व पुराणें हीं केवळ भाकडकथांनीं भरलेलीं नसून त्यांत इतिहासादिकांचे सुवर्णकण भरपूर आहेत व त्यांवरून प्रामाणिक इतिहास घ्यानीं येऊं शकतो, असें आता निश्चित वाटूं लागलें आहे."—प्राचीन चरित्रकोश, प्रस्तावना, पृष्ठ १.

४. बृहद्देवता ८-११-१२. यांतील ११ व्या श्लोकांत शाकटायन, यास्क व शौनक यांच्या मतें हें सूक्त अनुक्रमें इतिहाससूक्त, द्रौघण किंवा ऐन्द्रसूक्त व वैश्वदेवसूक्त आहे असें सांगितलें आहे.

५. निरुक्त ९·२३.

वर रथस्पर्धेत भाग घेण्यासाठीं गेला. यावर भाष्य करतांना दुर्ग म्हणतो कीं रथाला जोडण्यास दुसरा बैल नसल्यामुळें मुद्गलानें रथाला द्रुघण जोडला व आपल्या दैवी सामर्थ्यानें त्या द्रुघणाच्या साहाय्यानें त्यानें रथस्पर्धेत भाग घेणाऱ्या राजावर जय मिळविला. सायणाचार्यांनीं शौनकाचेंच मत ग्राह्य मानलें आहे. म्हणजे यास्क व दुर्ग यांच्या मतें हें रथस्पर्धासूक्त असून इतरांच्या मतें हें संग्रामसूक्त आहे.

येथें कांहीं पाश्चात्य संशोधकांचींही मतें विचारांत घेणें जरूर आहे. गेल्डनर[६] म्हणतो कीं हें सूक्त म्हणजे केवळ कल्पनावडंबर आहे. त्याच्या मतें ही कथा अशी आहे—" मुद्गल नांवाचा एक वृद्ध मनुष्य रथस्पर्धेत भाग घेतो. मात्र त्याच्याजवळ रथ नसून बैलगाडी असते व बैलाची जोडीही त्याच्याजवळ नसल्यामुळें गाडीला दुसऱ्या बैलाऐवजीं तो द्रुघण जोडतो. हा द्रुघण (लाकडी ठोकळा किंवा लाकडी बैल) दोन कामें करतो—एक अंतर तोडण्याचें व दुसरें, स्पर्धेत भाग घेणाऱ्या इतरांना रडवून काढण्याचें! मुद्गल हा स्वतः अतिशय वृद्ध असल्यामुळें त्याची तरुण, धाडसी बायको इन्द्रसेना (किंवा मुद्गलानी) स्वत च गाडी हांकते व स्पर्धेत विजयी होते."

म्हणजे प्राध्यापक गेल्डनर यांच्या मतें ही एक कपोलकल्पित रथस्पर्धेची कथा आहे. याच्याहि पुढें जाऊन ते म्हणतात कीं आधुनिक 'रेस'चें सर्व वातावरण यांत आहे. चारित्र्यहीन, स्त्रैण, टर्फवरील गुंड (Turf-men) व त्यांचें अश्लील बोलणें आणि धाणेरड्या कोट्या, 'रेस'मध्यें भाग घेणाऱ्या इतर स्पर्धकाची लांडीलबाडी आणि त्यांनीं यौवनानें मुसमुसणाऱ्या पण विजोड पति मिळालेल्या मुद्गलानीविषयीं केलेले ओंगळ थट्टाविनोद या गोष्टी देखील प्राध्यापकमहाशयांना ऋग्वेदांतील या सूक्तांत दिसल्या. स्वतःच्या कल्पना भांडारांतून त्यांनीं बराच मालमसाला कथेंत मिसळून ती रमग व चुरचुरीत करण्याचा प्रयत्न केला आहे.

आतां प्राध्यापक पिशेल (वेदिश स्टूडियन् १·१२४) काय म्हणतात पहा—

" मुद्गल व मुद्गलानी हे रथाच्या शर्यतींत भाग घेतात. रथाला रेडे जोडलेले असतात केशी नांवाचा एक स्पर्धक आपल्या रथाच्या रेड्यांना मोठमोठ्यानें ओरडून प्रोत्साहन देत असतो या शर्यतींत मुद्गलाला जय मिळाला; *कारण स्पर्धकाच्या रेड्यांपैकीं एक खूप पाणी प्याल्यामुळें मध्येंच थांबला व दुसरा खालीं पडला.*"

---

६. वेदिश स्टूडियन् १-१३८, २ १-२२.

म्हणजे पिशेल व गेल्डनर यांच्या मतें या सूक्तांत आधुनिक सुधारलेल्या जगांतील समाजाचें एक चित्र आहे आणि त्यांचें हें संशोधन त्यांनीं असा कांहीं थाटांत मांडलें आहे कीं विसाव्या शतकांत देखील इतका सुधारलेला समाज आहे कीं नाहीं अशी शंका वाटावी! पण याविषयीं संशोधनक्षेत्रांत नुकतेंच पदार्पण केलेल्या माझ्यासारख्या व्यक्तीचें मत ग्राह्य वाटणार नाहीं म्हणून आणखी एक पाश्चात्य पंडित प्रा. ब्लूमफील्ड याना देखील कसा सात्त्विक संताप आला आहे हें त्यांच्याच शब्दांत सांगणें युक्त ठरेल. ते म्हणतात, "असा अर्थ लावणें म्हणजे वेदाच्या वेदत्वाकडेच डोळेझांक करणें होय." ७

वास्तविक या सूक्ताचें बारकाईनें परिशीलन केल्यास या सूक्तांत रथांच्या शर्यतीचा[८] मागमूसहि नाहीं असें दिसून येईल.[९] या सूक्तांतील तिसऱ्या ऋचेंत आलेले 'जिगीवतः', 'वज्रम्', 'वधम्' इत्यादि शब्द व चौथ्या ऋचेंत आलेला 'पृतनाज्येषु' हा शब्द यांतून रथस्पर्धेचें चित्र दिसत नसून संग्रामाचेंच वातावरण ध्वनित होत आहे. तेव्हां वरील प्राध्यापकद्वयानें वाङ्मयांत मिळणारा सर्व पुरावा विचारांत न घेतल्यामुळें त्यांच्या संशोधनाचा सर्व डोलारा डळमळीत पायावर आधारला गेला आहे असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें.

प्रा. ब्लूमफील्ड यांच्या मतें हें एक संग्रामसूक्त आहे आणि प्रस्तुत लेखकाला त्यांचें हें मत मान्य आहे. या सूक्तांतील बृहतीवृत्तांतील तीन ऋचांमध्यें कोणीएक पुरोहित इंद्राला आवाहन करीत आहे व त्याच वेळीं मुद्गलाच्या पराक्रमाचें वर्णन करीत आहे. म्हणजे ब्लूमफील्डच्या मतें हें एक ऐन्द्र कथासूक्त आहे. तसेंच यांतील इन्द्रसेना (मुद्गलानी) म्हणजे इंद्राच्या शस्त्राचें स्त्रीरूप व म्हणूनच मुद्गल म्हणजे इंद्राच्या शस्त्राचें पुरुषरूप होय. द्रुघण हेंहि इंद्राचें शस्त्र होय असें त्यांचें म्हणणें. ब्लूमफील्डसाहेबांच्या या संशोधनाचा उत्तरभाग हा मनाची पकड घेऊं शकत नाहीं. इतिहाससूक्तांत 'इतिहास' दडलेला असतो. तो शोधून काढण्याऐवजीं त्याचा काल्पनिक, प्रतीकात्मक अर्थ लावण्याचें खूळ आतां बऱ्याच अशानें कमी होत असून ऋग्वेदांतील आख्यान-

---

७ ZDMG. Band 48, p. 544 "Here the very *Vedatvam* of the veda is lost sight of."

८. 'आजि' याचा अर्थ केवळ 'स्पर्धा' असाच नसून 'शस्त्रयुद्ध' असाही त्याचा अर्थ होतो.

९. माझ्या दृष्टीनें या सूक्ताचा अर्थ मीं या लेखांत अन्यत्र दिला आहे.

सूक्तातहि काहीं ऐतिहासिक सत्यें आहेत या विचाराला अलीकडील संशोधनांत प्राधान्य मिळत चाललें आहे ही समाधानाची गोष्ट आहे.

पाश्चात्य संशोधकांपैकी आणखी एका संशोधकाचें मत विचारांत घ्यावयाचें आहे तें म्हणजे प्रा. फोन ब्राड्क[१०] यांचें. ते म्हणतात—

"श्रीयुत मुद्गल व श्रीमती मुद्गलानी आणि त्यांची वैशिष्टयपूर्ण बैलगाडी यासवधींचें हें सूक्त म्हणजे एक उपरोधपूर्ण विडम्बन काव्य असून मुद्गल नावाच्या एका गरीब्या शेतकऱ्याला[११] अगदीं अनपेक्षितपणें, साधनांची प्रतिकूलता असतांना रथस्पर्धेंत कसा जय मिळतो व सर्व लोक कसे आश्चर्यचकित होतात याचें हें गमतीदार वर्णन आहे."

ऋग्वेदांतील एकादें कथासूक्त हें 'अरेबियन नाइट्स' मधील कथाप्रमाणें एक काल्पनिक कथाकथन आहे असें ठोकून देणें म्हणजे संशोधनशास्त्राचा अपमान करणें होय. गेल्डनेर, पिशेल व ब्राड्क यानीं ऋग्वेदांतील मंत्रावर अगदीं आधुनिक विसाव्या शतकांतील सुधारणेचीं नमुनेदार चित्रें लादण्याचा जो प्रयत्न केला आहे तो सत्यापलाप होय. या पंडिताच्या चिकाटीचें, पद्धतशीर संशोधनाचें, भाषाशास्त्रीय ज्ञानाचें व नि स्वार्थी परिश्रमाचें कोणीही कौतुकच करील, पण भारतीय परंपरा व भारतीय संस्कृति यांच्या अंतरंगाचें असावें तितकें ज्ञान नसल्यामुळें त्यांच्या हातून घडलेलें प्रमादशील संशोधन मात्र आतां तपासून घेतलें पाहिजे आणि यासाठीं आधुनिक पद्धतीनें तयार झालेल्या आणि परंपरा आणि संस्कृति यांचें ज्ञान असलेल्या भारतीय संशोधकानीं आळस झाडून संशोधन कार्यास वाहून घेतलें पाहिजे प्रा. ब्लूमफील्ड साहेबांनींही पाश्चात्य संशोधनांतील हा दोष मान्य केला आहे ते म्हणतात[१२]—

"भारताच्या प्राचीन ग्रंथांचा अर्थ लावताना विदेशीय सामाजिक मन - प्रवृत्ति त्यांत घुसडणें निरर्थक होय."

प्रा. वेलणकर[१३] यांच्या मतें देखील या सूक्तांत मुद्‌गल मुद्‌गलानी या ऋषिदापत्यानें रथस्पर्धेंत मिळविलेल्या विजयाचें चित्र रेखाटलें आहे. गेल्डनेर

१०. जर्मन ओरिएण्टल सोसायटी, भाग ४६ वा, पृष्ठें ४४५ पासून पुढें. लेखाचें शीर्षक 'भारतातील एक गमतीदार शर्यत' असें आहे.

11. 'Bauern Edelmann' असे त्याचे शब्द आहेत.

12. "It is useless to introduce foreign 'folk-psychology' in the interpretation of the ancient Hindu documents"

१३ मुंबई युनिव्हर्सिटी जर्नल, सप्टेंबर १९५३, पृ २१.

व ब्लूमफील्ड यांची मतें त्यांनाहि मान्य नाहींत. विद्यानिधि चित्रावशास्त्री[१४] व श्रुतिबोधकार[१५] यांनीं सामान्यपणें सायणाचार्यांच्या मताचाच अनुवाद केलेला असून यात मुद्‌गल मुद्‌गलानी यांनीं चोरापासून गायी परत मिळविल्याचें वर्णन आहे असें त्याचें मत आहे. याप्रमाणें वेदभाष्यकार, पाश्चात्य संशोधक व पौर्वात्य संशोधक याच्या मतांचा पडताळा घेतला असता काहींच्या मतें हें रथस्पर्धेचें वर्णन असून इतराच्या मतें तें मुद्‌गलानें चोरावर मिळविलेल्या विजयाचें वर्णन आहे.

या सूक्ताचा अर्थ लावताना ' द्रुघण ' हा महत्त्वाचा शब्द प्रथम विचारात घेतला पाहिजे. सायणाचार्य[१६] म्हणतात कीं द्रुघण म्हणजे कुऱ्हाड, किंवा गदेसारखें एक हत्यार. सूक्तातील चौथ्या ऋचेंत ' कूट ' शब्द आला आहे. तोहि ' द्रुघण ' शब्दाशीं समानार्थक असावा. ऋग्वेदातील सर्व ठिकाणीं व अथर्ववेद ८-८-१६ या ठिकाणीं ' कूट ' शब्दाचा हातोडा किंवा कुऱ्हाड असाच अर्थ अभिप्रेत आहे. ब्लूमफील्डच्या मतें द्रुघण म्हणजे मुद्‌गर आणि द्रुघण, कूट व मुद्‌गर यांच्यामध्यें परस्पर संबंध आहे. षड्‌गुरुशिष्य व सायणाचार्य आपल्या भाष्यात द्रुघण म्हणजे मुद्‌गर असें म्हणतात. कौषीतकी ब्रा.[१७] द्रुघण याचा द्रुघ्नी म्हणजे कुऱ्हाड असा अर्थ करतें. निरुक्त ( ९-२३ ) वर भाष्य करताना दुर्ग ' अपविद्ध ' असा शब्दप्रयोग करतो. त्याचप्रमाणें सायण ' द्रुघण चाग्रतः क्षिप्त्वा ' असें म्हणतो. ' अपविद्ध ' व ' क्षिप्त्वा ' हे दोन्ही शब्द फेकण्याची क्रिया सुचवितात. यावरून या द्रुघणाचा उपयोग दोन तऱ्हेनें

---

१४ ऋग्वेदाचें मराठी भाषांतर, मंडल १०, पृ. ७३

१५ श्रुतिबोध भाग ३ रा, पृ. २०३.

१६ अथर्ववेद भाष्य ७ २८-१—द्रुः द्रुमो हन्यते अनेनेति द्रुघणो लविश्रादिः । द्रुघणो नाम मुद्‌गरः ।
अमरसिंह ( अमरकोश २-८-९१ ) हाही ' कुऱ्हाड ' असाच अर्थ देतो.
तैत्तिरीय संहिता ३-२-४-१ व आपस्तंब श्रौ. सू. ९-५-२ यांत ' स्विधन ' शब्द आला आहे. सायण व रुद्रदत्त या दोघांनींहि याचा कुऱ्हाड किंवा हातोडा असाच अर्थ केला आहे. ( रुद्रदत्त म्हणतो—मुद्‌गरस्तेन लोष्टानि घ्नन्ति । ).

१७. १४-१३; २५-१७; २६-३.

झाला असावा. एक म्हणजे असलेल्या बैलाला दुसरा जोडीदार म्हणून आणि त्याच वेळीं शत्रूवर हल्ला करण्यासाठीं फेकण्याचें परिणामकारी शस्त्र म्हणून. यावरून या सूक्ताचा विषय 'युद्ध' हाच असावा व द्रुघणशस्त्रानें त्यांत महत्त्वाची कामगिरी बजाविली असावी असें जें ब्लूमफील्डनें म्हटलें आहे तेंच खरें व पटण्यासारखें वाटतें.

गेल्डनरचें म्हणणें याहून वेगळें आहे. तो म्हणतो द्रुघण (१०·१०२·१०); द्रुधि (१०·१०२·६), दारु (१०·१०२·८); कूट (१०·१०२·४) व वध्रि (१०·१०२ १२) हे कमीअधिक प्रमाणात समानार्थी शब्द असून कमी पडणाऱ्या घोड्याच्या जागीं जोडण्यासाठीं उपयोगात आणलेला तो एक 'कृत्रिम लाकडी यंत्राश्व' असावा. पंचतंत्र, कथासरित्सागर (उदयनकथा) व मनुस्मृति (२·१५·७) या ठिकाणीं अनुक्रमें कृत्रिम गरुड, लाकडी घोडा, लाकडी हत्ती यांचा उल्लेख असल्याचा निर्वाळा गेल्डनेर देतो. तसेंच यास्काचें (९·२३) 'द्रुघणो द्रुममयो घनः' हें स्पष्टीकरण व निघण्टु (५·३) यावरील टीका[१८] वरील अर्थास अनुकूल आहेत असें गेल्डनेर म्हणतो.

परंतु वर सांगितल्याप्रमाणें 'शत्रूवर फेकण्याचा' जो उल्लेख आहे तो वरील अर्थ घेतल्यास जुळत नाहीं. तसेंच 'इन्द्रो रथ अवतु' (१०·१०२·१), 'धनभक्षेषु' (१०·१०२·१) 'गविष्टि', 'भर' (१०·१०२·२) 'अभिदासतः' (१०·१०२·३), 'वृहद्' (१०·१०२·४), 'प्रधने' (१०·१०२·५), 'काष्ठा' (१०·१०२·९) हे शब्द युद्धाचें वातावरणच सुचवितात. रथांच्या शर्यतीला[१९] हे शब्द अर्थवाही ठरत नाहींत.

मुद्गलानी ही या सूक्ताची नायिका आहे. तसेंच 'इन्द्रसेना' असाही तिच्या संबंधीचा उल्लेख या सूक्तांत आला आहे. तेव्हा वेदोत्तर वाङ्मयांत याला कांहीं आधार आहे काय हें पाहिलें पाहिजे. महाभारतामध्ये[२०] मुद्गल

---

१८. द्रुघण. । द्रुशब्दो द्रुमपर्याय· । द्रुमविकार. काष्ठखण्डोऽत्र द्रुशब्देनोच्यते ।

१९. विंडिश या पाश्चात्य संशोधकाच्या मतें रथस्पर्धा ही जगातील सर्व प्राचीन संस्कृतींत आढळणारी गोष्ट आहे. हें मान्य करण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं; पण या सूक्तांत रथस्पर्धा नाहीं. एवढेंच प्रस्तुत लेखकाचें म्हणणें.

२०. ४·६५१ नारायणी चेन्द्रसेना रूपेण यदि ते श्रुता ।

व मुद्गलानी याचा उल्लेख आदर्श दापत्य म्हणून आला आहे. च्यवन-सुकन्या, राम-सीता, अगस्त्य-लोपामुद्रा, सत्यवान-सावित्री या आदर्श दापत्याबरोबरच मुद्गल-मुद्गलानींचा उल्लेख आला आहे. यांपैकी मुद्गल, च्यवन व अगस्त्य हे प्राचीनतम ऋषि असून च्यवन हा अतिशय वृद्ध असल्याचा उल्लेख शतपथ ब्रा. (४·१·५·१–१५) येथें आला आहे. मुद्गल मुद्गलानी हेंही एक वृद्ध जोडपें असल्याचा उल्लेख महाभारत (४·६५१) येथें आहे. मात्र येथें नारायणी इन्द्रसेना असा मुद्गलानीचा उल्लेख आहे. गेल्डनेर साहेबाचा गैरसमज याच उल्लेखानें झाला असावा असें वाटतें. कारण मुद्गल हा वृद्ध आणि दुर्बल व मुद्गलानी ही तरुण होती अशी मसलाशी त्यांनीं आपल्या लेखात केली आहे. १०·१०२·११,१२ या ऋचाचा अर्थ लावण्यांत. ते सपशेल चुकले आहेत. यानेंही कारण त्याचा वरील गैरसमजच होय.[२१] हरिवंश (श्लो. ६७१८) यात इन्द्रसेना असें नाव आलें आहे. महाभारत (३·११३·२२) या ठिकाणीं रोहिणी, शची, अरुन्धती, लोपामुद्रा, दमयन्ती, इत्यादि पतिव्रताच्या नांवाबरोबरच 'नारायणी' या नावानें तिचा उल्लेख आला आहे. या नावाचा उलगडा महा. वनपर्व ५७ या ठिकाणीं इद्रसेनेसंबधीं आलेल्या उल्लेखानें होतो. इद्रसेना ही नल व दमयती याची मुलगी असल्याचें येथें सांगितलें आहे. तसेंच ती पाचाल देशाचा राजा ब्रह्मिष्ठाची पत्नी व बघ्र्यश्व हा तिचा मुलगा होता असें म्हटलें आहे.[२२] ब्रह्मिष्ठ हा पुराणवंशावळीप्रमाणें भर्म्यश्वाचा पुत्र आणि मुद्‌गल हाहि भर्म्यश्वाचा पुत्र. यावरून ब्रह्मिष्ठ व मुद्‌गल हीं एकाच व्यक्तीचीं नावें असावीत हें उघड होतें; किंवा 'ब्रह्मिष्ठो मुद्‌गलः' (ब्रह्मवादी मुद्‌गल) अशा उल्लेखानेंहि या दोन भिन्न व्यक्ति असाव्यात असा गैरसमज झाला असावा. तेव्हां इन्द्रसेना नारायणी हें नांव इद्रसेना नालायनी असें असावें. कारण ती नलाची मुलगी होती.[२३] यावरून इद्रसेना ही एक ऐतिहासिक व्यक्ति होती हें निश्चित सिद्ध होतें. ब्लूमफील्डनें 'इद्रसेना' शब्दाचा जो प्रतीकात्मक अर्थ लावला आहे तोहि निरर्थक ठरतो.

---

२१. प्रा. वेलणकर म्हणतात कीं ऋग्वेदाच्या सूक्तांत मुद्‌गल वृद्ध व दुर्बल असल्याचा कोठेंच उल्लेख नाहीं.

२२. चित्रावशास्त्री याचा प्राचीन चारित्रकोश पृ. ६५, 'इन्द्रसेना' पहा.

२३. डॉ. प्रधान हे आपल्या क्रॉनॉलॉजी ऑफ एन्शट इंडिया या पुस्तकात (पृ. १७६) म्हणतात, इद्रसेना नालायनी ही मुद्‌गलाची भार्या होती व दस्युचोरांशीं झालेल्या युद्धांत तिनें आपल्या पतीचें सारथ्य करून जय मिळविला.

पुराणांत दिलेल्या वंशावळीवरून मुद्गलाचा वंशवृक्ष कसा होता हें कळू शकतें.

नील → शान्ति → सुशान्ति → पुरुजाति → अर्क ( किंवा वृक्ष ) → भृम्यश्व → ( ब्रह्मिष्ठ ) मुद्गल → वध्र्यश्व → दिवोदास → मित्रयु → ( देववात )[२४] → संजय → च्यवन → ( सोमदत्त ) → पिजवन → सुदास् इ.

वरील सर्व विवेचन ध्यानीं घेतल्यास प्रस्तुत सूक्ताचा सुसंगत अर्थ लावतां येणें शक्य आहे. हें सर्व सूक्त युद्धविषयक जबाबदारी अंगावर घेतलेल्या एखाद्या राजाच्या पुरोहितानें तयार केलें असावें असें वाटतें.[२५] हा पुरोहित १, ३, १२ या बृहतीवृत्तांतील ऋचांनीं इंद्रदेवतेला पाचारण करीत आहे व बाकीच्या ऋचांत इंद्रानें मुद्गलाला कशी मदत केली, मुद्गल व मुद्गलानी यांनीं चोरांपासून गायी कशा परत मिळविल्या याचें वर्णन करीत आहे. सूक्ताचा अर्थ याप्रमाणें लावतां येईल.

ऋचा १—तुझ्या या खोट्या ( मिथूकृतम् )[२६] रथाचें इंद्र मोठ्या आवेशानें रक्षण करो. हे सकलजनाहूत इंद्रा, या कीर्ति मिळवून देणाऱ्या युद्धांमध्यें आमचें धन पळवून नेणाऱ्या या चोरांपासून आमचें रक्षण कर.

ऋचा २—( फार पूर्वी ) जेव्हां मुद्गलाची बायको इन्द्रसेना रथांत बसली होती तेव्हां तिचा पदर वाऱ्यानें फडफडत होता. तिनें या गायींसाठीं चाललेल्या युद्धांत हजारों गायी परत जिंकून घेतल्या.

ऋचा ३—हे इन्द्रा, आमचा नाश करण्याची इच्छा करणाऱ्या आमच्या शत्रूंवर तुझें वज्र फेक. आणि आमच्या दास व आर्य शत्रूंचीं गुप्त शस्त्रें ( शत्रुतः ) आमच्यापासून दूर ठेव.

ऋचा ४—मुद्गलाचा बैल हर्षातिरेकानें एक तलावभर पाणी प्याला व ( वाटेंतील ) उंचवटे ( शिंगांनीं ) उकरीत तो शत्रूवर चालून गेला. विजयाच्या इच्छेनें तो अंडील बैल चौखूर उधळून ( शत्रूवर ) चाल करून गेला.

---

२४. ज्यांचीं नांवें कंसांत घातलीं आहेत त्यांच्याविषयीं निश्चित माहिती मिळत नाहीं.

२५. या पुरोहिताचें नाव विसरलें गेल्यामुळें कथेंतील नायक व नायिका म्हणजे मुद्गल व मुद्गलानी यांनाच सूक्तद्रष्टे ठरविलें गेलें असावें.

२६. गेल्डनेरच्या मतें 'रथाचें रूप दिलेली' गाडी; सायणाच्या मतें 'निराधार' किंवा 'अश्वहीन'.

ऋचा ५—या बैलाबरोबर धावत जाणाऱ्या (मुद्‌गलाच्या) लोकांनीं शत्रूला ओरडावयास लावलें व (भीतीनें) मूत्रविसर्जन करावयास लाविलें. आणि युद्धांत याच बैलाच्या साहाय्यानें शेंकडों नव्हे हजारों पुष्ट धेनूचें (रिहार) जिंकलें.

ऋचा ६—गाडीच्या जोखडाला बैल जोडला गेला होता. त्या वेळीं विपुल केशपाश असलेली (केशी) मुद्‌गलानी सारथी झाली आणि तिनें बैलाला जोरानें हाकारलें. बेफाम झालेला तो बैल जेव्हां जोरानें उधळला तेव्हां त्याचे खूर मुद्‌गलानीला स्पर्श करताहेत कीं काय असें वाटलें.

ऋचा ७—तेव्हा इद्रानें चाकाची धाव (प्रधि) व जोखडाची खुंटी (वसग) (मोठ्या कौशल्यानें) बसाविली व बैलाला ताब्यात आणलें. मग तो वर्धिंद्युक्त बैल पुन्हां वेगानें धावू लागला.

ऋचा ८—पराणीनें टोचताच (अष्ट्रावी) तो केसाळ (कपर्दी) बल ऐटींत (शुनम्) चालू लागला, पण (आता) त्याच्या मागच्या पायाजवळ एक दांडकें बांधलें होतें. प्रजाजनासाठीं मोठा पराक्रम गाजविल्यामुळें त्या गायींकडे पाहात असता त्याला हुरूप वाटला.

ऋचा ९—हें पहा तें बैलाला जोडीदार म्हणून बांधलेलें दांडकें आतां समरांगणावर पडलें आहे! याच्याच साहाय्यानें मुद्‌गलानें युद्धामध्यें शेंकडों नव्हे हजारों गाई जिंकल्या.

ऋचा १०—काय चमत्कार! असें आश्चर्यकारक (शस्त्र) कोणी पाहिलें आहे काय कीं जें जोखडाला जोडलेलें असूनहि त्याच्याकडून (धावण्याची वगैरे) कांहींच हालचाल करविली जात नाहीं! त्याला गवत खावयास दिलें नाहीं कीं पाणी प्यावयास दिलें नाहीं, पण तरीहि बैलाचा जोडीदार म्हणून त्याला जोखडाला जोडलें असताना त्यानें यशाचा मार्ग दाखविला.

ऋचा ११—मुद्‌गलानीला तिचा पति परत मिळाला. एखाद्या परित्यक्तेच्या पुष्ट पयोधरांतून (पान्हा फुटून) दूध वाहू लागावें[२७] किंवा रहाट-

२७. ग्रिफियचा ऋग्वेदानुवाद पृ. ५४३.
श्रुतिबोधकार सुचवितात,—"चाकानें पाणी ओढून टच्च फुगलेल्या (मोटें) तून पाणी रिचवावें तसें." सायण म्हणतो, "यथा मेघ अन्तरिक्षे स्वल्पमानोऽपि वर्षणसमये महान् भवति तद्वदेय मपि धनुमध्ये शरधारा वर्षन्ती वर्धत इत्यर्थ।"
चित्रावशास्त्री म्हणतात, "मुद्‌गलानी मेघानें पृथ्वीवर पाऊस पाडावा त्याप्रमाणें गर्जित(?)वरली."

गाडग्यावर पाणी काढून तें ओतावें ( कूचक्रेणेव सिञ्चन् )[२८] त्याप्रमाणें हें झालें. ( याचप्रमाणें ) आम्हाला देखील वेगवान रथाच्या साहाय्यानें विजय मिळो व युद्धामध्यें आम्हांला मंगलकारक असें भरपूर धन मिळो.

ऋचा १२—हे इन्द्रा, तूं सर्व जगाचा व डोळसांचा नेत्र आहेस. कारण शक्तिमान असा तूं निर्जीव वस्तूच्या साहाय्यानें देखील शूरांना युद्धांत विजय मिळवून देतोस.

या सूक्ताचा हा अर्थ विचारांत घेतल्यास आपल्या ध्यानीं येईल कीं, मुद्गलानी ही या सूक्ताची शूर नायिका आहे आणि तिच्या पराक्रमाचें पारितोषिक तिला मिळाल्याचा उल्लेख शेवटच्या भागांत आला आहे. सूक्त आनंदपर्यवसायी आहे. मुद्गल हा देखील शेवटपर्यंत युद्धांत होता. त्यानें युद्धात भाग घेतला नाहीं हें गेल्डनेरचें मत बरोबर दिसत नाहीं. कोणाही निःपक्षपाती वाचकाला या सूक्ताचा उपक्रम व उपसंहार वाचून सहज कळून येईल कीं हें एक संग्रामसूक्त असून त्याचा विनियोग युद्धकर्मासाठींच असावा. सुरवातीस योद्ध्याच्या रथाला इद्राचा आशीर्वाद मागितला आहे व शेवटीं तो चमत्कार घडवू शकणाऱ्या इंद्राला विनंती केली आहे.

यावरून मुद्गल व मुद्गलानी या ऐतिहासिक व्यक्ति होत्या याबद्दल संशय उरत नाहीं. पुराणांत दिलेली मुद्गलाची वंशावळ महाभारतापर्यंत पोहोंचविली आहे ती पाहण्यासारखी आहे:—

२८. मा. वेलणकर, मुंबई युनि. जर्नल, सप्टेंबर १९५२. पृ. २३.

## उत्तर पांचाल वंश

अजमीढ
|
नील
|
शांति
|
सुशांति
|
पुरुजातु
|
ऋक्ष
|
भृम्यश्व
|
- मुद्गल (इंद्रसेना)
  - वाध्र्यश्व (मेनका)
    - दिवोदास (अतिथिग्व)
      - मित्रयु
        - मैत्रेय सोम
          - सृंजय
            - च्यवन (पैजवन)
    - अहल्या (गौतम शरद्वंताशीं लग्न)
      - ⋮ शतानंद
- सृंजय
- बृहदिषु
- यवीनर
- कापिल्य




ऋग्वेदांतील ऋषींच्या चरित्राचा सूक्ष्म संशोधनात्मक अभ्यास केल्यास भारताच्या सामाजिक व सांस्कृतिक इतिहासांतील दुवे सांधतां येतील व प्राचीन काळापासून अर्वाचीन कालपर्यंत सुसूत्र इतिहास लिहिणें शक्य होईल. तेव्हां वैदिक संशोधनाचें पाऊल त्या दिशेने वळल्यास बरें होईल.

प्रस्तुत लेख तयार करतांना डॉ. रा. ना. दांडेकर यांनी पुरविलेली माहिती, पुणें विद्यापीठांत संस्कृत विभागांत चाललेलें भारतीय विद्याविषयक लेखांच्या सूचीचें ( इंडॉलॉजिकल बिब्लिऑग्रफी ) कार्य व डॉ. दांडेकर यांची ' वैदिक बिब्लिऑग्रफी ' यांच्या साहाय्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें आवश्यक आहे. शेवटीं विद्यानिधि चित्रावशास्त्री यांच्या गौरवग्रंथात लेख लिहिण्याची व तद्द्वारा माझी कृतज्ञता व आदरबुद्धि व्यक्त करण्याची संधि दिल्याबद्दल मी गौरव ग्रंथमंडळाचे आभार मानून विद्यानिधि चित्रावशास्त्री यांना दीर्घायुरारोग्य चिंतितों.

———

# श्रौत वाङ्मय आणि विधि

(श्री. चिं. ग. काशीकर)

वैदिक वाङ्मय हें जगातील प्राचीनतम साहित्य होय ही गोष्ट सर्वमान्य आहे. वैदिक वाङ्मय आणि भारतीय संस्कृति याचा संबंध कशा प्रकारचा आहे आणि वैदिक वाङ्मयावरून भारतीय संस्कृतीचें कोणतें स्वरूप दृग्गोचर पडतें यासंबंधीं देशीविदेशी अनेक विद्वानांनीं आजपर्यंत पुष्कळ चर्चा केली आहे. तथापि वैदिक धर्माच्या आचारस्वरूपाची चिकित्सा करून वैदिक संस्कृतीचें यथार्थदर्शन घडविण्याचे प्रयत्न थोडेच झाले आहेत. अलीकडे या विषयाकडे विद्वानांचें लक्ष्य जाऊं लागलें आहे ही समाधानाची गोष्ट आहे. या दिशेनें विशेषत. भारतात जे प्रयत्न झाले त्यात अग्रेसरत्वाचा मान डॉ श्री. व्य. केतकर यांना द्यावयास पाहिजे त्यांनीं आपल्या ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडाच्या एकूण पांच भागांपैकीं दोन भागांत या विषयाची जी मांडणी केली आहे, आणि संशोधनाची जी दिशा दाखविली आहे ती आजहि तज्ज्ञांना अनुसरणीय अशीच आहे.

प्राचीन वाङ्मयातून संस्कृतीचें वास्तव स्वरूप शोधून काढण्यांतील पहिली अडचण म्हटली म्हणजे त्याच्या अर्थनिर्णयाची. जों जों वाङ्मय प्राचीन तों तों त्याची भाषाहि प्राचीन असल्यामुळें अर्थनिर्णय हा एक बिकट प्रश्न होऊन बसतो. अर्थात् त्यासंबंधीं मतमतांतराला फार वाव मिळतो. वैदिक वाङ्मयापैकीं ऋग्वेद आणि अथर्ववेद याच्या बऱ्याचशा भागासंबंधीं अद्यापि अर्थनिश्चिति झाली आहे असें म्हणतां येत नाहीं. या मतभेदांतील पहिला मूलभूत प्रश्न म्हणजे वेदमंत्रांच्या निर्मितीचा हेतु हा होय. यज्ञामध्यें विनियोग हें वेदमंत्रांचें एकमेव प्रयोजन समजून भाष्यकारांनीं वेदमंत्रांचा यज्ञपर अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. कांहीं टीकाकारांनीं आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असे अर्थनिर्णयाचे तीन प्रकार मानून यथावसर त्यांचा अवलंब केला आहे. अर्वाचीन संशोधकांच्या मतेंहि बरेचसें वैदिक वाङ्मय यज्ञामध्यें विनियोग करण्याच्या उद्देशानें रचलेलें आहे. मात्र त्यांतील कांहीं भाग निःसंशय प्रार्थनापर काव्य आहे. ऋग्वेदांतील बहुतेक मंत्रांचा यज्ञविधींत विनियोग ब्राह्मणकारांनीं आणि सूत्रकारांनीं सांगितलेला असला तरी मूळ त्या हेतूनेंच ते सर्व मंत्र रचले गेले असें म्हणतां येत नाहीं. ऋग्वेदावरील सायणभाष्यांतहि

नैरुक्त, ऐतिहासिक, वैयाकरण, पौराणिक असे व्याख्याकारांचे वेगवेगळे पक्ष जागोजाग मांडून त्यांनीं केलेलीं मन्त्रार्थाचीं स्पष्टीकरणेंहि उद्धृत केलीं आहेत.

अलीकडील काळात वेदार्थनिर्णयासबधीं एक नवीन सप्रदाय निघाला आहे. या सप्रदायाचें मत असें कीं, ब्राह्मणग्रंथ आणि श्रौतसूत्रें यात सांगितलेला वेदमन्त्राचा विनियोग हा कृत्रिम आणि मागाहूनचा आहे. यज्ञाचें मूळचें स्वरूप ब्रह्मयज्ञ, अर्थात आध्यात्मिक चिंतन हें होतें आणि त्या दृष्टीनें मन्त्रद्रष्टया ऋषींनीं मन्त्राचे विनियोग सांगितले होते. मन्त्राचा मूळ अर्थ आणि त्यांचा विनियोग याचें ज्ञान महाभारत युद्धकालापर्यंत विद्यमान होतें. पुढें ब्राह्मणकारांनीं आणि श्रौतसूत्रकारांनीं त्यांचा विनियोग हिंसाप्रधान यज्ञकर्मात सांगितला. अलीकडील एक दोन शतकात पुराणोक्त कर्मातहि मंत्राचा विनियोग सांगितला जाऊं लागला, ही मन्त्रविनियोगाची तिसरी अवस्था होय. सारांश, आध्यात्मिक चिंतन व तद्विषयक कर्मात विनियोग हा वेदमन्त्राचा मूळ उद्देश होता आणि त्याच विशुद्ध दृष्टीनें वेदमंत्र समजून घेतले पाहिजेत असें या सप्रदायाचें म्हणणें आहे.

हें मत सपूर्णपणें मांडून त्याचें खंडनमंडन करणें हा या लेखाचा हेतु नाहीं सनातन वैदिक धर्माचे मूलसिद्धात या सप्रदायाला सपूर्णत मान्य आहेत असें नाहीं, तसेंच अर्वाचीन काळातील सशोधननें सिद्ध झालेली ऐतिहासिक भूमिकाहि त्याला मान्य नाहीं. स्वत चे काल्पनिक सिद्धात प्रमाण मानून त्यावर तर्कानें रचलेली ही इमारत आहे अर्थात् मूळ भूमिकेबाबतच मतभेद असल्यामुळें या वादात शिरून फारसें काहीं निष्पन्न होणार नाहीं. ब्राह्मणग्रथाना वेदत्व आहे हा मीमांसकाचा व सनातन वैदिक धर्मशास्त्राचा सिद्धात या सप्रदायाला मान्य नाहीं.[1] शुक्ल यजुर्वेदात मन्त्र आणि ब्राह्मण हे पृथक् ग्रथित केले असल्या मुळें त्या वेदाच्या सहितेला वेद म्हणणें या सप्रदायाला स्वीकार वाटतें, परन्तु तैत्तिरीय, मैत्रायणी, काठक या वेदशाखा मन्त्रब्राह्मणमिश्र असल्यामुळें, त्यातील मन्त्र शुक्लयजु सहितेशीं प्राय समान असले तरी, त्याना वेद म्हणणें या सप्रदायाला मानवत नाहीं. महाभारत–युद्धकाल, ब्राह्मणकाल असे कालविभाग पाडले असले तरी विकासवाद मान्य नसल्यामुळें शुद्ध ऐतिहासिक भूमिकेवरहि तो येऊ शकत नाहीं. वैदिक वाङ्मय आणि यज्ञसस्था यांच्या परस्पर सबधा-

१. ब्राह्मणग्रथाना वेदत्व नाहीं या आक्षेपाचें विस्तृत समीक्षण श्री. दीनानाथ शर्मा सारस्वत यांनीं सभाष्य शतपथ ब्राह्मणाच्या (वेंकटेश्वर प्रेस, मुंबई) प्रास्ताविकात केलें आहे.

बाबत धर्मशास्त्र आणि इतिहासवाद या दोहोंमध्यें प्रायः मतैक्य असल्यामुळें वेदकालीन आचारधर्म यज्ञप्रधान होता याविषयीं शंका रहात नाहीं. यज्ञसंस्था समजून घेतल्याशिवाय वेदाचा उलगडा होणेंच शक्य नाहीं हें ज्ञानकोशकारांनीं फार चांगल्या रीतीनें मांडलें आहे. (प्रस्तावना विभाग २ पृ. १९४) यजुर्वेद-वाङ्मयाची मंत्रब्राह्मणमिश्रता आणि ऋग्वेद व यजुर्वेद यांतील मंत्रांचें साम्य याचा विचार करतां, यजुर्वेद आणि ऋग्वेद यांच्या काळामध्यें कांहीं अंतर मानणें क्रमप्राप्त असलें तरी, हें अंतर फार ताणणें वस्तुस्थितीला सोडून होईल. ब्राह्मणग्रंथांत मांडलेलें यज्ञसंस्थेचें स्वरूप ही यज्ञधर्माची प्रगत अवस्था होय यांत शंका नाहीं. ऋङ्मंत्रकालीन यज्ञिय आचार हा त्या अवस्थेला पोंचलेला असणें शक्य नाहीं. परंतु या दोन अवस्थांतील आचारांत फार तर तपशीला-बाबत फरक होऊं शकेल. पण म्हणून पहिला आचार अध्यात्मपर आणि पुढील आचार कृत्रिम भौतिकवादी असें मानणें कालदृष्ट्या चूक आहे; विकासवादाच्या दृष्टीनेंहि तें मुळींच समर्थनीय नाहीं. अग्नि म्हणजे ईश्वर, इन्द्र म्हणजे ईश्वर, मित्र म्हणजेहि ईश्वर, वरुण म्हणजेहि ईश्वर असें म्हणावयाचें तर मग देव-तांचीं इतकीं वेगवेगळीं नांवें रूढ होण्याचें प्रयोजन तरी काय? केवळ काल्प-निक व्युत्पत्तीच्या आधारें अर्थ सांगण्याचा अट्टाहास केला तर प्रत्येक वैया-करणागणिक वेदमंत्राचा निरनिराळा आणि परस्परविरुद्ध अर्थ करण्याचा प्रसंग येईल. १

याचा अर्थ असा नाहीं कीं, ब्राह्मणकारांनीं सांगितलेल्या विनियोगाच्या हेतूनेंच सर्व वेदमंत्र रचले गेले होते. ब्राह्मणकारांनीं सांगितलेले कांहीं मंत्रांचे विनियोग कृत्रिम आहेत हें नाकारता येत नाहीं. परंतु सर्वच मंत्रांच्या बाबतींत असें म्हणतां येणार नाहीं. ज्या मंत्राचा अर्थ उघडउघड यज्ञपर आहे ते त्या त्या विधीसाठीं रचले गेले हें मान्य करावयास हवें. असे मंत्र पुष्कळच आहेत. त्या मानानें प्रार्थनापर काव्यांत गणल्या जाणाऱ्या मंत्रांची संख्या खात्रीनें कमी भरेल. यज्ञ हा वेदकालीन प्रधान आचार असल्यामुळें यज्ञांत विनियोग करण्यासाठीं मंत्रांचें कर्मविभागशः संग्रह करण्याची आवश्यकता निर्माण झाली. अर्थात् प्रार्थनापर मंत्रांचाहि संग्रह आणि संरक्षण करणें स्वभावतःच इष्ट व आवश्यक वाटल्यानें तेहि त्या संग्रहांत समाविष्ट झाले आणि अशा संग्रहामुळें त्या एकूण वाङ्मयाला एक प्रकारचें पावित्र्य प्राप्त झाल्यामुळें त्यांतील प्रार्थना-पर मंत्रांचाहि त्या त्या देवतेच्या उद्देशानें करावयाच्या विधींत विनियोग करण्या-कडे नैसर्गिक प्रवृत्ति झाली. ब्राह्मणकारांच्या पावलावर पाऊल ठेवून श्रौतसूत्र-

  

कारांनी आपापल्या संप्रदायाला अनुकूल अशी मंत्रांच्या विनियोगाची भर आवश्यकतेप्रमाणें घातली.

येथपर्यंत फारसें बिघडलें नाहीं. परंतु एकवार मंत्रांच्या ठायीं अलौकिक सामर्थ्याची कल्पना केली गेल्यानंतर त्यांचा उपयोग कोठें करावा याला फारशी मर्यादा उरली नाहीं. त्यांत पुनः मंत्रार्थाच्या अज्ञानाची भर पडल्यामुळें केवळ शब्दसादृश्यानें मंत्राचा विनियोग पौराणिक आणि स्मार्त कर्मांकडे अनिर्बंधपणें करण्याची प्रवृत्ति वाढली. यामुळें अज्ञान आणि अंधश्रद्धा यांचा धार्मिक आचारांत प्रवेश होऊन त्याचें बौद्धिक अधिष्ठान सुटलें.

हें सर्व खरें असलें तरी वेदमंत्रांचा विनियोग मूलतः अध्यात्मचिंतनपर होता आणि त्याच्यावर श्रौतयागपर विनियोग आगंतुकपणें लादला गेला असें सिद्ध करू पाहणें आणि सायण-उवटादि भाष्यकारांना शिव्या देणें केवळ अप्रयोजकपणाचें आहे. या भाष्यकारांनी परंपरा गुंडाळून ठेवून मन मानेल तसा मंत्रांचा अर्थ फिरवला असें म्हणणें म्हणजे शुद्ध अन्याय आहे. ब्राह्मणग्रंथ, निघंटु व निरुक्त, स्कन्दस्वामी, उद्गीथ, वेंकटमाधव वगैरे जुने भाष्यकार यांच्या पावलावर पाऊल ठेवूनच सायणाचार्यादि भाष्यकार वेदार्थ सांगण्याला प्रवृत्त झाले आहेत. ऋग्वेदांतील कांहीं प्रार्थनापर किंवा तत्सम मंत्रांचा अर्थ यज्ञपर लावण्याची त्यांची प्रवृत्ति आहे हें खोटें नाहीं; पण त्याबद्दल त्यांना दोष देणेंहि योग्य नाहीं. त्यांच्या खांद्यावर उभें राहून त्यांना शहाणपण शिकविणें हें विनयाचें लक्षण नव्हे. भाष्यकारांनी सांगितलेला कांहीं मंत्रांचा अर्थ वाचून वेदाविषयीं आदरबुद्धि उत्पन्न होत नाहीं असें कोणाचें म्हणणें असेल तर वेदाकडे पाहण्याची त्यांची बुद्धि वास्तववादी नाहीं असेंच म्हणावें लागेल. वेदाविषयीं आदर वाटावा यासाठीं आपल्या मनांत असलेला अर्थ येनकेन प्रकारेण वेदावर लादणें हें सत्याला सोडून आहे. वेदोक्त आचारविचारांची वेदकालीन बाह्य जगतांतील आचारविचारांशीं तुलना केली असतां वेदमंत्रद्रष्ट्यांची उच्च मनोभूमिका दृष्टीपुढें उभी राहून वेदवाङ्मयाविषयीं आदर वाटूं लागतो. भाषाशास्त्रादि विविध शास्त्रांच्या निर्मितीनंतरहि चिकित्सक विद्वानांनी वेदार्थप्रतिपादनाचे जे प्रयत्न केले आहेत, त्यांत किती मंत्रांचा अर्थ यज्ञविधिनिरपेक्ष केलेला आढळतो? ज्या मंत्राच्या अर्थाचा उलगडा इतिहास, पुराण, व्युत्पत्ति इत्यादिकांच्या आधारें करतां येतो किंवा केला जातो त्याचा तसा अर्थ नमूद करण्याकडे भाष्यकारांनीं दुर्लक्ष केलेलें नाहीं. सारांश, वेदभाष्यकारांना अकारण नांवें ठेवण्याच्या प्रवृत्तीला, श्रद्धाभावानें नव्हे तर बुद्धिवादानें आळा घातला पाहिजे.

हें सर्व लिहिण्याचा हेतु असा आहे कीं, श्रौतयज्ञाच्या द्वारा व्यक्त होणारी संस्कृति ही मागाहून आगंतुकपणें निर्माण झालेली नसून वैदिक साहित्याच्या समकालीन ती आहे. यज्ञविधीच्या स्वरूपांत मूळ मंत्ररचनाकालापासून यजुर्वेद-ब्राह्मणकालापर्यंत उत्क्रान्ति होत गेली हें उघडच आहे. यज्ञविधीवरून व्यक्त होणारी पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांना यज्ञाचा व वेदाचा असलेला अधिकार ही होय. शूद्र या अधिकाराच्या कक्षेत येत नसला तरी यज्ञाशीं अन्य प्रकारांनीं त्याचा संबंध होताच. शिवाय रथकृतिप्रसार आणि समाजस्थैर्य या दोन दृष्टींनीं, वैदिक आर्यांशीं संबद्ध झालेल्या अनार्य प्रतिष्ठितानाहि यज्ञ करण्याचा अधिकार दिला गेला होता असें दिसून येतें. सूत्रकालांत आणि बौद्धकालांत स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा आणि अधिकाराचा जो संकोच झालेला दिसून येतो तसा वैदिक काळांत आढळत नाहीं. यज्ञामध्यें यजमानपत्नीचा अधिकार यजमानाच्या बरोबरीनें आहे. *अर्थात् वेदमंत्राचीहि ती अधिकारी होती. काहीं वेदमंत्रांच्या द्रष्ट्याहि स्त्रिया* होत्या. सारांश समाजसंघटनेला अनुकूल अशा प्रकारची यज्ञिय आचाराची बैठक होती.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे परलोककामनेइतकीच वैदिक आर्यांची ऐहिक कामनाहि प्रबल होती. वेदमंत्रावरून आणि यज्ञिय आचारांवरून ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते. जीवनाविषयींची अभिलाषा, तदनुकूल विविध विकार आणि शारीरिक व मानसिक उत्साह यांचा प्रकर्ष वेदकाळांत आढळतो. स्वर्गप्राप्तीसाठीं जशीं नित्य कर्में सांगितलीं आहेत तशींच नैमित्तिक कर्में आणि त्यांच्या किती तरी पट काम्यकर्में वेदांत सांगितलीं आहेत. आतां याग आणि कामनासफलता यांचा कार्यकारणभाव कशा स्वरूपाचा आहे हा प्रश्न अगदीं स्वतंत्र आहे. तथापि विशिष्ट कामना आणि त्यांच्या सिद्धीसाठीं सांगितलेलें यागाचें विशिष्ट तंत्र यांचा परस्परसंबंध मात्र पाहण्यासारखा आढळतो.

तिसरी लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे यज्ञांतील आचार आणि त्यासाठीं वापरावयाचे पदार्थ यांची तत्कालीन व्यवहाराशीं असलेली सांगड. ही सांगड इतकी पक्की आहे कीं यज्ञांतील मास तंत्र बाजूस काढलें तर जणू काहीं तत्कालीन जगांतील रोजचे व्यवहारच आपण यज्ञस्वरूपांत पाहात आहोंत असें भासतें. या समानतेमुळें यजुर्वेदकालीन समाजाचे आचारविचार साक्षात् समजून घेण्याचें फार मोठें साधन उपलब्ध झालें आहे, तसेंच तत्पूर्वकालीं मंत्ररचनेच्या काळांत चालू असलेल्या आचारविचारांची माहिती दृढ अनुमानानें समजून घेण्याचीहि शक्यता निर्माण झाली आहे. या माहितीचा उपयोग

जितक्या प्रमाणांत करून घ्यावयास पाहिजे तितक्या प्रमाणात तो अद्यापि केला गेलेला नाहीं. ब्राह्मणग्रंथांचें वरवर रुक्ष भासणारें प्रतिपादन व जटिल विधि यांमुळें या विषयाकडे विद्वानांचें लक्ष्य फार अल्प प्रमाणांत जातें. परंतु ज्ञानकोशकारांनीं म्हटल्याप्रमाणें " यज्ञसंस्थेचा इतिहास जितका क्लिष्ट व कोरड्या नियमांनीं व बेचव निर्बंधांनीं भरला आहे तितकाच तो एकदां क्लिष्टतेची हद्द ओलांडून गेलें असता उपयुक्त व मनोरंजक आहे. "

श्रौतयागासंबंधीं चौथा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे त्यांतील आचारांची मर्यादित प्रमाणात दिसून येणारी परिवर्तनीयता. यागाचे विधी प्रामुख्यानें अध्वर्यूच्या वेदात म्हणजे यजुर्वेदात सांगितलेले असतात. यजुर्वेदाच्या विविध-शाखांच्या ब्राह्मणग्रंथाची बारकाईनें तुलना केली असता त्यांनीं प्रतिपादिलेल्या विधींत अल्प प्रमाणात कां होईना, कालसापेक्ष आणि स्थलसापेक्ष विविध संप्रदाय आढळून येतात. या संप्रदायांचें स्वरूप अवलोकन करणें आणि त्यांच्या भिन्नतेची कारणमीमांसा करणे मोठें बोधप्रद आहे. विशेषतः कृष्ण यजुर्वेद आणि शुक्ल यजुर्वेद यांच्या ब्राह्मणग्रंथांची परस्पर तुलना पहाण्यासारखी आहे. प्रत्येक शाखेचे एक किंवा अनेक श्रौतसूत्रग्रंथ आहेत. ब्राह्मणग्रंथात विस्कळित-पणें, अस्पष्टपणें किंवा संक्षेपानें प्रतिपादलेले विधी क्रमानें स्पष्ट आणि तपशील-वार मांडण्यासाठीं सूत्रग्रंथ लिहिले आहेत. या सूत्रग्रंथांचा त्यांच्या ब्राह्मण-ग्रंथाशीं त्याचप्रमाणें परस्परांशीं संबंध कशा प्रकारचा आहे, हा विषय किंचकट असला तरी परिवर्तनाच्या दृष्टीनें पहाण्यासारखा आहे. ही परिवर्तनशीलता मर्यादित प्रमाणातच आढळावी यांत नवल नाहीं. वेदमंत्रांचा संग्रह झाल्यामुळें आणि त्यांच्या ठिकाणीं अलौकिक सामर्थ्याची कल्पना केली गेल्यामुळें त्यात सांगितलेल्या विधींची चौकट ओलांडून श्रौत आचारधर्म बाहेर पडणें शक्यच नव्हतें. तथापि या मर्यादेंतहि तत्कालीन धर्मनिष्ठांनीं आपलें विचारस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य प्रकट केलें हें ध्यानात घेण्यासारखें आहे. श्रौतयागासंबंधीं जे अनेक प्रयोगग्रंथ झाले त्यांची सूत्रग्रंथाशीं तुलना केली असतां असें आढळून येतें कीं, परशाखीय सूत्रांच्या अंशतः अनुकरणामुळें आणि व्यावहारिक परि-स्थितीमुळें त्यातील विधि स्वशाखीय सूत्रांशीं तंतोतंत जुळणारे असतातच असें नाहीं.

याप्रमाणें यज्ञसंस्थेनें वेदकालीं आर्यावर्तावर धार्मिक साम्राज्य प्रस्थापित केलें तरी क्रमाक्रमानें तिलाहि अवनतावस्था आली. यज्ञविधींचें जटिलत्व, पुढा-रलेल्या वर्गांची मांसाशनापासून क्रमशः निवृत्ति आणि अनेकदेवतावादापासून एकेश्वरीमताकडे झुकणारा तत्त्वज्ञानाचा कल, हीं त्या अवनतावस्थेचीं प्रमुख

हें सर्व लिहिण्याचा हेतु असा आहे कीं, श्रौतयज्ञांच्या द्वारा व्यक्त होणारी संस्कृति ही मागाहून आगंतुकपणें निर्माण झालेली नसून वैदिक साहित्याच्या समकालीन ती आहे. यज्ञविधीच्या स्वरूपांत मूळ मंत्ररचनाकालापासून यजुर्वेद-ब्राह्मणकालापर्यंत उत्क्रान्ति होत गेली हें उघडच आहे. यज्ञविधींवरून व्यक्त होणारी पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांना यज्ञाचा व वेदाचा असलेला अधिकार ही होय. शूद्र या अधिकाराच्या कक्षेत येत नसला तरी यज्ञाशीं अन्य प्रकारांनीं त्याचा संबंध होताच. शिवाय संस्कृतिप्रसार आणि समाजस्थैर्य या दोन दृष्टींनीं, वैदिक आर्यांशीं संबंध आलेल्या अनार्य प्रतिष्ठितांनाहि यज्ञ करण्याचा अधिकार दिला गेला होता असें दिसून येतें. सूत्रकालांत आणि बौद्धकालांत स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा आणि अधिकाराचा जो संकोच झालेला दिसून येतो तसा वैदिक काळांत आढळत नाहीं. यज्ञामध्यें यजमानपत्नीचा अधिकार यजमानाच्या बरोबरीनें आहे. अर्थात् वेदमंत्रांचीहि ती अधिकारी होती. कांहीं वेदमंत्रांच्या द्रष्ट्याहि स्त्रिया होत्या. सारांश समाजसंघटनेला अनुकूल अशा प्रकारची यज्ञिय आचाराची बैठक होती.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे परलोककामनेइतकीच वैदिक आर्यांची ऐहिक कामनाहि प्रबल होती. वेदमंत्रांवरून आणि यज्ञिय आचारांवरून ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते. जीवनाविषयींची अभिलाषा, तदनुकूल विविध विकार आणि शारीरिक व मानसिक उत्साह यांचा प्रकर्ष वेदकालांत आढळतो. स्वर्गप्राप्तीसाठीं जशीं नित्य कर्में सांगितलीं आहेत तशींच नैमित्तिक कर्में आणि त्यांच्या कितीतरी पट काम्यकर्में वेदांत सांगितलीं आहेत. आता याग आणि कामनासफलता यांचा कार्यकारणभाव कशा स्वरूपाचा आहे हा प्रश्न अगदीं स्वतंत्र आहे. तथापि विशिष्ट कामना आणि त्यांच्या सिद्धीसाठीं सांगितलेलें यागाचें विशिष्ट तंत्र यांचा परस्परसंबंध मात्र पाहण्यासारखा आढळतो.

तिसरी लक्ष्यात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे यज्ञातील आचार आणि त्यासाठीं वापरावयाचे पदार्थ यांची तत्कालीन व्यवहाराशीं असलेली सांगड. ही सांगड इतकी पक्की आहे कीं यज्ञातील मंत्र तंत्र बाजूला काढलें तर जणूं कांहीं तत्कालीन जगांतील रोजचे व्यवहारच आपण यज्ञस्वरूपात पाहात आहोंत असें भासतें. या समानतेमुळें यजुर्वेदकालीन समाजाचे आचारविचार साक्षात् समजून घेण्याचें फार मोठें साधन उपलब्ध झालें आहे, तसेंच तत्पूर्वकालीं मंत्ररचनेच्या काळात चालू असलेल्या आचारविचाराची माहिती दृढ अनुमानानें समजून घेण्याचीहि शक्यता निर्माण झाली आहे. या माहितीचा उपयोग

क्या प्रमाणांत करून घ्यावयास पाहिजे तितक्या प्रमाणात तो अद्यापि केला ला नाहीं. ब्राह्मणग्रंथाचें वरवर रुक्ष भासणारें प्रतिपादन व जटिल विधि ळें या विषयाकडे विद्वानांचें लक्ष्य फार अल्प प्रमाणात जातें. परतु ज्ञान- शकारानीं म्हटल्याप्रमाणें "यज्ञसंस्थेचा इतिहास जितका क्लिष्ट व कोरड्या प्रमानीं व बेचव निर्घानीं भरला आहे तितकाच तो एकदा क्लिष्टतेची हद्द ओलांडून गेलें असता उपयुक्त व मनोरंजक आहे."

श्रौतयागासंबंधीं चौथा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे त्यातील आचारांची दित प्रमाणात दिसून येणारी परिवर्तनीयता. यागांचे विधी प्रामुख्यानें वर्यूंच्या वेदात म्हणजे यजुर्वेदात सांगितलेले असतात. यजुर्वेदाच्या विविध- ञांच्या ब्राह्मणग्रंथाची बारकाईनें तुलना केली असता त्यानीं प्रतिपादिलेल्या ींत अल्प प्रमाणात का होईना, कालसापेक्ष आणि स्थलसापेक्ष विविध दाय आढळून येतात. या संप्रदायांचें स्वरूप अवलोकन करणें आणि त्याच्या तेची कारणमीमांसा करणे मोठें बोधप्रद आहे. विशेषतः कृष्ण यजुर्वेद णे शुक्ल यजुर्वेद यांच्या ब्राह्मणग्रंथांची परस्पर तुलना पहाण्यासारखी आहे. क शाखेचे एक किंवा अनेक श्रौतसूत्रग्रंथ आहेत. ब्राह्मणग्रंथात विस्कळित- अस्पष्टपणें किंवा संक्षेपानें प्रतिपादलेले विधी क्रमानें स्पष्ट आणि तपशील- मांडण्यासाठीं सूत्रग्रंथ लिहिले आहेत. या सूत्रग्रंथाचा त्यांच्या ब्राह्मण- शीं त्याचप्रमाणें परस्पराशीं संबंध कशा प्रकारचा आहे, हा विषय किचकट ा तरी परिवर्तनाच्या दृष्टीनें पहाण्यासारखा आहे. ही परिवर्तनशीलता दित प्रमाणातच आढळावी यात नवल नाहीं. वेदमंत्रांचा संग्रह झाल्यामुळें ग त्यांच्या ठिकाणीं अलौकिक सामर्थ्याची कल्पना केली गेल्यामुळें त्यात तलेल्या विधींची चौकट ओलांडून श्रौत आचारधर्म बाहेर पडणें शक्यच तें. तथापि या मर्यादेतहि तत्कालीन धर्मनिष्ठानीं आपलें विचारस्वातंत्र्य ाचारस्वातंत्र्य प्रकट केलें हें ध्यानात घेण्यासारखें आहे. श्रौतयागासंबंधीं निक प्रयोगग्रंथ झाले त्यांची सूत्रग्रंथांशीं तुलना केली असता असें आढळून कीं, परशाखीय सूत्रांच्या अंशतः अनुकरणामुळें आणि व्यावहारिक परि- ीमुळें त्यांतील विधि स्वशाखीय सूत्रांशीं तंतोतंत जुळणारे असतातच असें

•

याप्रमाणें यज्ञसंस्थेनें वेदकालीं आर्यावर्तावर धार्मिक साम्राज्य प्रस्थापित तरी क्रमाक्रमानें तिलाहि अवनतावस्था आली. यज्ञविधींचें जटिलत्व, पुढा- ग वर्गाची मांसाशनापासून क्रमशः निवृत्ति आणि अनेकदेवतावादापासून रीमताकडे झुकणारा तत्त्वज्ञानाचा कल, हीं त्या अवनतावस्थेचीं प्रमुख

# खाल्डियन सौरसूक्त

( डॉ. रा. ग. हर्षे )

प्रास्ताविक:—

तैग्रीस आणि युफ्रातीस या दोन नद्यांच्या आसपासच्या भूप्रदेशास सांप्रत मे सो पो टे मि या उर्फ इ रा क म्हणतात. या प्रदेशातील इराणी आखातास लागून असलेल्या दक्षिणेकडील भागास प्राचीन काळीं सुमेरिया, खाल्डिया किंवा बाबिलोनिया म्हणत. उत्तरेकडील डोंगराळ भागात असुर लोकांचें राज्य होतें. संशोधकांच्या मतें यांपैकी सुमेरियन लोक आर्यवंशाचे असून खाल्डियन, अक्कडियन, बाबिलोनियन व असुर वगैरे लोक सेमिटिक वंशाचे होत. या सर्व सेमिटिक वंशीयांनीं सुमेरियन संस्कृतीचा थोड्याफार प्रमाणात स्वीकार केल्यामुळें व विशेषत: मिश्रविवाहामुळें बाबिलोनियन काळात बहुधा हे सर्व लोक एकरूप झाले असावेत.

खाल्डियन लोक मूळचे कॉकेशसपर्वताच्या पायथ्याशीं राहणारे आर्यवंशीय लोकच होत असेहि म्हणणारा एक पक्ष आहे. त्याच्या मतें या प्रदेशातून खाल्डियन लोक सुमेरियात गेले. कांहींच्या मतें खाल्डियन लोक मूळचे दक्षिण अरबस्थानात राहणारे सेमिटिक वंशीय लोक असून तेथून ते भटकत भटकत सुमेरियातील सुपीक प्रदेशात स्थायिक होऊन राहिले असावेत. तें कसेंहि असो, या प्रदेशात आधीं राज्य करणाऱ्या सुमेरियन वा असुर राजांनीं पश्चिम इराणातील एलम् ( Elam ) प्रांतापासून तें तहत भूमध्यसमुद्रापर्यंतचा सर्व मुलुख अनेक वेळा पादाक्रांत करून आपलीं साम्राज्यें स्थापिलीं असल्यामुळें या सर्वच प्रदेशात त्यांचे स्मृत्यवशेष पसरलेले आढळतात.

शिवदत्तमिश्रांच्या " शिवकोश " नावाच्या औषधी-द्रव्यकोशाचें संपादन करीत असतां असें दिसून आलें कीं, असुरदेशांतील कित्येक औषधीद्रव्यें फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानात आणलीं जात होतीं व सुमारें ८० औषधीद्रव्यें आयुर्वेदात उल्लिखित असून त्यांचा वापर असुरदेशात खिस्तपूर्व ३००० ते ६६० पर्यंतच्या काळात होत होता. निनेव्हे या बाबिलोनियाच्या प्राचीन राजधानीचे अवशेष खणीत असतां तेथें असुरबनिपाल या राजाचें फार मोठें ग्रंथालय सांपडलें. ह्या ग्रंथालयांत विशेषत: वैद्यक विषयावरील ग्रंथ फार प्राचीन काळापासूनचे उपलब्ध असून त्यांचा काल विद्वानांच्या मतें हम्मुराबीच्या काळापर्यंत निश्चितपणें मागें जातो. ह्यासवर्षांच्या इष्टिकालेखांवर परिश्रम करून कॅम्बेल-

थॉम्सन या सुप्रसिद्ध इंग्रज संशोधकानें सुमारें २५० वनस्पतींचें संशोधन केलें आहे. या २५० पैकीं ८० वनस्पति आयुर्वेदग्रंथात सांपडत असल्यानें असुरदेश व हिंदुस्थान यांचे फार प्राचीन काळापासून दळणवळण होतें हें निर्विवाद सिद्ध होतें, पण यावरून असेंहि अनुमान काढणें शक्य आहे कीं, फार प्राचीन काळीं याच प्रदेशांत भारतीय आर्यांच्या पूर्वजांची वसाहत असल्यामुळें आयुर्वेदाचे अवशेष या प्रदेशात सापडणें स्वाभाविक होय. तशी खरोखरच जर वस्तुस्थिति आढळेल तर जगाचा प्राचीन इतिहास अगदीं वेगळ्या प्रकारें लिहावा लागेल. म्हणून या प्रदेशांतील अद्ययावत् संशोधनाचा अभ्यास करण्याची पदोपदीं आवश्यकता वाटते.

सायप्रस बेटांतील उत्खननात ऋषभदेवाचा जो पंचरसी धातूचा पुतळा सांपडला आहे, तो भारतीय आर्यांच्या इतिहासाच्या दृष्टीनें फार मोठा क्रांतिकारक शोध होय या गोष्टीकडे पाश्चात्य विद्वानांचें अद्याप लक्ष गेलेलें दिसत नाहीं. *"इलस्ट्रेटेड लंडन न्यूज" या मासिकाच्या २७ ऑगस्ट १९४९ च्या* अंकात ( पृ. ३१६-३१७ ) या पुतळ्यासंबंधीं सायप्रस म्यूझिअमचे क्युरेटर श्री. दिकाइओस यांनीं सविस्तर व सचित्र लेख लिहिला असून त्यांच्या मतें हा *पुतळा ख्रिस्तपूर्व कमींत कमी १२५० चा असावा. हा पुतळा* एका मुकुटधारी राजाचा असून त्यास मुकुटाखालीं व कानांच्या वर ऋषभ-दर्शक दोन बाजूस दोन शिंगें दाखविलीं आहेत. या पुतळ्याच्या पदपीठावर 'ऋषभ' ( Reshef ) असें नांव कोरलेलें आहे. परतु *' ऋषभ ' याचा अर्थ न* समजल्यामुळें दिकाइओस यांनीं हा एक अपोलो म्हणजे सूर्यदेवाचा प्रकार असावा असें मोघम म्हटलें आहे. हा देवाचा पंथ कोणता हें त्यांस निश्चितपणें सांगता येत नाहीं.

परतु भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोशांत " ऋषभ " हा एक अतिप्राचीन राजा असून त्याच्या वडिलांचें नांव नाभी व आईचें नांव मेरु देवी असें दिलें आहे. यज्ञ नांवाच्या इंद्रानें आपली जयंती नांवाची मुलगी याला दिली होती व तिच्यापासून याला शंभर पुत्र झाले. त्यांपैकीं ऋषभानें आपल्या 'अजनाभ' नामक राज्याचे नऊ खंड करून ते आपल्या ९ पुत्रास दिले व भरतनांवाच्या दहाव्या पुत्रास त्यांचें अधिराज्य म्हणजे सार्वभौमत्व दिलें अशी कथा भागवतात आली आहे ( भाग्राचको पृ. ८४-८५ ). त्याच्या इतर ९ *पुत्रांचीं* नांवें—१. कवि, २. हरि, ३. *अतंरिक्ष*, ४. प्रबुद्ध, ५. *पिप्पलायन*, ६. आविर्होत्र, ७ द्रुमिल, ८ चमस आणि ९ करभाजन हीं होत. तसेंच त्यांचे ९ राज्यविभाग म्हणजे १ भरत, २ कुशावर्त, ३ इलावर्त, ४ ब्रह्मावर्त, ५ मलयकेतु, ६ भद्रसेन, ७ इन्द्रस्पृश, ८ विदर्भ व ९ कीकट हे होत. ( भा. ५-३-६ ).

याच ऋषभाचा तपास सायप्रस बेटात लागतो की काय तें आपणास पहावयाचें आहे. प्रो. साइस यांनीं संपादित केलेल्या क्युनिक संग्रहांतील इष्टिका लेखांची जी वर्णनात्मक सूचि केलेली आहे त्या सूचीच्या पांचव्या खंडात पृ. २१६२ वर आपणास "Rasappa (Variants Rasapa, Rasapi)–city and district of Rezeph" असा उल्लेख आढळतो तो महत्त्वाचा आहे. 'ऋषभ' आणि 'रपप' किंवा 'रपप्प' यातील ध्वनिसाम्य कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

प्राचीन उल्लेखात ऋषभ हा नाभीचा मुलगा होता असें म्हटलें आहे. हा नाभि प्रियव्रतपुत्र आग्नीध्र यास पूर्वचिति अप्सरेपासून झाला. स्वत प्रियव्रत हा स्वायंभुवमनूचा पुत्र किंवा आद्यदेवापैकीं एक समजला जातो (भाग्राचको ३६२). हा एकदां मेरूभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असता याच्या तेजानें सूर्यप्रकाश नसलेल्या भागावर सूर्यासारखा प्रकाश पडत असे अशी कथा सापडते. साइसकृत उपरिनिर्दिष्ट वर्णनसूचींत (पुरवणी खड, पृ. २४९) Nabu हें एक देवाचें नांव म्हणून दिलें असून तें बहुधा सूर्यदेवतेशीं संबद्ध असावें असें संदर्भावरून दिसतें. ऋग्वेदात उल्लेखिलेला नाभ किंवा नाभाक हा वैवस्वत मनूचा पुत्र होता असें म्हटलें आहे (भाग्राचको. २९६) म्हणजे तो सूर्याचा नातूच होय. नाभ, नाभाक (ऋ. ८. ३९. ४२, ८. ४१. २), नाभाग, नाभानेदिष्ट मानव (ऋ. १०. ६१-६२), नाभि, नाभिगुप्त इत्यादि अनेक प्राचीन नावांचा 'नाभ' शब्दाशीं संबंध असून ते सर्व सूर्यवंशीच होते असें दिसून येईल.

साइसच्या सूचीवरून Nabatu किंवा Nabatai हें एका आरामियन टोळीचें (Aramean tribe) नांव असल्याचें आढळतें. त्याचप्रमाणें (पृ २११७) Nabatea किंवा Nabayati हें देशाचें नाव आहे (पृ. २११८). फार कशाला? Nabonidus असेंच ख्रिस्तपूर्व ५३८ ५३५ च्या सुमारास होऊन गेलेल्या एका बाबिलोनियन राजाचें नांव सांपडतें. त्याचें नाभानेदिष्टाशीं आश्चर्यकारक साम्य आहे. किंबहुना, Nabo, Nabu हा शब्द प्रारंभीं असलेलीं सुमारें ३०० नांवें या सूचींत दिलीं आहेत.

आतां मेरुदेवीसंबंधीं असें दिसतें कीं, ती मेरुपर्वताची कन्या होती. Muru किंवा Murua हें एका बाबिलोनियन शहराचें नांव होतें. (पृ. २११५). Maru हें एक मीडियातील नगर होतें. (पृ. २१११). मेरूची दुसरी मुलगी 'नारी' ही आग्नीध्राचाच दुसरा मुलगा कुरु याला दिली होती, मीडियाच्या दक्षिणेस व असीरियाच्या उत्तरेस असलेल्या प्रदेशास

Nairi ( Variants Na' iri Na' ri ) हें नाव दिलेलें आहे, 'कुरु' हें नांव जरी विचारात घेतलें तरी कुरुश ( Kuras ) हा एक बाबिलोनियन राजा होता, ( खि. पू. ५३८ ५२९ ). त्याहिपेक्षा अरनन ( सायप्रस ) बेटावरील एका शहराचें नाव कुरी ( Kurī ) असल्याचें आढळतें. कुरीर हा एक देश आहे. 'क'चा कधीं कधीं ग होतो हा नियम लक्षात घेतल्यास Kurukirra किंवा Gurukirra हें एलम्‌मधील शहराचें नाव दिसतें. Gura Simmu हा एक आरामियन प्रांत होता, Gurumai, ( Gurumi, Gurumu ) ही एक आरामियन टोळी होती, इत्यादि उल्लेख सापडतात.

आतां खुद्द ऋषभाचा विचार करावयाचा झाला तर तो इन्द्र आदित्याचा पुत्र होता असा एक उल्लेख भागवतात आढळतो ( ६ १८ ७ ). म्हणून श्री. दिकाइओस यांनीं मानलेला आपोलोचा एक प्रकार असेंहि त्याच सबोधण्यात काहीं अडचण येत नाहीं.

पौराणिक ऋषभराजाच्या दहा मुलांपैकीं काहींचा पत्ता येथें लागतो. कवि ऊर्फ Kabi ( कवि ) ही एक आरामियन टोळी आहे ( पृ. २०६७ ) दुसरा मुलगा 'चमस', याचें रूपान्तर ( Shamash ) 'शमश' झालें असेल असें मानल्यास तें तर सुमेरियन सूर्य देवतेचें नाव असून अनेक राजांनीं तें स्वीकारलें आहे. तिसरा मुलगा 'हरि' याच्या नावाशीं संबद्ध असलेले उल्लेख पुढीलप्रमाणें – Haria—Country, Haridi (Variant Haridu, Harudu) –City in the Country of Suhu ( A province on the Euphrates between Balihi and Habur), Harilia-Aramean tribe इत्यादि. भरत हें नांव वेगवेगळ्या काळीं होऊन गेलेल्या व्यक्तींचें नांव आहे. ऋग्वेदातील उल्लेखावरून त लोकनामहि असावें ( ऋ. ३· ३३· ११–१२, ७· ३३· ६ ) ऋषभपुत्र भरताशीं जुळेल असें नाव Burutu–A City in Elam किंवा विशेषत Birati ( variants Burati, Birat, Birti, Birtu )–A Babylonian City and Province ( पृ. १९९३ ) हें होय. अशी हीं नांवें पाहू गेल्यास किती तरी जुने संबध न्यानें प्रस्थापित होण्याची शक्यता आहे असें वरील नामसादृश्यावरून दिसतें परंतु ज्या अर्थी हित्ति आणि मितन्नी या दोन्ही देशातील राजाच्या तहनाम्यात इन्द्र, वरुण व नासत्य इत्यादि भारतीय आर्यांच्या देवांच्या नांवांचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे ( Ancient Near Eastern Texts , by James B Pritchard, p 206) , त्या अर्थी भारतीय आर्यांच्या पूर्वजांची' या मार्गात वसाहत होती याबद्दल संशय

घेण्यास जागा उरत नाहीं व वरील नामसादृश्याचे अनेक पुरावे त्याच सिद्धान्तास जवळकटी आणतात. प्राचीन इतिहासासंबंधींच्या भारतीय उल्लेखाप्रमाणें आद्य प्रजापति जे भृगु, आंगिरस, पुलह्, क्रतु, वसिष्ठ, अत्रि, पुलस्त्य, मरीची (कश्यप), प्राचेतस, दक्ष इत्यादींचीं कुलनामें ऊर्फ गोत्रें, प्रवर व त्या त्या कुलांत होऊन गेलेले प्रसिद्ध पुरुष यांच्या नांवाचा मागोवा घेत गेल्यास त्यांपैकीं या प्रदेशांत पुष्कळच नांवें सांपडण्यासारखीं आहेत, पण तो प्रस्तुत निबंधाचा विषय नसल्यानें आतां नामसादृश्याबरोबरच कांहीं वैचारिक व सांस्कृतिक साम्याच्या दृष्टीनें खाल्डियन भाषेंतील एका सौरसूक्ताचा परामर्श घ्यावयाचा आहे :

सौरसूक्त —हें सौरसूक्त ब्रिटिश म्यूझिअममध्यें संग्रहीत केलेल्या इष्टिकालेखांपैकीं K 256 या इष्टिकेवर कोरलेलें असून त्याचें छायाचित्र "Cuneiform Inscriptions of Western Asia" (पश्चिम आशियातील शरलिपींतील इष्टिकालेख) खंड ४ या यातील आकृति १७ मध्यें दिलें आहे. प्रसिद्ध फ्रेंच पंडित फ्रॉंस्वा लनॉर्माँ (Fransois Lenormant) यानें परिश्रमपूर्वक या सौरसूक्ताचा अक्काडियन मूळ व त्याचें असीरियन भाषान्तर यांच्या आधारें अर्थ लावून स्वतःच्या विस्तृत टिप्पण्या देऊन 'जर्नाल आझिआतिक' (Journal Asiatique) या फ्रेंच मासिकाच्या सन १८७८-७९ खंड १२ १३ यांत आपला लेख प्रसिद्ध केला आहे. तो अनेक दृष्टीनें उद्‌बोधक वाटल्यावरून त्याच्या आधारानें हा लेख लिहिला आहे. परंतु सुमेरियन भाषासमूहाच्या अभ्यासकास संस्कृतादि भाषांचें ज्ञान संपादन करणें अवघड असल्यानें त्याच्या लेखांत न आलेली बाजू येथें दिग्दर्शित करण्याचा प्रमुख उद्देश आहे

या सौरसूक्ताचा छंद कोणता तें गाढ अभ्यासाभावीं निश्चित करणें कठीण आहे. परंतु त्यांतील पुनरावृत्त चरणावरून व शेवटच्या ओळींतील गायकस्तोत्याच्या उल्लेखावरून हें सूक्त गायिलें गेलें असावें असें स्पष्ट दिसतें. या लेखांत प्रथम शरलिपींतील मूळ संहिता उध्दृत करून नंतर टीका व अर्थ असा क्रम स्वीकारला आहे हें सर्वच सौरसूक्त संपूर्णतया उपलब्ध नाहीं त्याचा झिजलेला व फुटलेला किंवा न लागण्यासारखा भाग कोणता तें संहिता देतांना मराठी शब्दोच्चारांत ठिपक्यांनीं दर्शविलें आहे, त्यावरून कल्पना येईल. त्रुटित ओळींमुळें अर्थहानि ज्याच ठिकाणीं झाली आहे व १६ ते २० या ओळी कायमच्याच नष्ट झालेल्या आहेत. शिवाय शब्दांचे उच्चार व अर्थ यांबद्दलची निश्चितता त्या काळीं आलेली नसल्यामुळें त्यांत मतभेदाला वाव आहे यांतील प्रत्येक शब्दाचा शब्दशः अर्थ सर्वत्र दिलेला नाहीं. कित्येक ठिकाणीं लनॉर्माँ यांनीं आपल्या

टीकेंत स्पष्ट रीतीनें प्रत्येक शब्दाचें स्पष्टीकरण केलेलें नाहीं. त्यांनी केलेली सोदाहरण चिकित्सा लक्षात घेऊन अर्थ दिलेला आहे. हें सौरसूक्त उघृत करताना दिलेले आंकडे ओळींचे आहेत, चरणाचे नव्हेत :

(१) एनि गल् अन-सा अझगत उदुदुग्रु ने

टीका:—एनि = ईश्वर. नेहमीं वापरांत असणारा शब्द 'एनु' असा आहे. संस्कृतमध्येंहि इन = ईश्वर असा अर्थ असून (MW. 139) या वैदिक शब्दाचा उपयोग इन्द्र ('केनिपानामिनो वृधे'—ऋ १०·४४·४), अग्नि ('इनो राजन्नरतिः समिद्धो'— ऋ. १०·३·१), पूषन् (इनो वाजाना पतिहिनः पुष्टीनाम्'—ऋ. १०·२६·७) इत्यादि देवतांच्या वार्नर्तीत अनेकदा केलेला आढळतो. सायणाचार्य 'इनः ईश्वरः' असाच अर्थ देतात (ऋ. १०·३·१). हें शब्दसाम्य लक्षांत घेण्यासारखें आहे. शिवाय 'एनी' हा शब्द देखील ऋग्वेदात सापडतो व तेथें सायणाचार्यांनी 'श्वेता दीप्तिः' असा अर्थ केला आहे (ऋ. १०·१२·३, ७५·७). गल् = मोठा, महान्, श्रेष्ठ. हा शब्द 'गुल्' व 'गुलु' असाहि आढळतो. 'रलयोरभेदः' हा नियम येथें लावला तर अर्थहानि न होता 'गुलु'चा संस्कृत पर्यायशब्द 'गुरु' हा होऊ शकेल. अन-सा = आकाशाच्या मध्यावर. अझगत = प्रकाशयुक्त. उदुदुग्रु = तुझ्या (प्रत्येक) उदय प्रसगीं. यात मूळ शब्द 'उदुदु' असा असून त्याचा अर्थ 'बाहेर येणें, उदयास येणें' असा आहे. त्याच्याहि मागें जाऊन पाहिल्यास त्याची व्युत्पत्ति उद् + दु, उत् + दु = सूर्य + जाणें = सूर्याचें बाहेर येणें. अशी लावता येण्यासारखी आहे. संस्कृतांतहि उद् + इ किंवा उद् + यम् हा समानार्थक धातु आहे व सामान्यतः त्याचा उपयोग सूर्यनक्षत्रादिकाच्या उदयप्रसगीं करतात. ग्रु = तुझ्या. 'ने' हा शब्द 'एने' असा लिहावयास पाहिजे, परंतु पुष्कळ वेळा प्रारंभींचा स्वर गाळूनच तो वापरला जातो. याचा अर्थ 'ते', 'हे' असा (बहुवचनीं) करता येईल. येथें आपणास संस्कृतांतील 'एतत्' या दर्शक सर्वनामाच्या पर्यायरूपांची आठवण होईल व 'एते' बद्दल प्राचीनकाळीं 'एने' असें रूप वापरीत असल्याची शक्यता वाटते.

अर्थ·— "प्रकाशमय अन्तरिक्षांत मध्यवर्ती असणाऱ्या हे परमेश्वरा, तुझ्या प्रत्येक उदयप्रसगीं — "

(२) तदशक् दुन् तनु अन-सा अझगत उदुदुग्रु ने.

टीका:— तदशक् = शूर, पराक्रमी. मूळ शब्द 'तस् + शक्' तस् = खड करणें, विरुद्ध असणें-जाणें, + शक् = प्रमुख = वडसोर-पुढारी. संस्कृतमध्येंहि 'तस्' धातूचा अर्थ MW मध्यें to throw down (खालीं टाकणें), *to*

reject ( नाकारणें ), cast ( फेकणें, टाकून देणें) असा आहे (पृ. ३६७). त्याचप्रमाणें स. शक्–समर्थ असणें यापासून सामर्थ्यशाली असा अर्थ होऊं शकतो. दुन्=शूर, उदारधी, ईश्वर. हें विशेषण नेहमीं सूर्यास लावलेलें आढळतें. पृथ्वीपति असाहि त्याचा अर्थ करतां येईल. संस्कृतमध्येंहि दु–दुनोति या धातूचा अर्थ भाजणें, जाळणें असा आहे व तो सूर्याला किंवा अग्नीला उद्देशून प्रथमतः असण्याची शक्यता आहे. विशेषतः सुमेरियातील भयंकर उन्हाळा निःसंशय तापदायकच असल्यानें तो अर्थ अधिक अन्वर्थक होईल व उष्णतेमुळें पिकें, धनधान्यादि संभवतात म्हणून त्यास उदारधी, ईश्वर वगैरे मागाहून म्हटलें असण्याचाहि संभव आहे. उतु = सूर्य. संस्कृतांत ' ऊतु ' याचा अर्थ पोषणकर्ता, रक्षणकर्ता, प्रिय, आवडता असा आहे. (MW. 176) व तो लक्षणेनें सूर्यास लावता येईल. ऊत किंवा ओत + प्रोत हे शब्द ज्याच्यापासून निघाले आहेत त्या वे = विणणें या धातूचा दुसरा अर्थ झांकणें, आच्छादणें, अवगुंठित करणें असा असून आपल्या किरणांनीं सर्व जगाला झाकून टाकणारा किंवा आच्छादित करणारा म्हणून सूर्यास 'ऊतु' हा शब्द लावला असण्याचा संभव आहे. पुढील शब्दाची फोड वर केलीच आहे.

अर्थ—" प्रकाशमय अन्तरिक्षात मध्यवर्ती असणाऱ्या हे पराक्रमी वीर पुरुषा, सूर्यदेवा, तुझ्या प्रत्येक उदयप्रसंगीं —"

(३) सिगर् अन अन्नागत दु गर् दु अन......शु ने

टीका—सिगर् – अर्गलास्तम्भ, अडसर, अन = आकाशाचे. अन्नागत = प्रकाशमय, प्रकाशातील, दु = द्वार. दुर् = द्वार हा वैदिक शब्द आहे : 'दुर' यज्ञद्वाराणि, ( सायण, ऋ. ७·२·५ ); 'दुरः द्वाराणि' ( सायण ऋ. ७·९·२ ) इत्यादि अनेक उल्लेख. गर् = जें. दु = उघडतें. स. दु–दवति = जाणें, हलणें. या धातूचा वरील 'दु'शीं संबंध असणें असंभवनीय नाहीं. (MW 418)

अर्थ—"तुझ्या उदयप्रसंगीं प्रकाशमय अन्तरिक्षातील जो दरवाजा उघडतो त्याच्या अडसरामोंवतीं (?) —"

(४) सुदिम् (?) अन अन्नागत... . शु ने

टीका—'सुदिम्' या शब्दाचा अर्थ त्याच्या असीरियन भाषान्तराचा विचार केल्यास ' दाराचा अडसर ' असा होतो.

अर्थ—" तुझ्या (उदयप्रसंगीं) प्रकाशमय अन्तरिक्षातील दाराच्या अडसरामोंवतीं —"

(५) इक् गल् अन अझग्गत इक्–सनुराश्तु ने

टीका—'इक्'चा मूळ अर्थ दरवाजाच्या वर चढावयाच्या पायऱ्या असा आहे. त्यावरून 'दरवाजा' असा अर्थ येथें अभिप्रेत दिसतो. गल् = मोठा, विस्तीर्ण. अन = आकाशातील. इक्–सनुरा॒उ इक्–सनुरा = दरवाजा+उघडणें. श्तु = तूं, तुझा. इक्–सनुरात्श्तु ने = तू तुझा तो दरवाजा उघडीत असतां.

अर्थ—" प्रकाशमय अन्तरिक्षाचा भव्य दरवाजा तू उघडीत असता–"

(६)...मर् अन अझग्गत पप् रश्ह्गु ने

टीका—'मर्' याचा अर्थ 'पुष्कळ, असंख्य' असाहि करतात. पण येथें 'अतिशय उच' असा अर्थ घेतला पाहिजे. कारण त्याच अर्थानें या शब्दाचा अनेक ठिकाणीं वापर केलेला आढळतो. 'उच्चपदस्थ श्रेष्ठ' अर्थे त्याचें अस्सीरियन भाषान्तर करण्यांत येतें. याचा पर्याय शब्द 'मर्हु' असा असून त्याचाहि अर्थ 'अतिशय उच, अतिशय भव्य, असंख्य' असा होतो. 'ह' चा उच्चार सेमिटिक भाषांत 'स' असा करण्याची प्रवृत्ति आहे. या ठिकाणीं वैदिक 'महस्' या शब्दाची आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं. 'महो दिवः' (ऋ. २·१·६) = 'महतो द्युलोकात्', 'महे अत्याय' (ऋ.३·७·९) = 'सर्वान् अतिक्रम्य',, 'महः पार्थिवस्य' (ऋ. ५·४१·१) = 'महः महतः पार्थिवस्य' या ठिकाणीं वरील तीन्हीं अर्थांनीं 'महस्' शब्द वैदिक संस्कृतांत वापरला जातो. पप्रश्ह्गु = जलद चालणारा प्रवासी.

अर्थ—" प्रकाशमय अन्तरिक्षातील सर्वांत उच्च अशा प्रदेशातून तू वेगानें प्रवास करीत असता —"

(७)...... खुश्नीएस् ......ने समुरदन्–सर्सर

टीका खुल् = हर्ष, आनंद. वैदिक ' खुद् ' हा धातु उच्छृंखल क्रीडा करणें, शृंगारचेष्टा करणें या अर्थी आहे ( MW 276 ) त्याचें ' खुल् ' शीं साम्य दिसतें ( ऋ. १०· १०१· १२ : ' खुदत खुर्दत क्रीडयत ' ) खुश्नीएस् = आनंदानें.. समुरदन् सर्सर : सर = पुढें सरणें किंवा सारणें ( स. सृ = सरणें ) याचें द्विरुक्तरूप ' सर्सर. ' त्याचा अर्थ जवळ येणें, जवळ जाऊन पोंचणें. समुरदन्–सर्सर = तुझ्या भोंवतीं सर्वजण एकत्र येऊन गर्दी करतात.

अर्थ— " ( स्वर्गातील देवदूत ) आदरानें व आनंदानें तुझ्या भोंवतीं गर्दी करतात. "

( ८ ) निन् मेन्नवि उल्लिएस् समुरदष्लगिएस्

टीका– निन्–हा देवीवाचक शब्द आहे. ' मेन्नवि ' यातील ' वि ' हा

प्रत्यय आहे. ' मेन्न ' हा शब्द वस्तुतः ' अमि एन्न ' असा पाहिजे. अमिअ = मुकुट. ' अमिअ एन्न ' किंवा ' मेन्न ' = देवानीं घालावयाचा उच्च मुकुट. वैदिक ' अम् ' हा धातु या संबधात चिन्त्य वाटेल. ' अमः ' याचा अर्थ ' सर्वतो गमनशील बलम् ' असा सायणाचार्य करतात ( ऋ. ८· ९३· १४ ), व तो देवास लागू पडणारा आहे. याच्या ' अमित ' या धातुसाधिताचा अर्थ splendour, glitter, a splendid shape असा आढळतो ( MW. 74 ). अमिताभ या नावाचा एक देवगणहि आहे. रत्नादिकामुळें प्रकाशमान असणाऱ्या मुकुटावरूनच देवाचा बोध होत असावा. उलिअस्–आनदोत्सवानें, समारभानें. समुदब्लगिएस–तुला शरीरावर घेऊन जातात.

अर्थ––मुकुटधारिणी देवीचे सेवक तुला समारभानें ( तिच्याकडे ) नेतात. (या ठिकाणीं अस्सीरियन भाषान्तरात ही देवी म्हणजे अदिति होय असें म्हटलें आहे. तिचें अस्सीरियन नांव 'बेलित इलि' (Belit-ili) असें आहे.)

( ९ ) खिलि साह्रुत कूव उद सरदहुगुव्

टीका––' खिलि ' या शब्दाचा अर्थ विशिष्ट सदर्भात किंवा सामासिक शब्दात वेगवेगळा करतात. खिलि = सुदर, प्रकाशणारा, भव्य. ' खिलिब ' किंवा ' खिलिबु ' हा शब्द देवनिदर्शक आहे. स्त्रीचें सौन्दर्य, सुकुमारता किंवा आकर्षक रमणीयता दर्शविण्यास ' खिलि ' शब्दाचा उपयोग करण्यात येतो; पण येथें मात्र त्याचा अर्थ 'आनद' असा आहे. साह्रुत = तुझ्या हृदयांतील. कूव= शांतपणानें, अविरोधानें. कदाचित् स. कु = अस्पष्ट आवाज करणे, गुणगुणणें या धातूशीं कूव शब्दाचा सबध जोडता येईल. किंवा वैदिक 'कुवित्' =(बहुशः ऋ. ६·४२·४ ) –'पुष्कळांच्या अनुमतीनें'–शब्दाशीं तो अधिक जवळचा असण्याची शक्यता आहे. उद्=दिवस. त्याचेंच दृढीकरण=उद. सरदहुगुव्–तो तुझ्यासाठीं निश्चित करतो.

अर्थ—तुझ्या अन्त.करणाला आनद देण्यासाठीं तुझ्या उदयास्ताचे दिवस अविरोधीपणानें तो ( स्वर्गाधिपति ? ) निश्चित करतो. ( यांतील कल्पना नीट लक्षात येत नाहीं. )

(१०) .....सर गह्रगे लुब्बर इश्नवाकेने

टीका—सर=समूह. गह्रगे–मन्ययेनें, मोठेपणानें. लुब्बर ( लब्बर ? )= पाहण्याची क्रिया. इश्नवाकेने = ते + ती + करतात. आक् = करणें.

अर्थ—( देवांचे वा मानवांचे ) ते थवेच्या थवे तुझें अतृप्त मनानें ( अभाशीपणानें ) दर्शन घेतात.

(११) .....समुरदल्लगिएस

अर्थ—( स्वर्गातील व पृथ्वीतील देवता ) तुला बरोबर घेऊन जातात.

(१२) .....गूअस वर सिनर् रि एन्

टीका—गूअस = आज्ञेनें. वर=निर्णय. सिनररि = तो त्याच्यासाठीं निश्चित करतो. एन् = नियमानें.

अर्थ—त्याच्या संबंधींचे निर्णय तो नियमानें घेत असतो.

(१३) .....इने मिनिन् वर्रि एन्

टीका—इने = कृपा. मिनिन् वर्रि = तो त्याला देतो. एन्–नियमानें.

अर्थ—तो त्याच्यावर रात्रीनें अनुग्रह करतो.

(१४) ........गे वदिन्वि एन्

अर्थ—तो नियमानें घेत असतो.

( १५ ) ........शि बनिव् शिदिए

अर्थ— तो त्याला मार्गदर्शन करतो.

( १६ ते २० पर्यंतच्या ओळींचा काहींच अर्थ लागत नाहीं. )

( २१ ) एने मए मुन्सिड्ड एन्

टीका— एने = ईश्वरानें. मए = मी, मला. मुन्सिड्ड = मला पाठविलें आहे. 'मह्य' किंवा 'मम मे' या संस्कृत रूपाची 'मए'शीं तुलना करण्यासारखी आहे. 'माझ्याविषयीं म्हणशील तर' अशा अर्थानें येथें 'मए' हा शब्द आला आहे.

*अर्थ— माझ्या विषयीं म्हणशील तर ईश्वरानें मला पाठविलें आहे.*

( २२ ) एनि गल् मुल्–कीगे मए मुन्सिड्ड एन्

टीका— एनि गल् = परमश्रेष्ठ देव. मुल कीगे = पृथ्वीपति राजा वरुण ( Ea एअ ). मए = मी, मला, मुन्सिड्ड = मला पाठविला आहे. एन् = बरोबर.

अर्थ— मजविषयीं म्हणशील तर मला परमश्रेष्ठ भगवान् वरुणानें पाठविलें आहे.

( २३ ) उअगुन्वि गूवि अइअव गुअस् वर्रि वर्रवि

टीका— उअगुन्वि = आणि + निश्चित कर + त्याच्या संबंधीं. येथें उअ = व = आणि. हा मराठींतील शब्द येथें स्पष्ट दिसतो. पण 'उअ' या रूपावरून त्याचा वैदिक 'उत' शब्दाशीं संबंध पोंचतो कीं काय तें पा-

शिलात शिरून पाहिलें पाहिजे. पुबि = आशा + त्याची. अडुअयू = समजून घाग + त्याला. गुअम् = आशा करीत. वर्बि = निर्णय + त्याचा. घरूबि = निश्चित कर + त्याच्यासाठीं.

अर्थ— त्याच्यासबधीं जें कांहीं असेल तें निश्चित कर; त्याविषयीं त्याला आशा कर; पण त्याच्याबद्दलचा निश्चित निर्णय घे.

(२४) झए अल्दुन्नस शक् मिग शि यनिवृशिदिए

टीका— झए = तूं. अल्दुन्नस् = जात असता. शक् मिग = मानव जात. शि यनिवृशिदिए = तू तिला मार्गदर्शन करतोस.

अर्थ— तू तुझ्या प्रवासात मानव जातीला मार्गदर्शन करतोस.

(२५) सेर्झि शिलिम उअगर्‌रब गर्गिगवि खबुनिवृशिदिए

टीका— सेर्झि = एक किरण. शिलिम = शातीचा. उअगर्‌रब = आणि + कर + त्याला. 'क' बद्दल 'ग' अनेक वेळा वापरला जातो हा अक्कडियन भाषेतील नियम लक्षात घेता 'गर्' हा सस्कृत 'कृ' चा अपभ्रंश दिसतो. गर्गिगवि = दुःख + त्याचें. खबुनिवृशिदिए = कां कीं तो त्याला त्यातून बरा करील.

अर्थ—तुझ्या शान्तिकिरणाचा प्रकाश त्याच्यावर पडू दे व त्याची व्याधि दूर होऊ दे.

(२६) मुलु दू दिङ्गिरन् दुंनलुम् (?) नमृतग्ग अन् किन् किन्

टीका—मुलु = मनुष्य. दू = मुलगा. 'दुहिता' ह्या शब्दाची व्युत्पत्ति 'दुह्' या धातूपासून करण्याचा प्रयात आहे. परतु 'दू' = मुलगा हा अर्थ लक्षात घेतला तर 'पुत्र नसल्यास पुत्राप्रमाणें हितकारिणी असणारी' ही व्युत्पत्ति अधिक अन्वर्थक होईल असें वाटते! दिङ्गिरन् = देवाचा + मुलगा. दुनलुम् = चुका. नमृतग्ग = अत्याचार. अन् किन् किन् = त्यानें (तुझ्यापुढें) ठेविले आहेत.

अर्थ—देवाचें अपत्य असलेल्या या मानवानें तुझ्यासमोर आपल्या चुका व आपलीं दुष्कृत्यें माडलीं आहेत.

(२७) कत् अरिक् (?) बि गिग् बनाकेस गिग् (ग) बि तुर बना.

टीका—कत् - अरिकृबि = त्याचे हात आणि पाय. गिग् = दुःख. बनाकेस् = ते + त्याला करतात. गिग् (ग) बि = वेदनायुक्त. तुर = व्याधि. याच्याशीं सवादी असा "आतुर" हा सस्कृत शब्द येथें आठवतो. 'तुर'

ब्दाचा अस्सीरियन पर्यायशब्द 'मर्षु' असा आहे. तोहि 'मृष्'—सहन करणें,
सिणें याच्याशीं संबद्ध दिसतो. बना = अपवित्र करतें.

अर्थ—त्याच्या हाताच्या आणि पायाच्या व्याधीनें त्याला अतोनात
दना होत असून या व्याधीनें त्याचें शरीर अपवित्र व मलिन झालें आहे.

२८) उतु गर् कन्-गल्मु गनिम्-सिलल्

टीका—उतु = सूर्य. गर् = कृति. कत्-गल्मु = हाताच्या उच
रण्यानें + माझ्या. गनिम्-सिलल् = तूं लक्ष देशील.

*अर्थ—हे सूर्यदेवा, मी माझे हात वर करून तुझी प्रार्थना करीत असता*
(इकडे) लक्ष दे.

२९) गर्बि कुञ शिगिरसे शिगिरसे रन दिङ्गिर गन मुन्गर्रब.

टीका—गर्बि = अन्न + त्याचें. येथें 'गर्' हा शब्द उघड संस्कृत
ृ' गिळणें पासून आलेला दिसतो. कुञ = खा. संस्कृत 'कु' शब्द करणें
वातांना) किंवा 'कृ' हलविणें हे अर्थ लक्षांत घेतां त्यांचा संबंध जोडता
ईल. शिगिरसे = बळी. रन = स्वीकार कर. वैदिक रन् = अर्पण करणें,
णें (ऋ. १·१२०·७) हा धातु स्पष्ट आहे. दिङ्गिर = देव. गन = हातात
त्याच्या. मुन्गर्रब = त्याला कर.

अर्थ—त्यानें अर्पण केलेलें अन्न खा, त्यानें दिलेल्या बळीचा स्वीकार
र. त्याला ईश्वराचा (आधार देणारा) हात मिळू दे.

३०) दुगग्गुत दुनलुम् (?) बि गङ्गब्गब् नम्तग्गबि गन्झिझि

टीका—दुगग्गुत = आज्ञा + तुझ्या + करून. दुनलुबि = चुका +
याच्या. गङ्गब्गब् = (तू) क्षमा करशील. नम्तग्गबि=अपकृत्य त्याचें. गन्झिझि
(तूं) दूर करशील.

अर्थ—तुझ्या आज्ञेनें त्याच्या चुकाबद्दल क्षमा कर व त्याचें पाप नाहींसें कर.

३१) नम्खल्बि खबन्बर् तुरनिकु खबन्तिले एन्

टीका—नम्खल्बि = दुर्दैव + त्याचे. खबन्बर =तो + तें +भल्यासाठीं
रील (बदलील). तुरनिकु=व्याधि + त्याची + करिता. खबन्तिले = तो +
ला + जगू देईल. एन् = निश्चितपणें.

अर्थ—त्याच्या दुर्दैवाचें सुस्थितींत परिवर्तन होऊ दे. रोगापासून मुक्त
ऊन तो जगू दे.

३२) लुगल्बि गनेन्तिले

टीका—लुगल्बि=त्या राजाला. गनेन्तिले=पुनर्जीवन लाभो.

अर्थ--त्या राजाला जीवदान दे.

(३३) एने उद् अवृतिल नमखुशु गनिष्वि

टीका--एने=तर मग; नतर. उद्=दिवस. अवृतिल=तो जगेल. नमखुशु=उदारता + तुझी. गनिश्वि=ती (त्याला) झाकून टाकील.

अर्थ--नतर त्याचा (रोगातून) पुनर्जन्म होऊन तो बरा झाल्यावर तुझ्या कृपेचें छत्र ( आच्छादन ) त्याच्यावर असू दे.

(३४) लुगल्वि कातरुशु गनेनशिले

टीका--लुगल्वि = तो राजा. कातरुशु = अवनम्र + तुझ्यापुढें. गनेन्शिले = (तू) + त्याला + मार्गदर्शन कर.

अर्थ--तुला शरण आलेल्या या राजाला तू मार्गदर्शन कर.

(३५) उश्र मए एरिशु गतर्शु गनेनशिले

टीका--उश्र=आणि. मए =मी जो. एरिशु = सेवक + तुझा. गतर्शु = अवनम्र + तुझ्यापुढें. गनेन्शिले = (तू) + त्याला + मार्गदर्शन कर.

अर्थ--आणि तुझा शरणागत सेवक जो मी ( स्तोता ) गायक, त्या मला तुझें मार्गदर्शन लाभो.

या खाल्डियन सौरसूक्तातील कित्येक महत्त्वाच्या कल्पना देखील ( केवळ काहीं शब्द नव्हेत ) आपल्या वैदिक सौरसूक्तात आढळतात ही आश्चर्याची गोष्ट आहे. त्या कल्पना कोणत्या तें क्रमवार पाहूः

१. प्रकाशमय अन्तरिक्ष (ओळी : १, २, ३, ४, ५, ६) × — 'विश्वमाभासि रोचनम्' (ऋ. १·५०·४) = (सायण) – " विश्वं व्याप्त रोचन रोचमान अन्तरिक्षम् आ समन्तात् भासि प्रकाशयसि."

२. प्रकाशमय अन्तरिक्षात मध्यवर्ती असणाऱ्या (ओ. १–२) × 'नृचक्षा एष दिवो मध्य आस्ते' (ऋ. १०·१३९·२) = (सा०)–" नॄन् मनुष्यान् पश्यन...एष सविता द्युलोकस्य मध्ये आस्ते निषीदति."

३. अन्तरिक्षातील सर्वांत उच्च प्रदेशातून वेगानें प्रवास करणारा (ओ. ६) × – ' आ देवो याति सविता परावतो ' (ऋ. १·३५·३) = (सा०) – " सविता देव .. परावत· दूरदेशात् द्युलोकात् आयाति." वेगवत्त्वाबद्दल 'तरणि.' या शब्दावरील (ऋ. १·५०·४) सायणभाष्यः 'हे सूर्य, त्व तरणिः तरिता अन्येन गन्तुमशक्यस्य महतोऽध्वनो गन्ता असि। तथा च स्मर्यते- 'योजनानां सहस्रे द्वे द्वे शते द्वे च योजने। एकेन निमिषार्धेन क्रममाण नमोऽस्तु ते.'

४. स्वर्गातील देवदूत तुझ्याभोंवतीं गर्दी करतात (ओ. ७) X देवदूतांची कल्पना आपल्याकडे नाहीं. तथापि तत्सदृश कल्पना आपणांस 'चित्रं देवानामुदगादनीकं' (ऋ. १·११५·१) या ऋचेंत काहींशी सांपडेल : (सा०) – "देवानाम्...अनीक समूहरूपं चित्रम् आश्चर्यकरं सूर्यस्य मण्डल उदगात् उदयाचलं प्राप्तमासीत्."

५. मुकुटधारिणी देवीचे सेवक तुला समारभानें तिच्याकडे नेतात. (ओ. ८ व ११)–येथें मुळातच दोन भिन्न मतें समवतात. असीरियन भाषान्तरात ही देवी देवजननी अदिति " Créatrice des dieux " असें म्हटलें आहे. कदाचित् ती उषा देखील असेल ! परतु या दोन्ही कल्पना ऋग्वेदात आढळतात. पूषन्ला 'मातुर्दिधिषु' हें विशेषण लावलेलें आहे. 'मातुर्दिधिषुम ब्रव (ऋ. ६·५५·५). वस्तुत: पूषन् हाहि द्वादशादित्यांपैकींच एक असल्यामुळें 'मातुः' याचा " निर्मात्र्याः रात्रेः दिधिषुं पतिं पूषणम् अब्रवम् " असा जो सायणाचार्यांनीं अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं. तो अदितीकडेच घेणें स्वाभाविक होईल. कारण अदितीला 'सव देवस्य सवितुर्दुषाणा' असें अन्यत्र म्हटलें आहे (ऋ. ७·३८·४). पण येथें अश्लील अर्थ घेतलाच पाहिजे असें नाहीं. उषेच्या संबधात दोन तीन उल्लेख महत्त्वाचे आहेत : 'स्वसुर्यो जार उच्यते' (ऋ. ६·५५·४) व 'स्वसुर्जारः शृणोतु नः (ऋ. ६·५५·५). येथें सायणभाष्य–'स्वसुः उषसः जारः पूषा नः अस्माकं स्तोत्राणि शृणोतु.'

'सूर्यो देवीमुषस रोचमाना मर्यो न योषामभ्येति पश्चात् (ऋ. १·११५·२) ह्यातील कल्पना सुप्रसिद्धच आहे. एखादा मनुष्य ज्याप्रमाणें शोभनाङ्गी तरुणीच्या मार्गे सतत जात असतो त्याप्रमाणें सूर्य उषेच्या मार्गे जात असतो. परतु उषेकडे समारभानें जाण्याची कल्पना अन्यत्र आलेली आहे ती येथें महत्त्वाची आहे. 'यास्ते पूषन्नावो अन्तः समुद्रे हिरण्ययीरन्तरिक्षे चरन्ति । ताभिर्यासि दूत्यां सूर्यस्य कामेन कृत श्रव इच्छमानः' (ऋ. ६·५८·३). सायणभाष्यावरून सर्व गोष्टी स्पष्टच होतात: " हे पूषन् तें त्वदीया. याः हिरण्मयीः हिरण्मय्यो ... नावः समुद्रे उदधौ अन्तः मध्ये अन्तरिक्षे नभसि चरन्ति सचरन्ति ताभि नौभिः सूर्यस्य दूत्यां यासि गच्छसि । कदाचित् देवे सार्वं सूर्ये सुरयार्थं प्रस्थिते सति तस्य भार्या स्वभर्तरि सजातोत्सुक्या बभूव तां प्रति सूर्यः पूषण प्राहैषीत् । " साराश, या दोन्ही कल्पना खाल्डियन सौरसूक्तांतील उपरिनिर्दिष्ट सदर्भाशीं जुळत्या आहेत, यांतच खाल्डियनभूमींत भारतीय आर्यांच्या पूर्वजांचा निवास असल्याचा फार मोठा पुरावा आपणास मिळतो.

६. देवाचे वा मानवांचे सर्व तुझें अबाधीपणानें दर्शन घेताव

(ओ. १० ) × यातील कल्पना ' विश्वदर्शतो ' ( ऋ. १. ५०. ४ ) " विश्वैः सर्वैः प्राणिभिः दर्शनीयः " व ' विचर्षणिः ' ( ऋ. १. ३९५. ९ ) "विविधदर्शनयुक्तः " या विशेषणात मेळून गेलेली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

७. पापपुण्य जाणणारा ( ओ. २६ ) × ' त आदित्यास उरवो गभीरा अदब्धासो दिप्सन्तो भूर्यक्षाः । अन्तः पश्यन्ति वृजिनोत साधु सर्वं राजभ्यः परमा चिदन्ति ' ( ऋ. २. २७. ३ ) – " हे आदित्यासः अदितेः पुत्राः अन्तः मध्ये प्राणिना हृदि प्रेरकतया वर्तमानाः सन्तः वृजिना वृजिनानि पापानि उत अपि च साधु साधुनि पुण्यानि च प्राणिभिः कृतानि पश्यन्ति जानन्ति।..."

८. मार्गदर्शकत्व ( ओ. १५, २८, ३४, ३५ ) × ' सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ' ( ऋ. १. ११५. १ ) = ( सा० ) – " सूर्यः अन्तर्यामितया सर्वस्य प्रेरकः परमात्मा जगतः जङ्गमस्य तस्थुषः स्थावरस्य च आत्मा स्वरूपभूतः"

९. शान्तिकिरण – अनुग्रह ( ओ. २५, १३ ) × ' आ तं स्वस्तिमीमह आरेअघामुपावसुम् ' ( ऋ. ६.५६. ६ ) = ( सा० ) " हे पूषन् ते त्वदीयां त्वया देयां स्वस्तिं कल्याणीं रक्षाम् आरेअघाम् । आरे दूरे अघ पापं यस्मात्तादृशीम् । ईमहे अभियाचामहे."

१०. हविर्भाग अर्पण करण्याची कल्पना ( ओ. २९ ) × 'मित्राय हव्य घृतवज्जुहोत' (ऋ. ३-५९-१)–" हव्य हवनयोग्य पुरोडाशादिक तस्मै मित्राय देवाय जुहोत. "

११. पाप नाहींसें करणारा (ओ. ३० ) × ' अप विश्वा दुरिता बाधमानः."(ऋ. १-३५-३)–" विश्वा दुरिता सर्वाणि पापानि अपबाधमान' विनाशयन्." 'निरंहसः पिपृता निरवद्यात् ' (ऋ. १-११५-६) = " अंहसः पापात् नि. पिपृत निष्कृष्य पालयत." ' त्वं नो अत्र सुवतादनागस.' (ऋ. ४-५४-३) –इ० इ०

१२. रोग दूर करणारा–(ओ. २५, २७, ३१, ३२, ३३ ) ×'हृद्रोग मम सूर्य हरिमाणं च नाशय ' ( ऋ. १-५०-११ )–" मम हृद्रोगं हृदयगतमान्तर रोग हरिमाण शरीरगतकान्तिहरणशील बाह्य रोग । यद्वा । शरीरगत हरिद्वर्ण रोगप्रात वैवर्ण्यमित्यर्थः । तदुभयमपि नाशय ". ' अपामीवां बाधते ' ( ऋ. १-३५-९ ) = " अमीवां रोगादिबाधाम् अप बाधते सम्यक् निराकरोति." 'सनेम्यस्मद्युयवन्नमीवा ' ( ऋ. ७-३८-७ ) = " सनेमि । पुराणनाम एतत् । पुरातनाः शमीवाः रोगान् अस्मत् अस्मत्तः युयवन् पृथक्कुर्वन्तु ."–इ० इ०

परंतु येथें सर्वसामान्य रोगाविषयीं प्रश्न नसून खाल्डियन सौरसूक्तांतील ' हातपायांची शरीर मलिन करणारी व्याधि ' म्हणजे गलितकुष्ठ असावी हें स्पष्ट दिसतें. यासंबंधीं सूर्याराधन करण्याची प्राचीन परंपरा दिसते. ' आरोग्यं भास्करादिच्छेत् ' असें म्हटलेंच आहे. तथापि मयूरकवीनें ऐतिहासिक काळांत ' सूर्यशतक ' रचून व सूर्याराधन करून आपल्या व्याधीचा उपशम करून घेतल्याची कथा सुप्रसिद्धच आहे.

सारांश, या खाल्डियन सौरसूक्ताच्या उपलब्ध असलेल्या ३०-३१ ओळींत देखील इतक्या महत्त्वाच्या कल्पनांतील नितान्त साम्य वैदिक सौर-सूक्तांतील कल्पनांशीं सापडूं शकतें, इतकेंच नव्हे तर कमींत कमी सुमारें २४ शब्द व्युत्पत्तिदृष्ट्या उभयसामान्य आढळूं शकतात. यावरून एकच अनुमान निघतें व तें म्हणजे आर्यांच्या वसाहत असलेल्या या भागांतील हें सौरसूक्त नष्ट झालेल्या असंख्य श्रुतींचा स्मृतिरूप अवशेष होय.

# टॉइनबींचा इतिहासबोध

( प्रा. श्यं. शं. शेजवलकर )

जगाच्या इतिहासाचें मंथन करून त्य घरून मानवी सुधारणेच्या तत्त्वें निश्चित करण्याचा अवाढव्य प्रयत्न अर्नोल्ड टॉइनबी यांनीं एका पिढीपूर्वी सुरु केला व तो या वर्षी त्याचे शेवटचे चार खंड प्रसिद्ध होऊन पुरा होत आहे. दहा खंडात प्रसिद्ध होणारें हें इतिहासमहाभाष्य इतिहासाभ्यासकाना बहुतकाल पायाभूत पाठ्यपुस्तक ठरेल याबद्दल कोणतीहि शंका नाहीं. मानवेतिहासात आजवर होऊन गेलेल्या व विद्यमान असलेल्या सर्व मानवसमूहाचे पृथक्पृथक् इतिहास अभ्यासून त्यावरून त्याची प्रबंधरूप मांडणी करून इतिहासशास्त्राचे सिद्धांत प्रस्थापित करणें व त्या शास्त्रावरून केवळ इतिहासबोधच नव्हे तर चालू राजकारणाला मार्गदर्शन व्हावें अशी त्या सिद्धांताची रचना करणें हे हेतु मनात धरून टॉइनबींनी आपलें ग्रंथलेखन केलें आहे. टॉइनबी हे प्रचलित जागतिक राजकारणाचे चालू इतिहासकार म्हणून गेलीं तीन तपें अविरत काम करीत आहेत. त्यासाठीं स्वतंत्र संस्था स्थापून घेऊन तिचे मार्गदर्शक म्हणून ते काम करीत असतात. या नित्याच्या कामात त्याना असे आढळून आलें कीं, चालू राजकारणाचे धागे मार्गेमार्गे पहावे लागतात. असा प्रयत्न करतानाच त्यांच्या लक्षात आलें कीं प्रत्येक देशाच्या पूर्वेतिहासाचे पृथक्पृथक् फुटकळ धागे दाखविण्यापेक्षां ते मुळात जसे एकमेकात गुतले गेलेले, एकमेकावर परिणाम करणारे व बहुधा परस्परावलंबी होते तसेंच साकल्यानें एकत्र वाचकासमोर मांडणें हें यथातथ्य इतिहासदर्शनास जास्त आवश्यक आहे. तेव्हां त्यानीं तसा प्रयत्न सुरु करून तो प्रचंड उद्योगानतर तडीस नेण्यात अभूतपूर्व यश संपादन केलें आहे. मध्यतरीं इतिहासाला जगत्प्रलयाची कलाटणी मिळत असताहि त्या प्रलयाच्या झंझावातातसुद्धा त्यानीं आपलें डोकें स्थिर ठेवून काम तसेंच नेटानें पुढें रेटलें. मनात स्थिर झालेल्या सिद्धांतानाहि भोवतालच्या प्रलयकारी वातावरणामुळें विचलता प्राप्त होत होती. त्यांचे ग्रंथ ज्यांनीं मुळापासून वाचले असतील त्यांना त्यांच्या अलीकडे प्रसिद्ध झालेल्या लेखनात कांहीं फरक झालेला ध्यानांत आलाहि असेल. तरी पण एकदरींत शक्य तितकी मूळ सरणी कायम ठेवून त्यांनीं आपलें विवेचन अद्ययावत् आणून पोहोंचविलें आहे. त्यांच्या विवेचनाप्रमाणें मानवी इतिहासाचें एक महायुग १९४५ सालीं संपून त्याच-वेळीं म्हणजे अण्वस्त्राच्या नूतन सिद्धीनें नवयुगास आरंभ झाला व या युगांत कसें वागावें, वेगवेगळे मानवी गट त्यांच्या मागील इतिहासाच्या कारणांमुळें

परस्पर संघर्षदृष्ट्या कोणत्या परिस्थितींत वागत आहेत व या संघर्षाचे परिणाम कोणते होण्याचा संभव आहे तें सांगण्याचा हेतु धरून त्यांनीं ब्रिटिश आकाशवाणीवर रेथ व्याख्यानमाला तिगस्ता गुंफिली. त्यांतील विचारसरणीचा थोडा परामर्श घेण्याचें येथें योजिलें आहे.

टॉइनबींना ख्रिस्तीधर्माधिष्ठित अशी पाश्चात्य संस्कृति विशेष आदरणीय वाटावी हें स्वभाविक आहे व तशी ती त्याना वाटतेहि. या संस्कृतीचें मूळ ते साहजिकच भूमध्यसमुद्रासभोंवतालच्या ऐतिहासिक घडामोडींत शोधितात. ग्रीक व रोमन संस्कृतीवर त्यांचा साहजिकच भर आहे. त्या मानानें ते पूर्वेकडील संस्कृती लक्षात घेत नाहींत, किंवा त्यावर परिपूर्ण संशोधन होऊन विपुल ग्रंथरचना झाली नसल्यामुळें त्याना विचारसरणींत त्यांचा योग्य तऱ्हेनें उपयोग करून घेता येत नाहीं असें त्यांच्या लेखनावरून दिसतें. उपलब्ध इतिहासाचें वर्गीकरण करून त्याचा साचेबद उपयोग त्यांनीं करून घेतला नाहीं असें नव्हे, तर त्यांना हिंदी वा चिनी संस्कृतीचें ह्रद्गतच समजलें नाहीं किंवा त्याचा बारीक उपयोग करून घेण्यास अवश्य असणारें मूलभूत ज्ञानहि कमी पडलें, असा भास त्यांच्या लेखनावरून होतो. सिद्धांतन करताना ठोकळेबाजपणाची बाधा त्यांच्या मांडणींत फार शिरलेली दिसते. त्यांच्या लेखनाच्या सत्यतेचें विवेचन करणें म्हणजे त्यांनीं तयार केलेले ठोकळे वा साचे किंवा त्यांनीं पाडलेल्या विटा हीं बरोबर पडलीं आहेत किंवा नाहींत हें तपासणें होय व हें काम प्रगाढ विद्वत्तेचें तसेंच अकल्पनीय श्रमाचें होणार आहे. मानवी इतिहासातील महान् विभूतींचें स्थान व कार्य कोणतें यासंबंधीहि त्यांनी केलेलें विवेचन तसेंच परीक्षणीय आहे. या महान् व्यक्तीहि कोणत्या नियमानीं बद्ध असतात व त्यांची वैयक्तिक उन्नति कशी होत जाते याबद्दलचें त्यांचें विवेचन मोठें मार्मिक व बहुधा पटण्यासारखें आहे. पण स्थूलमानानें मानवेतिहासाचें आंदोलन, त्यांतील घडामोडी, यांचा उगम व्यक्तींकडून होतो कीं समूहाकडून होतो हा प्रश्न त्यांनीं निश्चयात्मक सोडविलेला नाहीं. त्यांचा कल वैयक्तिक बाजूकडे झुकतो यात आश्चर्य नाहीं; कारण पाश्चात्य संस्कृतींत व त्यांतीलहि इंग्रजी विभागांत ते वाढले असल्यामुळें शुद्ध मानसशास्त्राबद्दल त्याना तिरस्कारच आहे. पण धाऊक धर्मप्रसाराची मानवेतिहासांतील उदाहरणें वैयक्तिक मानसशास्त्रानें उकलतां येतलि किंवा काय याची शंका वाटते.

टॉइनबींनी रशियाचा अंतर्भाव पाश्चात्य संस्कृतींत केलेला नाहीं. यूरोपांत हिंदुस्थानाप्रमाणें खंडप्राय अफाट देश रशिया हाच आहे. त्याचे घटकही स्वतंत्र राष्ट्रेंच आहेत. फक्त तीं स्वत च्या पायावर उभीं राहण्याएवढीं मोठीं

नाहींत. त्यामुळें टॉइनबींच्या पाश्चात्य संस्कृतींत एकभाषी व एकधर्मी छोट्या राष्ट्रांचाच समावेश होतो. गेलीं चार शतकें सर्व भूगोल पायाखालीं तुडवून व त्यांतील मागासलेल्या व कमी वस्तीच्या भूभागांना आपल्या सत्तेखालीं आणून नंतर त्यानंतर आतां त्यांना राष्ट्रीयतेचे दुष्परिणाम दिसूं लागले आहेत व सर्व जगांत त्या पद्धतीचें अनुकरण करणें लोकविभागरचनेमुळें अशक्यच काय पण अनिष्टहि आहे असें ते म्हणूं लागले आहेत. अनेक मानववंशांना त्यांच्या संस्कृतीसह व धर्मासह व अर्थव्यवस्थेसह आपल्यांत समाविष्ट करून घेऊन ज्या खंडसंस्कृती चालत आल्या त्यांचें अनुकरण इतरांनीहि करण्यासारखें आहे हें त्यांना आतां कोठें पटूं लागलें आहे. लक्षावधीच काय, पण कोट्यावधि लोकांनाहि ज्या प्रदेशांत त्यांचे पूर्वज शतकानुशतकें रहात आले तो प्रदेश सोडण्याची निर्दय आपत्ति कोसळतांना पाहून आतां टॉइनबींना आपलें मत सुधारून घ्यावेंसें वाटत आहे, पण हा विचार जर पहिल्या महायुद्धानंतर त्या युद्धांतील जेते लॉइड जॉर्ज व क्लेमेंशो यांच्या मनांत आला असता तर कदाचित् दुसऱ्या महायुद्धाचीं बीजेंच मुळांत करपून गेलीं असतीं, हें टॉइनबींना काय आम्हीं सांगावयास पाहिजे ! शत्रुप्रदेशाची वाटोळी करतांना त्यांच्या मनांत सामान्य न्यायबुद्धीहि जागृत असती तर त्यांनीं हात आंखडला असता. तो न आखडल्यामुळें मुसोलिनी, हिटलर व तोजो यांसारखे घटिंगण निर्माण झाले व त्यांच्या निर्मितीमुळें मुळांतच तरवारीनें घटिंगण बनलेल्या लेनिन, स्टॅलिन, ट्रॉटस्की यांना आपल्या घटिंगणपणाचें समर्थन करण्यास संधि मिळाली. यानंतरहि हिटलर पुनः पुनः सांगत होता तें न ऐकतां तोच चुकांचा कार्यक्रम चालू ठेवल्यामुळें दुसऱ्या महायुद्धांत रशियाशीं गट्टी करून इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यांना आपलें रक्षण करावें लागलें व आतां या वर्तनाचेच दुष्परिणाम रशिया व पाश्चात्य असे दोन गट पडण्यांत झाल्यानंतर या जगाचें होणार काय याची काळजी टॉइनबींना पडली आहे; पण ' बुडसे गई तो हाजसे नई आतां है ' या म्हणी-प्रमाणें आतां आपल्या दुष्ट आग्रहाचे व स्वार्थाचे पूर्ण परिणाम भोगल्याशिवाय त्यांतून पाश्चात्य संस्कृति सहीसलामत सुटेल अशी आशा करणें व्यर्थ दिसतें.

आज सुसम्पन्न व विचारी लोकांपुढें जो प्रकाश भविष्यकाळ दिसत आहे, जें मनाचें असमाधान व हृदयाची अशांति दृग्गोचर होत आहे व यथेच्छ खाण्यापिण्याला असतांसुद्धां भीतीचें जें कापरें अमेरिकेला भरलें आहे, तें पाहून टॉइनबींना वाटावयास लागलें आहे कीं यांतून सुटका होण्यास एका नवीन मानवधर्माची निर्मिती आवश्यक आहे ! गरीब बापडी आमची वैदिक संस्कृति ! जिनें हजारों वर्षांपूर्वीच "सह नाववतु सह नौ भुनक्तु सह वीर्यं करवावहै तेजस्वि

नावधीतमस्तु मा विद्विषावहै " अशा शांतिकारक टाहो फोडला होता व "सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः। सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्" अशी प्रार्थना आम्ही भारतीय आरंभापासून करीत आहोत. पण तिकडे लक्ष न देतां पुढारलेपणाचें एकमेव लक्षण शस्त्रास्त्रांचें सामर्थ्य व परस्वहरणाची दुर्दमनीय इच्छा हींच ठरून पाश्चात्य संस्कृति (!) जगावर आदळली, तीपुढें आपल्या संस्कृतीचा टिकाव काय ? आज अमेरिका आम्ही वरील ध्येयवाक्यांत सांगितलेलीं ध्येयें स्वार्थरक्षणासाठीं व स्वसत्ता टिकविण्यासाठीं कां होईना, अमलांत आणण्याचा प्रयत्न करतांना दिसत नाहीं काय ? सर्वांचें संरक्षण एकमेक मिळून करण्याचा, जगातील सर्व धान्यादि खाद्यवस्तु सर्वांनीं मिळून खाण्याचा, सर्वांचें बळ एकत्र एकवटण्याचा व कोणाचा द्वेष न करतां वागण्याचा आपला हेतु आहे असें अमेरिका बाह्यतः तरी–आणि इथेंच पाश्चात्य संस्कृतींतील व पौरस्त्य संस्कृतींतील भेदांची खरी मख्खी आहे–गेले दशकभर दाखवीत नाहीं काय ? तसेंच सर्व जग सुखी व्हावें, सर्वत्र निरोगिता पसरावी आणि या पृथ्वीतलावर कोणाच्याहि वाट्याला दुःख न येतां सर्वांचें कल्याणच व्हावें अशा हेतूनें अमेरिकेनें या वेगवेगळ्या क्षेत्रांत पैशाची पेरणी चालविली नाहीं काय ? यांत दोष फक्त अशस्य हेतूचा तेवढाच राहिला आहे. जर हेतु शुद्ध असेल तर पहिल्यानें मन निर्मळ करावें लागेल. तें तसें करावयाचें म्हणजे स्वतःच्या संस्कृतीबद्दल, किंवा धर्माबद्दल, आपल्या समाजाच्या शास्त्रीयतेबद्दल व पुढारलेपणाबद्दल जे जे अहंकार हृदयाशीं घट्ट धरून ठेवले आहेत ते झाडून टाकावे लागतील. असें निर्धूतकल्मष झाल्यानंतर मग कोणत्याहि खऱ्या सुधारणेला अवश्य अशी भूमिका तयार होऊं शकेल. पण तसें न करतां उपाशी राष्ट्रांना धान्य पाठविण्याचें, साथीच्या रोगांनीं पछाडलेल्यांना औषधें व डॉक्टर पुरविण्याचें, मागासलेल्यांच्या शिक्षणासाठीं शाळा कॉलेजें स्थापून त्यांच्यासाठीं शिक्षकवर्ग तयार करण्यासाठीं आपल्या देशांत येण्यास शिष्यवृत्त्या देण्याचें, उध्वस्त झालेल्या प्रदेशांतील लोकांना घरें, रस्ते व रेल्वे बांधून देण्याचें ठरवून त्या अनुरोधानें योग्य गोष्टी करीत असूनहि त्याचा अंतिम हेतुसिद्ध्यर्थ कांहींहि उपयोग होण्यासारखा नाहीं, हें त्यांना कळेल तो सुदिन !

टॉइनबी असें गृहीत धरीत आहेत कीं, जगांतील सुधारणेची कोणतीही लाट कोणालाही तोंड देऊन थोपवितां येणार नाहीं. उदाहरणार्थ, महात्मा गांधींनीं भारतीय संस्कृतीच्या रक्षणार्थ सूत काढण्यासारखे मूलभूत उपाय सुचवूनहि त्यांच्या उपदेशाचा कांहींहि परिणाम झालेला दिसत नाहीं व स्वातंत्र्यकालांत हिंदुस्थान पाश्चात्य वेगानेंच आपलें आधुनीकरण करताना दिसत आहे. तसेंच

तीनशे वर्षे आपला गोपा टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करूनहि अखेर तुर्कस्थानला स्वातंत्र्यरक्षणासाठीं संपूर्णतः यूरोपीय होण्याचा मार्ग स्वीकारावा लागलेला प्रत्ययास आला आहे. हेंच काय, पण रशियासारख्या बलाढ्य खंडप्राय राष्ट्रालाहि आपला क्रिस्ती धर्मांतर्गत स्वतंत्र पोटभेद सुद्धां कटाक्षानें स्वतंत्र राखण्याचा तीनशें वर्षे सटाटोप केल्यानंतर, आपल्या शत्रुराष्ट्रांतील एका माणसानें शोधून काढलेला आर्थिक सिद्धांतरूप धर्म स्वीकारून त्या कवचाच्या आधारावर जगाला तोंड देण्याचा मार्ग स्वीकारावा लागत आहे. त्याप्रमाणें जपाननें तर केवळ एक शतकामागेंपर्यंत आपली जुनी संस्कृति सर्व गोष्टींत चालू ठेवून नंतर एकदम जागें होऊन संपूर्ण पाश्चात्य शास्त्रशास्त्रविद्येचा स्वीकार केलेला जगप्रसिद्ध आहे. पण या सर्व उदाहरणांवरून असें ठरत नाहीं कीं या संस्कृतीला तोंड देताच येणार नाहीं. यावरून एवढेंच ठरतें कीं जरूर तेवढ्या मोठ्या प्रमाणावर असा प्रयत्न होऊं शकलेला नाहीं, किंवा झालेले प्रयत्न धूर्त लबाड लोकांच्या अंतस्थ बाधेमुळें आतून पोंखरले गेले. रशियानें जर्मनाकडून प्रचलित केला गेलेला साम्यवाद स्वीकारून त्याच्या बळावर जो सर्व जगाशीं झगडा चालविला आहे त्याबद्दलसुद्धां टॉइनबींचा अभिमान असा कीं, तो तरी पाश्चात्य संस्कृतिनिर्मितच शोध आहे व त्याचा उपयोग शस्त्राप्रमाणें रशिया करीत आहे. अर्थात् हाहि आमचाच जय म्हणावयाचा, पण मार्क्सचा लढाऊ साम्यवाद हा पाश्चात्य क्रिस्ती संस्कृतींतील एक पाखंड आहे. आज पाश्चात्य लोक क्रिस्तांची आर्थिक शिकवण आपल्या समाजांत चालवीत नाहींत या गोष्टीविरुद्ध तो एक मार्क्सनें केलेला गवगवा आहे. यामुळें रशिया व इतर जग यांतील भांडण आतां भौतिक शोधाच्या पटावरून बाहेर निघून आध्यात्मिक पटावर जाऊन बसलें आहे. मार्क्स हा आदितः पोटाबाच केवळ विचार करणारा समाजशास्त्री असल्यानें मानवाची हृदयतुष्टि त्याच्या शुद्ध बुद्धिमार्गांतून निर्माण होण्यासारखी नाहीं. त्याला आतां एका नव मानवधर्माचीच गरज आहे. कोणता नवा मनु असा धर्म प्रचलित करण्यांत यश मिळवितो एवढेंच पहाणें आतां आपणापुढें आहे.

एवंच, आपण भारतीय जे अनेक मनू पूर्वापार कल्पित आलों त्यावरच जगाची मदार येऊन ठेपली म्हणावयाची. महात्मा गांधींनीं क्रिस्ताची आचारप्रणाली सोडून राजकारणांत–सीझरकडे सोपवून दिलेल्या कामांत–लुडबुड केल्यामुळें पाश्चात्त्यांच्या मतें ते नवमनूची जागा भरून काढू शकत नाहींत. मग आतां कोणी विनोबा ही जागा भरून काढणार कीं काय न कळे. टॉइनबींना काय होणार तें निश्चित सांगण्याची कुवत नाहीं. तें असें पूर्वी झालें आहे, ग्रीक व

रोमन पंडित व जेते क्रिस्ती धर्माने आपल्या कक्षेत आणले होते एवढेंच सांगत आहेत; पण जो कोणता धर्म ही जागा घेणार असेल त्याला आज जगज्जेते असलेल्या पाश्चात्यांची समजूत पाढावी लागेल, त्याना समजू शकेल अशा बेपांतच हा नवा धर्म अवतरावा लागेल, हा त्याचा अहंकार कायमच आहे आणि हीच एक गोष्ट इष्ट घटनेच्या आड येण्याची शक्यता आहे.

टॉइनबींच्या विषयाचें नाव ' जग व पश्चिम ' असें आहे व सारें जग पाश्चात्य संस्कृतीविरुद्ध कसें वागत आलें, पण अखेर त्याला पाश्चात्य संस्कृतीचाच स्वीकार करून आत्मसंरक्षण करणें कसें भाग पडलें, हें त्यांनीं सोदाहरण दाखवून दिलें आहे. त्यांच्या व्याख्यानातील मुख्य मुद्द्यांचें विवेचन वर केलेंच आहे व त्या अनुषगानें त्यांनीं अनेक गोष्टींवर आपले विचार प्रकट केले आहेत. मूलतः चालू राजकारणावरील लेखक ही त्याची भूमिका अशा विचारांत दिसून येते. इस्लामचे व पश्चिमेचे संबध वर्णीत असता त्याना पाकिस्तानावर येणें भागच होतें. त्यांच्या मतानें पाश्चात्यांच्या राष्ट्रीयतेचा हिंदुस्थानात ब्रिटिशांच्या निघून जाण्यानतर चिचका झाला व त्यामुळें ब्रिटिश अमलाखालीं एकत्र झालेलें खड एकराष्ट्र म्हणून पुढें चालू शकलें नाहीं. त्याचे दोन्ही भाग परस्परविरोधी म्हणून स्थापन व्हावे ही एक दुर्दैवी घटना आहे व ती दोघानाहि अनिष्ट आहे. कारण विभागणीमुळें भारत हें हिंदुस्थानपेक्षा सर्व दृष्टींनीं लहान झालें आहे व पाकिस्तान स्वतत्र इस्लामी राष्ट्र होऊनहि त्याचे हिंदुस्थानच्या दोन कुशींत दोन भाग सामावलेले आहेत आणि खेरीज चार कोटि मुसलमान भारतात परधर्मीयाच्या कक्षेत राहिले ते राहिलेच. पण एवढें म्हटल्यानतर टॉइनबींना हिंदी मुसलमानाचीच जास्त कींव येतांना दृष्टीस पडते. त्याना वाटतें कीं, आपलें स्वतत्र राष्ट्र मिळविण्यासाठीं हिंदी मुसलमानांना तुर्कस्तानातल्या किंवा ईजिप्तमधील लोकांपेक्षा भलतीच जास्त किंमत द्यावी लागली आहे! पण आपल्या अनुभवावरून यापुढे तुर्क व पाकिस्तानी नवे राजकीय धडे स्वतः शिकून जगाला शिकविण्यास समर्थ होतील अशी त्याना आशा आहे. शका येते कीं, नुकतीच तुर्कस्तान व पाकिस्तान यामध्यें झालेली गट्टी टॉइनबींच्या या सूचनेवरून तर झाली नाहीं ना?

भारताविषयीं बोलतांना टॉइनबी म्हणतात कीं, जर भारत-पाकिस्तान व सीलोन हीं पाश्चात्य पद्धतीप्रमाणें त्या शिकवणीचा अभिमान धरून पुढें चालतील तर तीं "स्वतत्र जगातच" सामील होतील म्हणजे रशियाच्या साम्यवादी गटात जाणार नाहींत. कारण त्यांच्या मतें साम्यवादी जग हें स्वतत्र नव्हे; पण पाश्चात्य सस्कृति पर्णपणें अशी स्त्रिवलेले जे तलनेनें गठभर अल्पसख्य भारतांत

आहेत त्यांना हिंदुपरंपरेविरुद्ध टिकाव धरता येईल काय याबद्दल ते साशंक दिसतात. त्यांच्या मतें रशियन व इस्लामी या दोन्हीहि संस्कृतींत ग्रीक-रोमन संस्कृतीची पाळेंमुळें खोलवर गेलेली आहेत व रशिया तर दुसऱ्या पोटभेदाचा का होईना पण क्रिस्तीच आहे व इस्लाम हा तरी क्रिस्ती धर्मांचीच एक विकृत आवृत्ति आहे. पण हिंदी, चिनी, जपानी व इतर पौरस्त्य संस्कृती या पाश्चात्य गटाबाहेरच्या आहेत. त्यांच्यावर रशियन साम्यवादाचेंसुद्धा वर्चस्व चालणें कठीण आहे. पण याला एक भौतिक कारण अपवाद ठरण्याचा बळकट संभव आहे. तें कारण म्हणजे पौरस्त्य जगातील लोकसंख्येची अभूतपूर्व वाढ. जर ही वाढ अशीच चालू राहिली तर त्या प्रदेशांतील अन्न त्यांना लवकरच पुरेनासें होईल व मग 'बुभुक्षितः किं न करोति पाप ' या न्यायाने तेथील भुके-कंगाल रशियन साम्यवादाला बळी पडतील. जपानी व चिनी लोकांनी पाश्चात्यांना बंदी करून तीन शतकापूर्वी आपला धर्म व संस्कृति राखली, पण लोकसंख्येचें संकट काय घडवून आणील व काय नाहीं तें सांगता येणार नाहीं. यावर उपाय संततिनियमनाचा व राहणीचें मान वाढविण्याचा.

कोणत्याहि संस्कृतींतील एका अंगाचा स्वीकार केला कीं, तेवढ्यावरच भागतां येत नाहीं. मग दुसऱ्या गोष्टींचा स्वीकार क्रमप्राप्त ठरतो. हातसूत व हातमाग सोडून पाश्चात्य गिरणीचा स्वीकार केला कीं, त्या मागोमाग गर्दीच्या शहरांची आपत्ति ओढवलीच! मग मोकळ्या सुस्यासुस्या प्रदेशातील साधी राहणी टिकणें शक्य नाहीं. शहरातील व्यसनें, रोग व सिनेमा, जुगार यासारख्या करमणुकी तेथें आल्याच म्हणून समजाव्या. महात्माजींनीं हें ओळखून सूत काढण्याचा मार्ग प्रतिष्ठित करण्यासाठीं जंग जंग पछाडलें, पण व्यर्थ! हिंदुस्थानात इंग्लड अमेरिकेचेंच वातावरण प्रसृत होत आहे आणि यामुळेंच रशियाचा धोका जास्त संभवतो. यांतून काय बाहेर निघणार तें एक काळालाच माहीत!

---

# ज्ञानेश्वरींतील कानडी शब्द

( डॉ. मु. ग. पानसे )

ज्ञानेश्वराच्या पूर्वीच दोनतीनशें वर्षें महाराष्ट्रात कानडी भाषिकाची राजवट असल्यामुळें त्या काळच्या मराठी भाषेवर कानडीची थोडीफार छाप पडणें अपरिहार्य होतें. शिवाय "श्रोत्याकडे त्याच्या इतक्या आस्थेनें व बारकाईनें लक्ष पुरविणारा दुसरा ग्रन्थकार मराठी साहित्यांत तरी अजून झाला नाहीं. श्रोत्यांची गरज ध्यानात घेऊन ते पुष्कळदा निरनिराळ्या तऱ्हांनी विषयाचा विस्तार करतात, पण विवेचनाच्या ओघातही अवधान सुटल्याची जाणीव होतांच ते लगोलग श्रोत्याचा अनुनय करण्याची काळजी घेतात."[1] ही वस्तुस्थिति ध्यानात घेतल्यास ज्ञानेश्वरांच्या भाषेंत तत्कालीन भाषाव्यवहाराच्या नानाकलारीक छटा उमटणें क्रमप्राप्तच होतें. कानडी या राजभाषेचा मराठीच्या व्याकरणावर जो परिणाम झाला त्याची स्थूल चर्चा प्रा जहागीरदार[2] यांनी केलेली असून के प्रा. चिं. नी जोशी[3] यांनी ज्ञानेश्वरींतील जसेच्या तसे घेतले गेलेले कांहीं कानडी शब्द दाखविले आहेत सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास ज्ञानेश्वरींत असलेला कानडीचा अधिक प्रभाव दिसेल शब्द कानडी असल्याबद्दल सकृद्दर्शनीं शंका सुद्धा न येण्यासारख्या "हरिमेखला" या शब्दाची चर्चा उद्बोधक ठरेल

वस्तुत "हरिमेखला" हा संस्कृत सामासिक शब्द आहे परतु त्याचा उल्लेख "शब्दकल्पद्रुम," "सेंट पीटर्सबर्ग," "मोनिअर विल्यम्स्" इत्यादि कोणत्याही संस्कृत शब्दकोशात सापडत नाहीं संस्कृत शब्दकोश तयार करण्यासाठीं उपयोगात आणलेल्या संस्कृत वाङ्मयात हा शब्द कोठेंही आला नसावा हें त्याचें एक कारण असू शकेल.

भुलवणी किंवा नजरबंदी या अर्थानें "हरिमेखला" हा शब्द ज्ञानेश्वरींतील पुरुषोत्तमयोग या १५ व्या अध्यायात "न रूपमस्येह तथोपलभ्यते—" या श्लोकावरील टीकेंत आढळतो. टीकेंतील ओव्या पुढीलप्रमाणें आहेत —

---

१. ग. बा. सरदार —संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति, पृष्ठ ३६.

2 R V Jagirdar —Kanarese Influence on Old Marathi ABORI XI,

३. चिं. नी जोशी —मराठी द्राविडीसंबंध व ज्ञानेश्वरींतील द्राविडी शब्द, विविधज्ञानविस्तार १९३४.

नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ॥
तैसा नेणतया आपजे । आहे ऐसा ॥ २४० ॥
ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे ।
लाघवी हरिमेखळे । लोकु जैसा ॥ २४१ ॥

त्याप्रमाणें इंद्रधनुष्य तऱ्हेतऱ्हेच्या रंगानीं भरगच्च दाटलेलें दिसतें त्याप्रमाणें नेणत्या मनुष्याला ( ईश्वर मूर्त स्वरूपात ) आहे असा भास होतो. अशा ( मन. ) स्थितींत असतांना ( हस्त ) लाघव करणारा मनुष्य [ बहुरूपी अथवा इतर कोणीही ] ( आसपासच्या ) लोकाचो नजरबंदी करून त्याना भुलवतो त्याप्रमाणें ( ईश्वर ) अज्ञानाच्या डोळ्याना भुरळ पाडतो.

ज्ञानेश्वरीच्या सर्वच संपादकानीं हा सामासिक शब्द हरि आणि मेखला असा पृथक् केलेला आढळतो. हरि = हरण करतो, भुलवितो, फसवितो. असे हरणें या क्रियापदाचें तृतीय पुरुषी एकवचन घेऊन 'मेखला' याचा अर्थ 'नटवेष, सोंग असाच बहुतेकानीं घेतलेला आहे. माडगावकरांनीं "कफनी" असा अर्थ स्वीकारला असून ज्ञानेश्वरीपरिभाषेंत "वस्त्र" असा अगदीं ढोबळ अर्थ दिलेला आहे. 'हरिमेखला' च्या या पृथक्करणाचें कारण असें कीं, संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या मराठीपूर्व विकासक्रमातील एकाही अवस्थेंत या शब्दाचें अस्तित्व नाहीं आणि नतर एखादद्सऱ्या ठिकाणीं आला असला तर अगदीं बारकाईनें शोध केल्याशिवाय सापडण्यासारखा नाहीं. त्यामुळें 'हरि-मेखला' या सामासिक शब्दाचा काहींच अर्थबोध न होणें स्वाभाविक होतें.

सामासिक शब्दातील "हरि" = इंद्र आणि 'मेखला' = कमरबंद जाळ, जाळें. इंद्राचा कमरबंद म्हणजे इंद्रधनुष्य. इंद्रधनुष्य ही डोळ्यांना पडणारी भुरळ अथवा नजरबंदी ( Optical illusion ) आहे. 'मेखला' चा अर्थ 'जाल, जाळें' असा घेतल्यास हरि-मेखला = इंद्र-जाल = भुरळ, नजरबंदी.

कर्नाटक विद्यापीठातील कानडीचे प्राध्यापक श्री. टी. एन्. श्रीकंठैया[५] यांनीं मला दिलेल्या माहितीप्रमाणें 'हरिमेखळे' हा शब्द कानडी वाङ्मयांतील कुमार व्यासाच्या भारतामध्यें पुष्कळ ठिकाणीं[६] आलेला असून त्याचा अर्थ नजरबंदी असाच आहे. कुमार व्यासाच्या भारतांतील कर्णपर्वांत एका प्रसंगीं अश्वत्था-

४ कुंटे, साखरे, भिडे, वंकटस्वामी, पागारकर, चापेकर, केरळ कोकिळ वगैरे.

५ माहितीबद्दल प्रा. श्रीकंठैय्यांचा मी फार आभारी आहें.

६ द्रोणपर्व ४-३१, १८-११; कर्णपर्व ३-२२ इत्यादि.

म्यानें भीमावर इतक्या कुशलतेनें बाणांचा वर्षाव केला कीं, आकाश कोणतें आणि भूमि कोणती हें समजेनासें झालें. तेव्हां भीमानें अश्वत्थाम्यास टोमणा दिला–

" एलेले हारुवनेके हरिमेखळेय खेळिकेयेके पढिमदळेय बडिकर विक मेळवविल्ला निनगे । ८·३·२२

*अरे वा ! एका ब्राह्मणानें हा नजरबंदीचा (गारुड्याचा) खेळ चालविला आहे. पण त्याला लागणाऱ्या ऐटबाज ढोलगें वाजविणारांची साथच काय ती कमी आहे.*

' हरिमेखला'चा अर्थ भूल अथवा नजरबंदी हाच आहे हें केशिराजानें ( इ. स. १२६० सुमार ) रचलेल्या " शब्दमणिदर्पण " नांवाच्या कानडी व्याकरणांतील ' प्रयोगसार ' विभागांमध्यें असलेल्या " हरिमेखलेयेन्दु इन्द्र-जालम् "७ या वाक्यावरून सिद्ध होतें.

ज्ञानेश्वरीच्या लेखनापूर्वी ३० वर्षे लेखनिविष्ट झालेला 'हरिमेखला'चा वर दिलेला उल्लेख आहे. तेव्हां अद्यापपर्यंत अज्ञात असलेला 'हरिमेखला' हा शब्द कानडींतून ज्ञानेश्वरी-मराठींत आला हें उघड आहे.



७ Kittel's edition, III,P. 469, 123c.

# मानुषी सम्पत्तीला स्वतन्त्र स्थान हवें.

( प्रा. श्री. म. माटे )

दैवी सम्पत्ति आणि आसुरी सम्पत्ति असे सम्पत्तीचे दोन प्रकार गीतेंत सांगितले आहेत. 'अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः' इत्यादि गुण दैवी सम्पत्तींत मोडतात आणि 'दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च' इत्यादि गुण आसुरी सम्पत्तींत मोडतात. कोणी लोक दैवी सम्पत्तीचे गुण बरोबर घेऊन जन्माला येतात आणि कोणी आसुरी सम्पत्तीचे गुण घेऊन येतात. 'हे पाण्डवा, तूं दैवी सम्पत्तींत जन्माला आला आहेस,' असें कृष्णानें अर्जुनाला सांगितलें आहे. अर्जुन हा जसा दैवी सम्पत्तींत तसे इतर कोणी आसुरी सम्पत्तींतहि जन्माला आलेले असले पाहिजेत. आणि हा प्रकार तेव्हा होत होता तसाच आताहि होत असला पाहिजे.

दुसऱ्या अध्यायांत स्थितप्रज्ञाचीं लक्षणें सांगितलीं आहेत 'प्रजहाति यदा कामान्सर्वान् पार्थ मनोगतान् । आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ।।' इत्यादि गुणांनीं स्थितप्रज्ञ मनुष्य मंडित असतो, तसेंच बाराव्या अध्यायांत भक्तिमान् पुरुषाचीं लक्षणें सांगितलेलीं आहेत. तेराव्या अध्यायांत ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. तीं 'अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम्' इत्यादि आहेत आणि अज्ञानाचीं लक्षणें स्वतन्त्रपणें न सांगतां 'ज्ञानलक्षणाच्या विरहित तीं अज्ञानाचीं लक्षणें' असें म्हटलें आहे. चौदाव्या अध्यायांत त्रिगुणातीत पुरुषाचें वर्णन आलेलें आहे. सतराव्या अध्यायांत सात्त्विक, राजस व तामस गुणांच्या मालिका दिलेल्या आहेत. या सर्वहि ठिकाणीं म्हणजे दैवी सम्पत्तीचे गुण, स्थितप्रज्ञाचीं लक्षणें, ज्ञानाचीं लक्षणें, भक्तिमान् पुरुषाचीं लक्षणें, त्रिगुणातीत पुरुषाचीं लक्षणें, आणि सत्त्वगुणाचीं लक्षणें हीं शेजारीं शेजारीं मांडून पाहिलीं म्हणजे त्यांचा तोंडावळा सारखा आहे असें वाटू लागतें.

सात्त्विक, राजस, तामस असे जर मनाचे तीन प्रकार असले, तर गुण-सम्पत्तीचेहि तीन प्रकार असावयास हवे होते असें वाटतें. पहिली म्हणजे सात्त्विक सम्पत्ति, दुसरी राजस सम्पत्ति आणि तिसरी तामस सम्पत्ति. पण सोळाव्या अध्यायांत गुणसम्पत्तीचे दोनच प्रकार केलेले आहेत, दैवी आणि

आसुरी. अर्जुनाच्या उदाहरणावरून असें वाटतें कीं माणसें जन्माला येतात, तीं कोणत्या तरी एका सम्पत्तींत जन्माला येतात. तीं दैवी सम्पत्तींत तरी जन्मतात किंवा आसुरी सम्पत्तींत तरी जन्मतात. पण मनाचे धर्म मात्र सात्त्विक, राजस, आणि तामस असे सांगितलेले आहेत. हे धर्मसुद्धां दैवी धर्म आणि आसुरी धर्म असे सांगावयास हवेत, किंवा गुणसम्पत्ति तरी दैवी, मानुषी आणि आसुरी अशी तीन प्रकारची सांगितली पाहिजे. दैवी सम्पत्तीचे गुण कोणते तें आपण पाहिलें आहेच. ते गुण प्रत्यक्ष सांगितलेले असून, शिवाय स्थितप्रज्ञाचीं लक्षणें, ज्ञानाचीं लक्षणें, भक्ताचीं लक्षणें आणि सात्त्विक मनाचीं लक्षणें यांच्या अवलोकनानेंहि ते ध्यानात येतात. आसुरी संपत्तीचीं लक्षणेंहि आपणांस गीतेवरूनच कळलीं आहेत. पण मानुषी सम्पत्तीचीं लक्षणें कोणतीं तें मात्र तिथें सांगावयाचें राहून गेलें आहे.

गृहस्थाश्रम हा सर्वश्रेष्ठ आश्रम असें गीतेनें सांगितलेंच आहे. आणि 'आश्रमानें' सांगितलेलीं कर्मे केलीं पाहिजेत असा तिचा आग्रह आहे. आता जर प्रपञ्च करावयाचा तर आपल्या अंगीं केवळ सत्त्वभावाचीं लक्षणें, दैवी सम्पत्तीचीं लक्षणें, स्थितप्रज्ञाचीं लक्षणें किंवा तत्सम लक्षणें असून भागावयाचें नाहीं. केवळ या लक्षणांनीं युक्त असलेल्या माणसाच्या हातून प्रपञ्च कधींही व्हावयाचा नाहीं. दुःखामुळें ज्याला उद्वेग उत्पन्न होत नाहीं, ज्याला सुखाची स्पृहा नाहीं, राग, भय, क्रोध हे ज्याच्या ठिकाणीं पूर्णपणें मावळलेले आहेत, ज्याला शुभानें आनन्द होत नाहीं किंवा अशुभानें विषाद वाटत नाहीं, असा मनुष्य प्रपञ्च करावयास नालायकच म्हटला पाहिजे. म्हणजे दया, मृदुता, क्षमा, अद्रोह, शान्ति, मौन, फलाची आकांक्षा न धरण्याची वृत्ति वगैरे जे सात्त्विक ्रण आहेत, त्या गुणाच्या बळावर संसार करणें गृहस्थाला साधावयाचें नाहीं. टेंच हिंसा, असत्य, पैशुन्य, अतिमानिता, लोभ, द्वेष, मत्सर, क्रोध, यांनीच यांचें मन लडबडलें आहे, त्याही माणसाचा गृहस्थाश्रम कधीं यशस्वी व्हाव-ाचा नाहीं. जगाच्या रहाटीवरूनही असे दिसतें कीं, प्रपञ्च हा केवळ त्त्वगुणानीं किंवा तमोगुणानीं होत नाहीं, तर तो रजोगुणानें होत असतो. सत्त्व आणि तमस् यांचें योग्य तें मिश्रण जर स्वभावात आलें तर त्या प्रापञ्चिकाला आपल्या गृहस्थाश्रमात यश प्राप्त होतें. संपूर्णतः अवतारी किंवा अल्पांशानें अवतारी समजल्या जाणाऱ्या पुरुषांच्या चरित्रांवरूनसुद्धां हाच बोध होतो. म्हणून असें वाटतें कीं, दैवी सम्पत्ति आणि आसुरी सम्पत्ति यांच्या बरोबरीनेंच 'मानुषी सम्पत्ति' ही श्रीकृष्णानें सांगावयास हवी होती.

वर सांगितलेल्या गुणांवर टीका लिहितांना ज्ञानेश्वरांनीं जें विशदीकरण केलें आहे तें वाचलें म्हणजे तर हे सर्व सात्त्विक गुण म्हणजे वैराग्याचा केवळ अर्क होय असें वाटूं लागतें. या लोकांच्या हातून यशस्वी प्रपञ्च कधींहि व्हावयाचा नाहीं; इतकेंच काय पण गृहस्थाश्रमांतील नित्याची साधीं कर्मेंसुद्धां नीट होणार नाहींत. खुद्द गीतेंत 'कर्मयोग म्हणजे शास्त्रानें विहित असलेलीं कर्में ज्यानें त्यानें करावींत' असें सांगितलें आहे. हें गीतेचें तात्पर्य म्हणून आपण पत्करावें असें 'गीता-रहस्यांत' म्हटलें आहे. पण आतांपर्यंत वर्णन केलेले आणि ज्याची शिफारस श्रीकृष्णानें फार आग्रहानें केलेली दिसते ते सारे गुण विन्मुखतेचे आहेत–वैराग्याचे आहेत–जगापासून आणि समाजापासून अलिप्त ठेवणारे आहेत असेंच कोणाही निःपक्षपाती वाचकाला वाटेल. अर्थात् या गुणांवर भाष्य करतांना, ज्ञानेश्वरांची बुद्धि वैराग्याकडेच निश्चयानें झुकलेली असल्यानें, त्यांच्या प्रतिभेला मधुर स्फुरण चढलें आहे. विरागी माणसाचें वर्णन म्हणून हीं वर्णनें वाचतांना मनाला मधुर आनन्द होतो. पण आपण गीतेंत शोधीत आहों तें हें कीं जे विरागीही नव्हत, आणि अतिरागीही नव्हत पण आवश्यक तेव्हां धैर्यानें, ईर्ष्येनें, अहमहमिकेनें, आकांक्षेनें, दुसऱ्याशीं मनोणा ठेवून प्रपञ्च करणारे जे लोक असतात त्यांचीं वर्णनें कोठें आहेत तें पाहावें. पण हीं वर्णनें त्यात आढळत नाहींत. एक विरागी माणसाचें गुणवैभव तरी सांपडेल किंवा अतिरागी माणसाचा फजितवाडा कसा होतो, याचें वर्णन तरी आपणाला आढळेल. पण हे दोन्ही अतिरेकी मार्ग सोडून जगाच्या रहाटीला आणि प्रपञ्चाच्या यशाला आवश्यक गुण कोणते ते आपल्याला आढळत नाहींत. याचा अर्थ असा कीं, दैवी सम्पत्ति आढळते, आणि आसुरी सम्पत्तिही आढळते; पण प्रापञ्चिकाची सम्पत्ति आढळत नाहीं.

रामायण-महाभारतांत इतकेंच काय पण खुद्द ऋग्वेदांत ज्या लोकांची आणि आपली गांठ पडते ते खरेखरे प्रपञ्चशूर लोक होते असें दिसतें. ऋग्वेद क्षणभर बाजूला ठेवा, पण रामायणमहाभारतांतील स्त्रीपुरुष हीं तुमच्या आमच्यासारखींच माणसें आहेत असें दिसतें. पण तीं आपण आसुरी गुणांनीं वाटूं कीं काय अशी दक्षता बाळगीत असत व सत्त्वगुणाचा जेवढा अङ्गीकार करतां येईल तेवढा तीं करीत असत असें दिसून येतें. या ग्रन्थांत शुद्ध मानवी चरित्रें वर्णिलेलीं आहेत असें चक्क दिसून येतें. त्यांना अहिंसेचें महत्त्व पटलेलें असतें, पण हिंसासुद्धां कोठें करावी लागते हेंही त्यांना कळतें. सत्याचें महत्त्व व त्याची आवश्यकता त्यांना पटलेली दिसते. पण एखाद्या महत्कार्यासाठीं किंवा दुर्धर प्रसंगाच्या निभावणीसाठीं असत्याचा आश्रय नाइलाजानें करावा लागतो हें त्यांना उमगलें

होतें असें दिसतें. त्यांनीं संसारावर निष्ठा ठेवली होती व धन मिळवावें व त्याचा उपभोग घ्यावा असें ते मानीत असत. ऋग्वेदांतील माणसांनीं तर कसलाही आडपडदा न ठेवता अग्नि, इन्द्र, वरुण, इत्यादिकांच्या प्रार्थना केल्या आहेत कीं "आमच्या शत्रूचा नाश व्हावा. आमच्या शत्रूंचीं नगरें, हे देवतानो, तुम्ही उध्वस्त करा. आमच्या शेतात गव्हाच्या राशि पडू द्यात. आमच्या गोठ्यात सहस्र गाईंचीं सिल्लारें असू द्यात. आम्हाला चांगले बलवान् मुलगे द्या" इत्यादि. यावरून या लोकाना प्रपंच करावयाचा होता हें उघड आहे. रामायणमहाभारतातील लोकही आपापले प्रपच मर्दपणें करीत होते, आणि नुकतेंच म्हटल्याप्रमाणें सत्त्व गुण आचरणात आणण्याचा प्रयत्न एकीकडे करावा, दुसरीकडे तामसगुणांचा अव्हेर करावा, पण प्रपचाच्या यशासाठीं ह्या दोहोंचें मिश्रण करून रजोगुणानीं तो चालवावा अशा धोरणानें ते वागत होते. या तीनही मोठ्या ग्रथात जें धोरण दिसतें त्याचें विवेचन गीतेंत पावयास हवें होतें. पण पाहावें तो विच्यात वैराग्याचें तरी विवेचन सापडतें किंवा तामस गुणाचें तरी सापडतें, रजोगुणाचें मात्र मुळींच सापडत नाहीं. म्हणूनच आरंभीं म्हटलें कीं, दैवी सम्पत्ति आणि आसुरी सम्पत्ति याच्या दरम्यानची मानुषी सम्पत्ति कृष्णानें सागावयास हवी होती.

नवलाची गोष्ट ही कीं, श्रीकृष्णानें सांगितलेल्या भगवद्गीतेंत मानुषी सम्पत्तीचा अभाव असावा! त्याचें स्वतःचें सर्व चरित्र 'मानुषी-सम्पत्तीनें' भरलेलें आहे, आणि जेव्हा धर्मराज मारीच सत्त्वगुणाच्या गोष्टी बोलू लागला, आणि अर्जुन हा युद्धाला कच खाऊं लागला, तेव्हा त्यानें त्या दोघावर 'मानुषी सम्पत्तीच्या' प्रतिपादनाचा नुसता पाऊस पाडला, आणि त्याना युद्धाला प्रवृत्त केलें. गीतेंतहि कृष्णानें हेंच काम केलें आहे. पण गुणाची शिफारस, दोषाचा धिकार करताना वैराग्य आणि अविवेक याचेंच विवेचन त्यानें केलें आहे, मानुषी गुणांचें विवेचन केलें नाहीं. ज्यानीं कोणीं श्रीकृष्णाच्या तोंडीं ही गीता घातली त्याना याचें स्मरण राहिलेलें नाहीं कीं भारतातील कृष्णाचें चरित्र आणि गीतेंतील कृष्णाचें प्रतिपादन यात सगति असावयास पाहिजे!

ही गीतेची रचना करताना व्यासांच्या मनापुढें कोणती योजना होती याची चौकशी करावयास हवी. ती करीत असताना गीतेला उपनिषद् म्हटलें आहे

या श्लोकात गीतारूपी अमृत सर्व उपनिषदरूपी गाईंची धार काढल्यानें प्राप्त झालें आहे असे म्हटलें आहे. आता, जाणते लोक असें सांगतात, "सर्व मुख्य मुख्य उपनिषदांचा कल प्रायः निवृत्तिकडे आहे." खुद्द वेद हे मुख्यत. प्रवृत्तिपर आहेत, पण 'वेदान्त' हें नाव पावलेलीं उपनिषदें हीं बहुशः निवृत्तिपर आहेत. आर्य तत्त्वज्ञानात समन्वयपद्धतीचा अंगीकार दर ठिकाणीं केलेला आढळतो. वेद हे 'कर्म करा' म्हणून सांगणार आणि उपनिषदें विशेषत्वानें निवृत्ति शिकवणार! पण वेदापासून उपनिषदापर्यंत सर्वच अंग आमच्याच तत्त्वज्ञानाचे आहेत. अर्थात् याची सांगड घालावयास हवी हें व्यासांनीं ओळखलें असलें पाहिजे, म्हणून त्यांनीं सांगितलें, 'कर्म तर करावेंच करावें, पण फलाची वासना ठेवू नये.' म्हणजे वेदाप्रमाणें आपली वागणूक प्रवृत्तिपर असावी असेंहि झालें, आणि उपनिषदाप्रमाणें निवृत्तिपर असावी असेंही झालें. गीता कर्म टाकावयास सांगत नाहीं, तर कर्माचें फल टाकावयास सांगते. तें फल टाकलें–म्हणजे–त्याच्याविषयीं उदासीन राहिलें म्हणजे कर्मांचा संन्यास केल्यासारखाच होतो. आणि उपनिषदांना हेंच हवें असतें. व्यासांनीं असा हा समन्वय केला. कृष्णानें रणांगणावर अर्जुनाची समजूत घालून त्याला कर्मे करावयास प्रवृत्त केलें हा इतिहासच असला पाहिजे. पण तो इतिहास सांगताना त्यात आताच उल्लेखिलेल्या समन्वयाची भर घालून त्यांनीं तो उपदेश कृष्णाच्या मुखात घातलेला आहे. उपनिषदांच्या निवृत्तिपर तत्त्वज्ञानांतून मुक्त होण्यासाठीं निष्काम कर्मांची कल्पना आग्रहानें प्रतिपादिलेली दिसते.

पण ही कर्मांची आणि संन्यासाची सांगड घालीत असताना व्यासांनीं कर्म हें रजोगुणातून उत्पन्न होतें हा गीतेच्या १४ व्या अध्यायांतील आपला सिद्धान्त अधिक विशद करावयास हवा होता. प्रपंच चालविण्याला केवळ सत्त्वगुणही चालत नाहीं किंवा केवळ तमोगुणही चालत नाहीं, हें अर्थात् व्यासांना माहीतच होतें. यापुढें त्यांनीं असें म्हटलें आहे कीं रजोगुण कर्मांचे ठायीं आसक्ति उत्पन्न करतो, म्हणजे प्रपंचाला उपयोगी पडणारा गुण म्हणजे रजोगुण होय, आणि तोच माणसाच्या खऱ्याखुऱ्या उपयोगीं पडतो. असें जर आहे, तर दैवी संपत्ति आणि आसुरी संपत्ति यांच्या दरम्यान एक मानुषी संपत्ति सांगावयास हवी होती. सत्त्वगुणाचा जोर झाला म्हणजे सात्त्विक संपत्ति होते, किंवा तमोगुणाचा जोर झाला म्हणजे तामसी संपत्ति उत्पन्न होते, पण प्रपंचाला उपयोगी अशा मर्यादेनें हे दोघे वागत असले म्हणजे मानुषी संपत्ति उत्पन्न होत असली पाहिजे. केवळ, दैवी आणि आसुरी संपत्तीचा हवाला दिल्यानें मानुषी संपत्तीचा गुणरूपानें बोध होत नाहीं. सत्त्व आणि तम

याच्या बरोबरीनें रजोगुणही सांगितलेला आहे. अर्थात् जसें सत्वरूप काहीं गुण आहेत, तमोरूप काहीं गुण आहेत तद्वत् रजोगुण म्हणून स्वतन्त्र काहीं गुण असले पाहिजेत. आणि जर ते तसे असले तर दैवी आणि आसुरी सम्पत्तीच्या बरोबरीनें मानुषी सम्पत्ति सांगितलीच पाहिजे. जगात जितके लोक सत्वगुणी आहेत किंवा तमोगुणी आहेत त्यापेक्षां रजोगुणी लोक अधिक आहेत आणि म्हणूनच मानवी जीवित चालू राहिलें आहे. आणि जर अर्जुनाला जीवितांतलें कर्म करावें असें सांगावयाचें आहे तर रजोगुणाची म्हणजेच मानुषी सम्पत्तीची स्वतन्त्र व्याख्या व उदाहरणें त्याच्यापुढें मांडावयास हवीं होतीं. सम्पद्विवेचन करताना हें झालें नाहीं एवढेंच इथें म्हणावयाचें आहे.

# टीकाग्रंथांतील कोशांचीं अवतरणें

( डॉ. ए. द. कुलकर्णी )

संस्कृत वाङ्मय, व्याकरण व शब्दाचा इतिहास या सर्वांच्याच दृष्टीनें संस्कृत मार्फतील कोशांचें महत्त्व फार मोठें आहे. संस्कृत ग्रंथावरील टीकांतून विपुल प्रमाणात केलेला कोशाचा उपयोग पाहिल्यानंतर वरील विधानाची सत्यता निश्चित लक्षांत येईल. ऐतिहासिक पद्धतीनें केल्या जाणाऱ्या कोशाच्या संपादनांतहि टीकाग्रंथातील कोशांच्या अवतरणांचा अभ्यास अत्यंत आवश्यक असून त्याचा आपण येथें थोडक्यात विचार करणार आहोत.

" टीकाग्रंथांतील कोशांचीं अवतरणें " या विषयाचा परामर्श घेताना अभ्यासाच्या दृष्टीनें दोन भाग पडतात. ( १ ) संस्कृत-अभिजात वाङ्मयाच्या पूर्वकालीन वाङ्मयात आढळणाऱ्या कोशांतील अवतरणांचा अभ्यास; व ( २ ) अभिजात ( संस्कृत ) वाङ्मयांत आढळणाऱ्या कोशांतील अवतरणांचा अभ्यास. दुसऱ्या भागांतील ( अभिजात वाङ्मयातील ) कांहीं अंगांचा यथामति परामर्श घेण्याचें प्रस्तुत प्रबंधात योजिलें आहे.

कोशांतून घेतलेल्या अवतरणांच्या अभ्यासाचे सोयीसाठीं विषयाचे तीन विभाग करता येतील.

( १ ) विविध संस्कृत ग्रंथावरील टीकांमधून उद्धृत केलेलीं वचनें.—

दशकुमारचरित्रावरील पदचंद्रिका नांवाच्या आपल्या टीकेंत कवीन्द्र-सरस्वती पुढील कोशकाराचा नामनिर्देश करून अवतरणें देतो—

१ अजय, २ अमर, ३ कामन्दक, ४ केशव, ५ महीप, ६ भरत, ७ भागुरि, ८ वररुचि, ९ वोपालित, १० शाश्वत, ११ सज्जन, १२ हला-युध आणि १३ हेम.

वरील तो पुढील कोशांच्या नांवांचा उल्लेख करून अवतरणें देतोः—

१ उत्पलिनी, २ कोश, ३ कोशधार, ४ द्विरूपकोश, ५ निघण्टु, ६ मेदिनी, ७ रत्नकोश, ८ रत्नमाला, ९ विश्व, १० वैजयन्ती, ११ शब्दार्णव.

( २ ) हनुमन्नाटकावरील दीपिका नांवाच्या टीकेंत मोहनदास पुढील कोशकारांचीं नामनिर्देशपूर्वक वचनें उद्धृत करतोः—

१ अमर, २ चरक, ३ धनञ्जय, ४ धरणि, ५ वीरभानु, ६ शाश्वत, ७ सारस्वत, ८ हलायुध, ९ हेम.

मोहनदासानें उल्लेख केलेले कोशः—

१ अभिधान चिन्तामणि, २ एकाक्षर, ३ नाममाला, ४ निघण्टु, ५ लिङ्गानुशासन, ६ विश्वकोश, ७ शब्दमारकर, ८ शब्दशेष, ९ सशारावर्त-शब्दशासन.

( ३ ) कोशग्रथांवरील टीकांमधून उद्धृत केलेलीं कोशांतील वचनें.

(अ) अमरकोशांतील टीकेंत क्षीरस्वामी पुढील कोशकाराचा नामनिर्देश करतो:—

१ अभिधानकार, २ इन्दु, ३ कात्य, ४ इन्द्र, ५ चन्द्रनन्दन, ६ दुर्ग, ७ धन्वन्तरि, ८ मालाकार, ९ मुनि, १० मेण्ठ, ११ भागुरि, १२ भोज, १३ रुद्र, १४ शाश्वत.

(ब) त्यानें उल्लेख केलेले कोश पुढीलप्रमाणें:—

१ अनेकार्थ, २ अभिधानरत्नमाला, ३ अभिधानशेष, ४ अमरमाला, ५ देशीनाममाला, ६ नाममाला ७ निघण्टु, ८ माला, ९ वैजयन्ती.

(क) त्यानें पुढील टीकाकाराचा उल्लेख केला आहे:—

१ उपाध्याय, २ गौड, ३ नारायण.

२ रायमुकुटानें अमरकोशांतील आपल्या टीकेंत ज्यांचीं वचनें उद्घृत केलीं आहेत ते कोश, कोशकार व टीकाकार पुढें दिल्याप्रमाणें:—

१ अभिधानमाला, २ अमरदत्त, ३ अमरमाला, ४ अरुण, (अरुण आणि अरुणदत्त एकच का ?) ५ अरुणदत्त, ६ उत्पलिनी,· ७ कलिंग, ८ कात्य, ( कात्य व मुनि एकच आहेत का ? ) ९ कोकट, १० कौमुदी, ११ उणादिसूत्रवृत्ति, १२ जातरूप, १३ दामोदर, १४ देशी कोश, १५ धरणिकोश, १६ नानार्थसंग्रह, १७ नामनिधान, १८ नामप्रपंच, १९ नाममाला, २० निगमाख्यकोश, २१ पदचन्द्रिका, २२ बलशर्मन्, २३ बृहदमरकोश, २४ भागुरि, २५ रत्नकोश, २६ रत्नमाला, २७ रभसपाल, २८ रुद्र, २९ रूपरत्नाकर, ३० वाचस्पति, ३१ वोपालितसिंह, ३२ व्याख्यामृत, ३३ व्याडि, ३४ शब्दार्णव, ३५ सशारावर्त.

३. भानुजीनें उध्दत केलेले कोश आणि कोशकार.

१ अमरदत्त, २ अमरमाला, ३ उत्पलमाला, ४ कात्य, ५ कौमुदी, ६ देशीकोश, ७ रत्नकोश, ८ रभसपाल, ९ रुद्रकोश, १० रूपरत्नाकर, ११ वाचस्पतिकोश, १२ वोपालितसिंहकोश, १३ शब्दार्णव आणि १४ सशारावर्त.

( ४ ) प्रत्यक्ष कोशांमध्यें येणारे इतर कोशांचे उल्लेख:—

नानार्थार्णवसंक्षेप या कोशांत केशवस्वामीनें उद्धृत केलेले कोश व कोशकार यांची यादी उदाहरणादाखल पुढें दिली आहे:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) | अजय | १०९ | (१७) | रभस | २६४ |
| (२) | अमरदत्त | ११ | (१८) | वररुचि | १० |
| (३) | अमरसिंह | १० | (१९) | वराहमुनि | १ |
| (४) | उदयन | १ | (२०) | वसुभट्ट | ३ |
| (५) | कात्य | १ | (२१) | वाचपति | ४ |
| (६) | केशव | १ | (२२) | वैजयंति | ७२ |
| (७) | क्षीरस्वामी | १ | (२३) | शबर ? | १ |
| (८) | चाटुकार ? | १ | (२४) | शाकटायन | ३९ |
| (९) | जयमंगल | १ | (२५) | शाश्वत | २० |
| (१०) | जयादित्य | २ | (२६) | सज्जन | ५९ |
| (११) | दत्तक | १ | (२७) | सारस्वत | २ |
| (१२) | धनंजय | २१ | (२८) | सुभूति | १ |
| (१३) | पिंगल | १ | (२९) | हर्ष | ३ |
| (१४) | बौध ? | १ | (३०) | हर्षनन्दिन् | १७ |
| (१५) | माथुरि | ३ | (३१) | हलायुध | ५ |
| (१६) | भोज | २ | | | |

यांखेरीज 'कश्चन, केचित, शब्दविशारदाः, विदिलागमाः, कश्चित्, स्वतन्त्रधी., अपरे, परे, इतरे ' इ. इ. या शब्दात केशवस्वामी काहीं मताचा परामर्श घेतो.

प्रस्तुत विषयाच्या या अंगाचा अभ्यास केल्यावर टीकाकाराची गाढ विद्वत्ता आणि त्यानें अभ्यासिलेल्या वाङ्मयाचा विस्तार यांची यथार्थ कल्पना येते, आणि त्यायोगानें कोशवाङ्मयात भर घालण्याचे दृष्टीनें टीकाकाराचा भागहि समजून येतो.

टीकाग्रंथ आणखी एका दृष्टीनें अत्यंत मूल्यवान म्हटले पाहिजेत. सामान्यतः टीकाकार मूलग्रंथाचे शब्दशः स्पष्टीकरण करतो. त्यामुळें टीकांचें चांगलें परिशीलन केल्यानें मूळ ग्रंथाच्या आवृत्तींतील पुष्कळशा संशयित स्थळांचा उलगडा करणें सुलभ होतें. शिवाय टीकाग्रंथांचें स्वरूप अर्थविशद करणें हें असल्यानें पर्याय ( वाचक ) शब्दांच्या अभ्यासाचें टीकावाङ्मय हें बहुमोल साधन होय. अभ्यासाचें सोयीसाठीं पर्याय शब्दांचे दोन भाग पाडतां येतील:–(१) जेथें टीकाकार एकाद्या शब्दाला दिलेल्या विशिष्ट अर्थाच्या समर्थनार्थ आधार-

भूत अर्थे एकाददुसरे वचन देतो असे पर्याय, ( २ ) जेथें टीकाकार आधारादाखल कोशाचे वचन उद्धृत करीत नाहीं असे पर्याय याचें कारण कदाचित् असें असेल कीं एकादा शब्द विवक्षित अर्थानें अत्यंत प्रचलित असल्यामुळें टीकाकाराला त्याच्या समर्थनपर असा उल्लेख दर्शविण्याची आवश्यकता भासली नसावी.

कोशांतील अवतरणाच्या अभ्यासामुळें होणारा आणखी एका दृष्टीनें उपयोग असा कीं, त्यामुळें अप्रकाशित कोशांची चिकित्सापूर्ण आवृत्ति काढणाऱ्या संपादकास मोठें साहाय्य होतें. कोशाची संहिता निश्चित करीत असतां संपादकापुढें अनेक अडचणी उपस्थित होतात. कांहीं वेळां हस्तलिखित पोथ्या अत्यंत अशुद्ध असतात. अशी अशुद्धें शुद्ध करण्यासाठीं संपादकास इतर कोशांचें, त्याचप्रमाणें टीकाग्रंथांत आढळणाऱ्या मूळ कोशांतील अवतरणांचें वारंवार साहाय्य घ्यावें लागतें. हस्तलिखित प्रतींतील पाठाची टीकाकारांनीं दिलेल्या पाठाशीं तुलना करून मगच त्याला संशयित स्थळीं पाठ निश्चित करावे लागतात.

हा विषय अधिक स्पष्ट होण्यासाठीं उदाहरणादाखल राघवकृत नानार्थमञ्जरीच्या एका हस्तलिखित प्रतीमधील पुढील पंक्ति आपण विचारांत घेऊ —

ईति प्रचारे स्यन्दे च प्रकारे लोहकीटके ।
आरकूटे प्रवासे च डिम्बे गमनदु खयो ।
अतिवृष्टयावनावृष्टौ शलभे मूषिके शुके ।
अत्यासने च राजानश्चायो जातिखु जन्मनि ।
रीति स्वभावे श्रवणे दूरप्रकृतिचौख्ययो ।

उरलेल्या चार प्रतींतील पाठ वरील पाठाशीं बहुतांशीं समान असून पाठांतरें विशेष उल्लेखनीय अशीं नाहींत. 'ईति' शब्दाच्या उपर्युक्त अर्थाची इतर मुद्रित कोशांत दिलेल्या अर्थांशीं तुलना केल्यावर आपल्याला पुढील निष्कर्ष काढतां येतील

१ नानार्थरत्नमाला–रीति —स्यन्द, प्रकार, लोहकिट्ट, आरकूट
ईति —प्रवास, डिम्ब, अतिवृष्ट्यादि.
२ मेदिनी–रीति. —प्रचार, स्यन्द, लोहकिट्ट.
ईति —प्रवास, डिम्ब, अतिवृष्ट्यादि.
३ शाश्वत–रीति —प्रचार, आरकूट,
४ अनेकार्थतिलक–ईति —प्रवास

५ अमरकोश–रीतिः—प्रचार, स्यन्द.
ईतिः—प्रवास, डिम्ब.
६ शब्दकल्पद्रुम–रीतिः—प्रचार, स्यन्द, लोहकिट्ट, आरकूट.
ईतिः—प्रवास, डिम्ब, अतिवृष्ट्यादि.
७ नानार्थार्णवसंक्षेप–रीतिः—प्रचार, आरकूट.
८ वैजयन्ती–रीतिः—प्रचार, आरकूट.
ईतिः—प्रवास.
९ हलायुध–रीतिः—आरकूट.
१० अनेकार्थसंग्रह–रीतिः—लोहकिट्ट.
ईतिः—प्रवास.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, 'ईतिः' आणि 'रीतिः' या दोन शब्दांना दिलेल्या अर्थांत कांहींसा घोटाळा आहे. अशा स्थितींत एखाद्या टीकेंत नानार्थमंजरींतील वचन उद्धृत केलेलें योगायोगानें आढळ ल्यास त्याचें संपादकाला पाठ निश्चित करण्याचे कामीं बहुमोल साहाय्य होईल.

संपादकापुढें उपस्थित होणारी आणखी एक अडचण अशीः–एखादे-वेळीं टीकाकार एखाद्या कोशकाराच्या नांवावर कांहीं पक्ती उद्धृत करतो; परंतु कोशाच्या उपलब्ध हस्तलिखित प्रतींत मात्र त्या पक्तींचा कोठेंच मागमूस लागत नाहीं. अशा वेळीं तें अवतरण त्याच नांवाच्या दुसऱ्या एखाद्या कोशा-वरून घेतलें कीं टीकाकारानें ज्यावरून वचन घेतलें तो कोशच भिन्न स्वरूपांत असून आतां मात्र तो नष्ट झाला असा संपादकापुढें प्रश्न पडतो. कोशांतील अव-तरणाच्या अभ्यासानें या प्रश्नाचा बराचसा उलगडा होऊं शकेल.

यासाठीं समग्र टीकात्मक वाङ्मयामधील एकूणएक अवतरणांचा संग्रह करून तीं अवतरणें ज्याच्या नावानें उद्धृत केलेलीं असतील त्या कोशकारांस अनुसरून किंवा ज्या ग्रंथांवरून तीं अवतरणें घेतलेलीं असतील त्या ग्रंथांना अनुसरून त्याचें संकलन करण्यांत यावें. याचा उपयोग अनुक्रमानें मुद्रित कोशांची चिकित्सक आवृत्ति काढण्याचे कामीं करतां येईल. कारण टीकांमधून आढळ-णाऱ्या अवतरणाचा न्याय मुद्रित कोशांचे बाबतींतहि सारखाच आहे. उदा० माघकाव्यावरील मल्लिनाथाच्या टीकेंत १·१९ व १६·१८ वर अभिधान-रत्नमालेंतील दोन उतारे दिले आहेत, परंतु हलायुधकृत अभिधानमालेंत हे उतारे सापडत नाहींत, असें ऑफ्रेक्ट आपल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हणतो.

तसेंच डॉ. व्ही. राघवन् हे कृष्णसूरिकृत अमरमण्डणाच्या प्रस्तावनेंत ह्यानें आपल्या अमरखण्डनामध्यें घेतलेल्या कांहीं उताऱ्याचा उल्लेख करतात.

तथापि ते उतारे त्याच्या कोशाच्या मुद्रित आवृत्तींत उपलब्ध होत नाहींत अशी स्थिति आहे.

प्रसंगीं टीकाकार चरक, व्याडि, रभस, सज्जन, शाश्वत आणि इतर प्राचीन कोशकार यांच्या ग्रंथातून उतारे देतात. हे ग्रंथ उपलब्ध झालेले नाहींत. टीकात्मक वाङ्मयांत तसेंच निरनिराळ्या कोशांत सांपडणारीं अशा ग्रंथांतील उद्धरणें जर एकत्र केलीं तर या ग्रंथांचें स्वरूप कसें असावें याचें काहीं अंशीं दिग्दर्शन करता येईल. निदान त्यांत उद्धृत केलेल्या शब्दांची सूची करून त्यांच्या अर्थांची चिकित्सा करता येईल.

( थ ) नानार्थार्णवसंक्षेपामध्यें "सज्जन" कोशांतून घेतलेल्या (अवतरणांतील ) शब्दाच्या समान्य सूचीचें स्वरूप पुढीलप्रमाणें राहील —

अत्ता; स्त्री. १ १०-४. नाटयोक्तौ वृद्धा वेश्या
अनुबन्ध, पु. ३-८ ८६. क्रोध
अभिषङ्ग, पु. ३ ७ ८. दु ख
अभिहार, पु. ३-६-४ सश्लेषण, अभिक्रमण
अरिष्ट, न. २-४८-१७ अञ्जनामवर्ण, निकार
अवदात, न. २ १८-४ अप्रधानकर्मन्
आडम्बर, पु. ३-३० ५९. कोप, आमोग
आशय, पु २-६२-१८४. सघ, चेतस्
आशा, स्त्री. १ ४८ ६४. समीप
इज्या, स्त्री. १ ११-१३ जननी
उपला, स्त्री २ ६७ २४ दिश्
कट, पु. १ ५६ १५७ वल्य
काली, स्त्री. १ ५८ १८२. शासनदेवता
कुड, न. १ ६३ २३६. कुम
कुतप, पु. न. २ ८९-४९६. सायमास्तरण
कुब्ज, वि. १ ६२ २३१. निखर्व
खेट, पु न. १ ७०-३२१ नद्यद्रिमध्यस्थनगर
गत, वि. १ ७१ ३३६ अतीत
गौरी, स्त्री. १ ७५-३८०. शासनदेवता
चर्चिका, स्त्री. १-७७-४०१. पार्वतीनाम
चाटु, पु. १ ७८ ४१५. दर्वी
जन; पु. १ ८२-४६४. अप्राज्ञ मनुष्य

जया; स्त्री. १-८१-४४९ शासनदेवता
तरणि; स्त्री. २-१२०-८४० रथ
तार; पुं. १-८७-५२४ रद
दर; पुं. न. १-९२-५७५ छिद्रमात्र
ध्वज; पुं. १-९६-६३१ वृक्षमात्र
नदीष्ण; वि. २-४३-२६. तरणपटु
नपात्; १-१००-६७२. सर्प, अपत्य
निष्क; पुं. न. १-१०१-६८८. रहस्
पिच्छा; स्त्री. १-१०९-७७४. सर्वपिच्छिलमंडल
पीलु; पु. १-१०९-७८१. कटूफलनामवृक्ष
पुण्यश्लोक; वि. ३-२५-२३ प्रियंवद
प्रवचन; न. ३-२०-२६. शास्त्र
प्रवृत्ति; स्त्री. २-५-५० उच्चार
बोधि; पुं. १-११७-८७५. बुद्ध
भव; पुं. १-११८-८८२ कोप
भास्वत्; पु. १-१००-९०६ पक्कण
मद्र; न. १-१२२-९२७. शुभ
मही; स्त्री. १-१२३-९४२. नदीभेद
मारी; स्त्री. १-१२७-९८६. कालरात्रि
मृणाल; वि. २-१७३-१४४०. दयित
रणरणक; पु. ३-८९-१५. वियोग
लिगु; पु. १-१४०-११४२ सत्र
वण्ड; न. १-१४४-११८९ शिश्नमात्र
वरिवस्या; स्त्री. ३-५-५०. परीष्टि
वर्मन्; पु. न. १-१४६-१२०९. गुल्मसशबल
वाम; पु. स्त्री. १-१४६-१२१६. उष्ट्र
व्रत; न. १-१४३-११७८; विधान
व्यतिकर; पु. ३-१६-१०८. व्याजोक्ति, प्रस्तावोक्ति, सम्पर्कोक्ति
व्युष्टि, स्त्री. १-१५१-१२७२ फलविशेष
शिखा; स्त्री. १-१५९-१३६६ झाडाचा शेंडा
शुक्ति; स्त्री. १-१६२-१३९७ कर्षसंज्ञक उन्मान
शूर्प; पुं. न. १-१६२-१४०६ अर्धप्रस्थ, द्रोण परिमाणाचे चौपट

निगमाख्यकोश.—रायमुकुट
पारिजात !.—चण्डेश्वर ठक्कूर
प्रकाश·— ,,
वल्लशर्मन्·—रायमुकुट
बृहदमरकोश:—भानुजी, रायमुकुट
क्रियानिघण्टु ( भट्टमल्ल )—मल्लिनाथ
भगुरि:—केशव, क्षीरस्वामी, मल्लि-
नाथ, महीप, महेश्वर, माध-
वीय धातुवृत्ति, मेदिनीकर,
रायमुकुट, हलायुध, हेमचन्द्र
भूरिप्रयोग (पद्मनाभदत्त)·—नारा
यणशर्मन्, भट्टोजि, रामनाथ
नाममालिका ( भोजदेवकृत )—क्षीर-
स्वामी, महीम, सायण
मदनपालविनोदनिघण्टु.—निघण्टुराज,
भावप्रकाश, स्मृत्यर्थसागर
माधवकोश—मेदिनीकर
मालतीमाला —मल्लिनाथ, रामनन्द
मुनि ( कात्यायन ! ) क्षीरस्वामी
मेघप्रदीप-विश्वप्रकाश
मेदिनीकर—असालतिकोश, भूरिप्रयोग,
शिवकोश
रत्नकोश—गदसिंह, भानुजी, मल्लिनाथ,
रायमुकुट, शिवराम
रत्नप्रकाश—मल्लिनाथ
रत्नमाला—भानुजी, मेदिनीकर
रत्नमाला ( माधवकृत )—रायमुकुट
रभसपाल—क्षीरस्वामी, भट्टोजि, इ. इ.
रुद्रकोश—गदसिंह, भानुजी, मल्लिनाथ,
इ. इ.
रूपरत्नाकर—सुन्दरगणि, भानुजि,
रायमुकुट
वररुचिकोश ( कात्य ?) —मेदिनीकर,
हलायुध
वाचस्पति—केशव, भट्टोजि,भानुजी, इ.
विक्रमादित्यकोश भानुजि,मेदिनीकर,इ.
विश्वप्रकाश—मेदिनीकर
विश्वरूप—भट्टोजि, महेश्वर, मेदिनीकर.
एकाक्षरनाममालिका (विश्वशम्भुमुनि )—
अभिधानचिंतामणि
शोपालितसिंह—अभिधानरत्नमाला,
उज्ज्वलदत्त, इ. इ.
व्याख्यामृत (अमरटीका)—रायमुकुट.
व्याडि—केशव, उज्ज्वलदत्त,भानुजि, इ
शब्दतरङ्गिणी—उज्ज्वलदत्त
शब्दभेद—जयमङ्गल
शब्दशब्दार्थमञ्जूषा—वेङ्कट
शब्दार्णव—उज्ज्वलदत्त, भानुजि,
मल्लिनाथ, इ.
शाकटायन गणरत्नमहोदधि,जयमङ्गल इ
शाश्वत—उज्ज्वलदत्त, क्षीरस्वामी इ. इ.
शेष—क्षीरस्वामी
श्रीधर—सुदरगणि
सज्ञा—नारायण, रामनाथ
सारस्वतकोश—भानुजी, रायमुकुट
ससारावर्त—भानुजी, मेदिनीकर, इ. इ.
हलायुध—जयमङ्गल, नरहरि, इ. इ १

१. डॉ. ए. द. कुलकर्णी, एम. ए. पीएच. डी यांच्या "The Kosa citations in commentarial literature belonging to the classical period" 'वाक्' ( अंक १ ) या [illegible]

जया, स्त्री. १-८१-४४९ शासनदेवता
तरणि, स्त्री २-१२०-८४० रथ
तार, पु. १-८७-५२४ रद
दर, पु. न. १-९२-५७५ छिद्रमात्र
ध्वज, पु. १-९६-६३१ पुच्छमात्र
नदीष्ण, वि. २-४३-२६. तरणपटु
नपात्, १-१००-६७२. सर्प, अपत्य
निष्क, पु. न. १-१०१-६८८. रहस्
पिच्छा, स्त्री. १-१०९-७७४. सर्वंपिच्छिलमडल
पीलु, पु. १-१०९-७८१. षट्फलनामगुच्छ
पुण्यश्लोक, वि ३-२५-२३ प्रियवद
प्रवचन, न. ३-२०-२६. शास्त्र
प्रसृति, स्त्री. २-५-५० उच्चार
बोधि, पु. १ ११७ ८७५. बुद्ध
भव, पु. १-११८ ८८२ कोप
भास्वत्, पु. २ १००-९०६ पक्षण
मद्र, न. १-१२२-९२७. शुभ
मही, स्त्री १-१२३ ९८२. नदीभेद
मारी, स्त्री. १-१२७ ९८६. कालरात्रि
मृणाल, वि २-१७३-१४४०. दपित
रणरणक, पु ३-८९-१५. वियोग
लिप्रु, पु १-१४०-११४२ मत्र
वण्ड, न. १-१४४-११८९ छिन्नमात्र
वरिवस्या, स्त्री. ३-५ ५०. परीष्टि
वर्मन्, पु. न. १ १४६-१२०९. शुष्मक्षत्र
वाम, पु. स्त्री. १ १४६-१२१६. उष्ट्र
व्रत, न. १-१४३-११७८, विधान
व्यतिकर, पु. ३-१६-१०८, व्याजोक्ति, प्रस्तावोक्ति, शम्यकारि
व्युष्टि, स्त्री. १-२७१-१२७२ फलविशेष
शिखा, स्त्री. १ १५९-१३६६ झाडाच्या शेंडा
शुक्ति, स्त्री. १-१६२-१३९७ कर्षांशक उन्मान
शूर्प, पु. न. १-१६२-१४०६ धान्यरस्थ, द्रोण परिमाणाचे चौपट

सबाध; पुं. २-२११-१८८६, कारा, संकट
स्पर्श; पु. १-१६६-१४५३ जार, पु. स्त्री. नोकर
स्ववासिनी; स्त्री. ३-६-५३. नववधू.

(व) नानार्थार्णवसंक्षेपांत 'हर्षनन्दिन्' याच्या कोशांतून घेतलेल्या अवतरणातील शब्दांची समान्य सूची:—

अङ्गुल; पु. २-५३-८२. अङ्गुलि..
कणिक; पु. २-८१-३९९: तांदुळाचा कण
कर्क; पु. १-५६-१६० घोड्याचा पांढरा रंग
करुण; न. २-८२-४१५. दैन्य
छित्वर; वि. २-११३-७६३. शठ
दाक्षिण; वि. २-१२६-८९६. कुशल
धाना; स्त्री. १-९७-६४०. भाजलेल्या सातूचें जाड पीठ
पशु; वि. १-२७-७५. ग्राम्य
पिशुन; वि. २-१४९-११६९. मन्त्रभेद, कवचन ? परनिन्दक
भदन्त; पु. २-१५९-१२८३. सन्यासी
मूलेर; पु. २-१७३-१४३८. विकाऊ झाड
मृणाल; वि. २-१७३-१४४०. पद्मकोरक
लडह; वि. २-१८३-१५५५. विलासी
विपिन; न. २-१९६-१७०७ जलदुर्ग
विधर्म, पु. २-१९८-१७३४ शत्रुत्व
श्रेणि; पु. स्त्री. १-१६४-१४२५. अठरा गण, पङ्क्ति, धारा
स्नाव; पु. १-१७१-१५०६. स्नायु

यानतर "आफ्रेक्ट्"कृत बृहत्सूचीवरून याच्यांत आलेला कोश, कोशकार व टीकाकार याचा संदर्भपूर्वक उल्लेख देत आहोत:—

अभिवेशः—वाग्भट, मिश्रभाव, रुद्रभट, तीसट.
अभिधानमालाः—रायमुकुट, भट्टोजी.
अनेकार्थसंग्रहः—भानुजी.
अनेकार्थदीपिकाः—मल्लिनाथ (*किरातार्जुनीय*)
अभिधानरत्नमालाः—मल्लिनाथ (शिशुपालवध)
अमरदत्तः—भानुजी, मेदिनीकर, रायमुकुट, हलायुध.
*अमरमङ्गलः*—केशव, महेश्वर
अमरमालाः—क्षीरस्वामी, भरतसेन, भानुजी, रायमुकुट, *वर्धमान*
अरुणः—कोशकल्पतरु, रायमुकुट
अरुणदत्तः—उज्ज्वलदत्त, रायमुकुट

निगमाख्यकोशः—रायमुकुट
पारिजात !:—चण्डेश्वर ठक्कुर
प्रकाशः— ,,
बलशर्मन्:—रायमुकुट
वृहदमरकोशः—मानुजी, रायमुकुट
क्रियानिघण्टु (भट्टमल्ल)—मल्लिनाथ
मधुरिः—केशव, क्षीरस्वामी, मल्लिनाथ, महीप, महेश्वर, माधवीय धातुवृत्ति, मेदिनीकर, रायमुकुट, हलायुध, हेमचन्द्र
भूरिप्रयोग (पद्मनाभदत्त):—नारायणशर्मन्, भट्टोजि, रामनाथ
नाममालिका (भोजदेवकृत):—क्षीरस्वामी, महीम, सायण
मदनपालविनोदनिघण्टुः—निघण्टुराज, भावप्रकाश, स्मृत्यर्थसागर
माधवकोश—मेदिनीकर
मालतीमालाः—मल्लिनाथ, रामनन्द
मुनि (कात्यायन !) क्षीरस्वामी
मेघप्रदीप—विश्वप्रकाश
मेदिनीकर—असालतिकोश, भूरिप्रयोग, शिवकोश
रत्नकोश—गदसिंह, भानुजी, मल्लिनाथ, रायमुकुट, शिवराम
रत्नप्रकाश—मल्लिनाथ
रत्नमाला—मानुजी, मेदिनीकर
रत्नमाला (माधवकृत)—रायमुकुट
रभसपाल—क्षीरस्वामी, भट्टोजि, इ. इ.
रुद्रकोश—गदसिंह, भानुजी, मल्लिनाथ, इ. इ.
रूपरत्नाकर—सुन्दरगणि, भानुजि, रायमुकुट
वररुचिकोश (कात्य ?)—मेदिनीकर, हलायुध
वाचस्पति—केशव, भट्टोजि, भानुजी, इ.
विक्रमादित्यकोश—भानुजि, मेदिनीकर, इ.
विश्वप्रकाश—मेदिनीकर
विश्वरूप—भट्टोजि, महेश्वर, मेदिनीकर.
एकाक्षरनाममालिका (विश्वशंभुमुनि)—अभिधानचिंतामणि
शोपालितसिंह—अभिधानरत्नमाला, उज्ज्वलदत्त, इ. इ.
व्याख्यामृत (अमरटीका)—रायमुकुट.
व्याडि—केशव, उज्ज्वलदत्त, भानुजि, इ
शब्दतरङ्गिणी—उज्ज्वलदत्त
शब्दभेद—जयमङ्गल
शब्दशब्दार्थमञ्जूषा—वेङ्कट
शब्दार्णव—उज्ज्वलदत्त, भानुजि, मल्लिनाथ, इ.
शाकटायन—गणरत्नमहोदधि, जयमङ्गल इ
शाश्वत—उज्ज्वलदत्त, क्षीरस्वामी इ. इ.
शेष—क्षीरस्वामी
श्रीधर—सुंदरगणि
सज्ञा—नारायण, रामनाथ
सारस्वतकोश—भानुजी, रायमुकुट
संसारावर्त—भानुजी, मेदिनीकर, इ. इ.
हलायुध—जयमङ्गल, नरहरि, इ. इ.[१]

---

१. डॉ. ए. द. कुलकर्णी, एम्. ए. पीएच. डी. यांच्या "The Kośa citations in commentarial literature belonging to the classical period" 'वाक्' (अंक १) या मासिकांत [illegible] आलेल्या लेखाचा संक्षिप्त अनुवाद.